विदर्भ प्रकाशन संस्था. प्रकाशन ५ वें

# भास्करभट्ट बोरीकर

## चरित्र व काव्यविवेचन.



लेखक

**विष्णु भिकाजी कोलते.**

एम्. ए. ( मराठी ); एल्.एल्. बी. ( नाग. )

एन्. के. बेहेरे गोल्ड मेडॅलिस्ट; खान. ब. एच. एम. मलक गोल्ड मेडॅलिस्ट.

मराठीचे अध्यापक, किंग एडवर्ड कॉलेज

अमरावती.



१९३५

किंमत २ रुपये.

*

# भानुविजय.

बरोबर तीन वर्षांपूर्वीची गोष्ट. महानुभावीय वाङ्मयाच्या अभ्यासाला व संशोधनाला मी नुकताच आरंभ केला होता. त्या वेळीं एम्. ए. ला नेमलेल्या शिशुपालवध या काव्यांतील चित्तवेधक पदलालित्यानें व कल्पनावैभवानें मन आकृष्ट केल्यामुळें त्या काव्याचा कर्ता भास्करभट्ट बोरीकर यांच्या चरित्राविषयीं व इतर काव्यांविषयीं साहजिकच माझ्या मनामध्यें जिज्ञासा निर्माण झाली होती. कर्मधर्मसंयोगानें रितपूरच्या पहिल्या फेरींतच तेथील प्रसिद्ध विद्वान महंत श्रीयक्षदेव महानुभाव यांच्याकडून ' भानुविजय ' ग्रंथ मला मिळाला. भास्करभट्टाचें चरित्र विस्तृतपणें वर्णन करणारा हा ग्रंथ त्यावेळेपर्यंत इतर कुणासच पहावयास देखील न मिळाल्यामुळें तो माझ्या हातीं पडतांच अर्थातच मला फार फार आनंद झाला. मला वाटलें आपल्या संशोधन-कार्याला केवढा शुभ शकुन झाला हा ! अगदीं दरिद्र्याला अकस्मात् चिंतामणि लाभल्याच्या भाग्याचा भास त्यावेळीं झाला. त्यांतील वृत्तांत भराभर वाचून काढून, त्याच्या सत्यासत्यतेच्या विशेष विचिकित्सेंत न पडतां, मूळांतील माहिती जशाच्या तशाच स्वरुपांत अगदीं थोडक्यांत 'विस्तारां'तून[1] मी वाचकांसमोर ठेवली. भास्कराचें कूळ, जन्ममृत्यूचे शक, नात्यागोत्यांतील मंडळी इत्यादि संबंधीं बरीच माहिती भानुविजयांत होती म्हणून मी भास्करभट्टाचें विस्तृत चरित्रच लिहिण्याचें ठरविलें. आणि त्यासाठीं भानुविजयाच्या पोथीचा संशोधनदृष्ट्या अभ्यास करूं लागलों. तों काय ? सर्वच अंधार ! मानलेला चिंतामणी अखेरीस कांचमणीच ठरला. मला अत्यंत वाईट वाटलें. प्रस्तुत ग्रंथ मौलिक,- खरा व अर्थातच जुना असेल या माझ्या कल्पनेला पुरावा मिळवण्यासाठीं मी खूप प्रयत्न केले. पण

---

१. या वृत्तांताच्या विशेष माहितीसाठीं वि. ज्ञा. वि. ऑगस्ट १९३२ पृष्ठ २६५, २६६ पहा.

व्यर्थ. शेवटीं माझ्या इच्छेविरुद्ध– हा ‘ ग्रंथ ’ अगदीं अलीकडचा, म्हणजे नवीन असल्याचें ठरलें. आणि संशोधनकार्यांत अगदीं प्रारंभींच ‘ भानुविजया ’ मुळें आपणांस अपूर्व ‘विजय ’ मिळाल्याचा जो मला आनंद झाला होता तो-पूर्णपणें मावळला.

प्रस्तुत भानुविजयाची पोथी छापून प्रसिद्ध झालेली नसल्यामुळें प्रत्येकाला तिच्या सत्यासत्यतेसंबंधीं स्वतःच निर्णय करणें शक्य नाहीं. तथापि कांहीं स्थूल कारणें समोर मांडून तिच्या नवीनपणाबद्दल वाचकांची खात्री करून देतां येणें मात्र शक्य आहे, आणि आवश्यकही आहे. कारण या एका पोथीतील उताऱ्यांच्या आधारानेंच रा. केशव आप्पा पाध्ये यांनीं कांहीं माहिती दिलेली असून श्री. य. खु. देशपांडे यांनीं व मी स्वतःही एक दोन लेख लिहिलेले आहेत. प्रसिद्ध विद्वान हेमाडपंत यांच्या संबंधीचीं कांहीं विधानें या पोथीवरच आधारलेलीं असल्यामुळें तिचा पाया कसा कुजका आहे हें कळणें अत्यंत आवश्यक होय. मला मिळालेली पोथी या दहापंधरा वर्षांतच

२. हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत यांचें चरित्र. पृष्ठे १३२–१३३; २०१–२०२; प्रस्तुत पुस्तकांत ग्रंथकर्त्यानें भानुविजयाविषयीं फार चुकीची माहिती दिलेली आहे. पृष्ठ १३२ वर भानुविजयाला त्याने भानुविलास म्हटलें आहे तर पृष्ठ २०१ वर भानुविजयाचें कर्तृत्व खुद्द भास्कर ( भानु ) भट्टालाच अर्पण केलें आहे ! ग्रंथांतील अकराव्या अध्यायांतील उतारा आपण उध्दृत करीत असल्याचें आरंभीं लिहून उताऱ्याच्या शेवटीं मात्र १३ व्या अध्यायाचा निर्देश केलेला आहे !! (पृ. २०१-२०२) आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं त्यानें दिलेला उतारा भानुविजयाच्या ११ व १३ या दोन्ही अध्यायांत नसून तो पहिल्याच अध्यायाच्या अगदीं प्रारंभीं आहे !!!

३. भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष १० अंक २ रा. पृष्ठें ८३ ते ८६; ज्ञानेश्वर दर्शन. भाग १ दर्शन प्रवेश. पृ. १४५

४. विश्ववाणी ( नागपूर) डिसें. १९३३ पृष्ठें. ६ ते ८; वि. ज्ञा. वि. ऑगष्ट १९३२ शिशुपालवध. लेखांक १

लिहिलेली असल्याचें तिच्या कागदावरून स्पष्ट दिसून येतें. भानुविजयाची मूळ पोथी अत्यंत जीर्ण झाल्यामुळें तिची नक्कल श्रीयक्षदेवमहंतांनीं करून ठेवल्याचें त्यांच्याकडून कळलें होतें. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं या मूळाचें एखादेंही जीर्ण पान आतां शिल्लक नाहीं ! ही एकच गोष्ट पोथीच्या नाविन्याविषयीं जबर संशय उत्पन्न करावयास पुरेशी आहे. दुसरें असें कीं भानुविजयांतील प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं 'एवं संतमाळांतरगत भानु अक्षाईका प्राकृत आरिख बोली यक्षकृत अग्रहारू श्रोतेया' असा उल्लेख आहे. त्यावरून महानुभाव पंथांतील अनेक संतांचीं चरित्रें या कवीनें वर्णिलेलीं असावींत असें दिसतें. पण उपलब्ध वाङ्मयांत या चरित्रांचा कोठेंच पत्ता लागत नाहीं. 'महानुभाव कविकाव्यसूची'त सुद्धां या संतप्रकरणांचा तर उल्लेख नाहींच नाहीं पण कोणत्याच यक्षदेवनामक कवीच्या नांवावर 'भानुविजया' चाही उल्लेख आढळत नाहीं. एका दृष्टीनें विचार केल्यास प्रस्तुत ग्रंथाची निर्मिती इ. स. १९२४ च्या नंतर सुद्धां झाली असणें संभवनीय वाटतें. कारण या सूचींत शके १७४० (इ. स. १८१८) पूर्वींच्याच काव्यांचा अंतर्भाव केलेला असल्याचें जरी कै. भावे यांनीं प्रस्तावनेंत नमूद केलेलें आहे तरी तें सर्वांशीं खरें नाहीं. 'सूची' तयार करणारास उपलब्ध झालेल्या झाडून सर्व ग्रंथांचा समावेश तींत असावा असें मला वाटतें. कारण तिच्या ६ व्या पानावर उल्लेखिलेले यक्षदेवशिष्य गुलाबसिंह नांवाचे महानुभाव कवि तर आज हयात आहेत ! त्यांच्या नांवावर दिलेलीं नारददर्पहरण व अनंगप्रभाव हीं काव्यें माझ्याकडे दुरुस्तीसाठीं आलीं होती ! जिथें या लहानशा काव्यांचा उल्लेख सूचींत येऊं शकतो तिथें भानुविजयाचा उल्लेख येणें अशक्य नव्हतें ! ज्यांच्याजवळून मला ही पोथी मिळाली त्या श्रीयक्षदेवमहानुभावांचा ग्रंथसंग्रह सूचीकारांना अलभ्य होता असेंही नाहीं. मग या पोथीचा उल्लेख सूचींत कां येऊं नये ? पण तोंपर्यंत हा ग्रंथच मुळीं तयार झाला नसल्यास त्याला सूचीकार तरी काय करणार ? मला स्वतःला तर असें वाटतें कीं भानुविजयकार मुरारी यक्षदेव दुसरे तिसरे कोणी नसून रितपुरचे श्रीयक्षदेव महानुभावच असावेत. ते अत्यंत विद्वान व बहुश्रुत आहेत. त्यांनीं स्वतः बरीचशी ग्रंथरचनाही

पण केलेली आहे. माझ्या मतें कविकाव्यसूचीच्या २४ व्या पानावरील मुरारी मुनी यक्षदेव महानुभाव ( पंजाबी ) हेच असावेत. तेथें त्यांच्या नांवावरील ग्रंथांच्या लांबलचक यादींत भानुविजयाचें नांव नसण्याचें कारणही हेंच दिसतें कीं ही सूची तयार होईपावेतों हा ग्रंथ लिहिलाच गेला नसावा !

भानुविजयाच्या अंतरंगपरीक्षणानेंही, बहिरंगपरीक्षणावरून आलेल्या संशयांनाच बळकटी येते. त्यांपैकीं भास्कराच्या कुलवृत्तान्ताचा भाग महत्त्वाचा आहे. या ग्रंथकारानें आपल्या चरित्रनायकाचा संबंध प्रसिद्ध ज्योतिषी व गणितज्ञ भास्कराचार्य याच्या घराण्याशीं जोडून देण्याचा प्रयत्न केला आहे. पण तो पूर्ण यशस्वी मात्र झालेला नाहीं. भास्कराचार्याची वंशावळ देणाऱ्या पाटणच्या शिलालेखांतील मजकुर मराठींत रूपांतरित करून शेवटीं त्याला त्यानें स्वतःची पुस्तीही जोडली व नलचंपूकार त्रिविक्रमाची वंशावळ थेट शिशुपालवधकार भास्करभट्ट बोरीकराशीं आणून भिडविली. तसें करतांना ' श्रीमन्महेश्वराचार्यस्ततोऽजनि कवीश्वरः ' या मूळांतील ओळीचा ' महेश्वराचा पुत्र कवीश्वर पंडित ' असा त्यानें अर्थ केलेला आहे ( पहाः प्रभाकराचा मनोरथु : तयाचा महेश्वरू पुनितु : तयाचा कवीश्वरू पंडितू : वेदांतियेः भानु. वि. अ. १–३) पण तो चुकीचा आहे. कारण मूळ श्लोकांतील ' कवीश्वर ' हा शब्द श्रीमहेश्वराचार्याचें विशेषण असल्याचें स्पष्ट दिसतें. शिवाय महेश्वराचा पुत्र भास्कराचार्य ज्योतिषी याचा त्यानें स्वतंत्र उल्लेख मुळींच केला नाहीं. तर महेश्वराच्या पदवीलाच महेश्वराचा पुत्र मानण्याची चूक त्यानें केलेली आहे. भानुविजयांतील वंशावळीविषयीं संशय उत्पन्न करावयास ही पुरेशी जागा आहे. तसेंच आपला भास्करभट्ट हा कासारबोरीचा असल्यामुळें त्रिविक्रमालाही भानुविजयकर्त्यानें कासारबोरीकरच बनविलें आहे. (पहा : सह्याद्रीचिये पाठारीं :

५. भानुविजयांतील ही चूक श्री. श्रीपाद महादेव वर्दे यांनीच प्रथम माझ्या लक्षांत आणून दिली. याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. या वंशावळीसंबंधी विशेष विस्तारपूर्वक विवेचन वाचकांनी त्यांच्या ' शिशुपालवध व प्रो. कोलते ' या लेखांत पहावें. ( वि. ज्ञा. वि. वर्ष ६४. अंक १ ला.)

त्रिविक्रमाची जन्मपुरीः पुनित गांवो कासारचोरी : तीर्थ गंगे उत्तरे : भानु. वि. अ. १–१ ). पण याला दुसरा कशाचाच आधार नसल्यामुळें त्यावरून आपल्या चरित्रनायकाचा संबंध या प्रसिद्ध घराण्याशीं जोडण्याचाच लेखकाचा उद्देश दिसून येतो. श्रीगोविंदप्रभूच्या मृत्युसमयीं झालेल्या वादविवादांत ग्रंथकारानें तेरा आम्नायांचा उल्लेख केलेला आहे तो तर उघड उघड चुकीचा आहे. कारण त्यावेळीं हे आम्नाय निर्माणच झाले नव्हते. या अनेक कारणांवरून भानुविजय हा ग्रंथ जुना तर नाहींच नाहीं उलट तो अलीकडचा असून त्यांतील माहिती बनविलेली आहे असें कोणाच्याही सहज लक्षांत येऊं शकेल.

## श्रीनागदेवाचार्य चरित्रांतील एक उतारा.

जी गोष्ट भानुविजयाची तीच नागदेवाचार्य चरित्रांतील एका उताऱ्याची आहे. भास्करभट्टाच्या चरित्राचें साधन म्हणून या चरित्र–ग्रंथाला बरेंच महत्त्व आहे. किंबहुना त्याच्या चरित्राची माहिती या पोथींतून जशी मिळते तशी ती इतरत्र कोठेंच आढळत नाहीं. यांतील आख्यायिकांवरच रा. वामनराव देशपांडे यांनीं आपल्या एका लेखाची इमारत उठवली आहे. त्यावेळीं त्यांना हें उतारे एका पंथीय विद्वानाकडूनच मिळाल्याचें निश्चित समजतें. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं भास्कराच्या पितापितामहादिकांची माहिती व भास्कराच्या बाल्याचा वृत्तांत देणारी त्यांतील एक स्मृति अगदीं बनावट आहे. तिची आदि 'मातापुरीं कवीश्वरोद्ग्रहणिके राघवभट्टे मध्यस्थस्थलग्रहणें नारायण दीक्षितादि सकल विद्वांसा पराभऊनि कवीश्वरा तीर्थाधिकारू जैतपत्रें देणें' अशी असून तींत भास्कराची पूर्वपीठिका बालपण, विवाह, काशीयात्रा इत्यादि अनेक गोष्टी आलेल्या आहेत. पण हा सर्व भाग नवीनच बनविलेला आहे असें स्पष्ट दिसतें. कारण श्रीनागदेवाचार्य चरित्राच्या कोणत्याच पोथींत वरील सविस्तर वृत्तांत देणारी आख्यायिका सांपडत नाहीं. वर दिलेल्या आदीची स्मृति एका ग्रंथांत आहे

६. वि. ज्ञा.वि.ऑक्टो.१९२८.'शिशुपालवधकर्ता भास्करभट्ट कवीश्वराचार्य'

७. परिशिष्टांतील २ रा. उतारा पहा.

यांत शंका नाहीं. पण तिच्यांत भास्कराची वर निर्देशिलेली माहिती मुळींच नाहीं. तिचा आरंभच मुळीं ' माहोरीं कवीस्वरोद्ग्रहणिके राघवभटीं मध्यस्थळग्रहणें वीद्वांसु पराजयोः कवीश्वरां जैतपत्र देणेः ॥ एक वेळ माहोरीं कवीश्वरबासांसि आन वीद्वांसांसि वादु पडीला : तंव तेणेंचि काळें... " असा झालेला आहे. त्यांत भास्कराच्या बालपणाचा वृत्तांत तर नाहींच नाहीं पण त्याला देवदेवेश्वर संस्थानाची वृत्ति शिष्यपरंपरेनें कायमची मिळाल्याचाही वृत्तांत नाहीं. शिवाय ही आख्यायिका नागदेवाचार्य चरित्रांतील नसून ती वृद्धाचारांतील आहे. भास्कराच्या ग्रंथांच्या कालनिर्णयाच्या दृष्टीनें हा मुद्दा मला विशेष महत्त्वाचा वाटतो. या दोहोंची अगदीं स्वतंत्रपणें तुलना करून पाहण्यासारखी आहे. पहिला उतारा ( प्रक्षिप्त ) परिशिष्टांत दिलेला असून दुसरा याच प्रकरणांत पुढें आलेला आहे ( वृद्धाचार ८६ ) म्हणजे त्यावरून या नवीन बनावट आख्यायिकेंतील कोणता भाग खरा आहे हें कळेल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे भास्कराचा पूर्ववृत्तांत त्याच्या विवाहाविषयींची माहिती, काशीयात्रा, कारागृहवास, त्यांतून श्रीचक्रधराच्या कृपेनें सुटका, व देवदेवेश्वराची प्राप्ति ह्या सर्व गोष्टी येथून तेथून धादांत खोट्या आहेत. भानुविजयामध्यें ह्यांचा उल्लेख आढळतो. त्यावरून माझा तर्क असा धावतो कीं हे दोन्ही ग्रंथ, गद्य-पद्य-एकाचवेळीं कांहीं विशिष्ट हेतूनें तयार केलेले असावेत. भास्करभट्टाचा कारागृहवास व त्यांतून श्रीचक्रधरांनीं त्यांची सुटका करणें ह्या गोष्टी तर पूर्णपणें बनावट असल्याचें सहज सिद्ध करतां येतें. एक तर कोणत्याच पोथींत त्यांचा उल्लेख आढळत नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट विरोधी विधानेंही आढळतात. उदाहरणार्थ भास्कराच्या अनुसरणासंबंधीं स्मृतिस्थळांत असलेला उल्लेख पहा. " बोरीकरां भानुभट्टा अनुसरण :॥: ऐक वेळ बोरीकरां भानुभट्टां श्रीनागदेवाचार्यां दर्शण जालें : कवणी परीं जालें तें नेणीजे " यावरून नागदेवाचार्यांच्या दर्शनानंतरच भास्करानें महानुभाव

८. वृद्धाचारांतील हा उतारा याच प्रकारणांत पुढें आलेला आहे.

९. नागदेवाचार्य चरित्राच्या पोथलाच ' स्मृति ' ' स्मृतिस्थळ ' अशी सांप्रदायिक नांवें आहेत.

पंथांत प्रवेश केला हें स्पष्ट दिसतें. शिवाय कारागृहवासांतून श्रीचक्रधरानें स्वेच्छेनें केलेल्या भास्कराच्या सुटकेचा वृत्तांत इतका पौराणिक स्वरूपाचा आहे कीं त्यांवर विश्वास बसणें शक्य नाहीं. तिसरी गोष्ट अशी कीं जिथें भास्कर हा मुळीं बंदिखान्यांत पडलाच नव्हता तिथें–श्रीचक्रधरस्वामी झाले तरी त्याची सुटका करणार कशी ? देवदेवेश्वर संस्थानाचा अधिपति त्र्यंबकशास्त्री, त्याची पत्नी भानुमती, त्या दोघांची सुशील व सद्गुणी कन्या सरस्वती, तिचा भानुभट्टाशीं विवाह, नवस फेडण्यासाठीं या दंपत्याचें काशीस जाणें, तेथें सरस्वतीचा व तिच्या पुत्राचा मृत्यु, भास्कराचें निराशवृत्तीनें परत फिरणें, उज्जयिनी येथील अधिकाऱ्याकडून त्याला बंदिवास घडणें व तेथून श्रीचक्रधरानें त्याची सुटका करणें ह्या सर्व कथाभागाला, भानुविजय व उपरोक्त आख्यायिका या दोन अविश्वसनीय व बनावट पुराव्यांखेरीज इतरत्र कोठेंच आधार सांपडत नाहीं. आणि म्हणून तो सर्व खोटा आहे–तयार केलेला आहे असें मला वाटतें. पंजाब–कुळींचा वृद्धाचार, कवीश्वर–जामोदेकर–वर्णन इत्यादि पोथ्यांतील दिलेल्या समर्थनपर ओव्यांची निपज सुद्धां वरील दोन पुराव्यांप्रमाणेंच झालेली असावी. या पोथ्या आज पहावयास मिळत नाहींत. अर्थात त्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं. वर दिलेल्या एका किंवा अनेक खोट्या पुराव्यांवर विश्वास ठेवूनच रा. वामनराव देशपांडे व मी स्वतः विविधज्ञानविस्तारांतील ( आक्टो. १९२८ व आगस्ट १९३२ ) भास्कराच्या चरित्राविषयींचे लेख लिहिले होते.[१०] ते अर्थातच आतां चुकीचे ठरतात. इतःपर अभ्यासकांनीं त्यांतील सर्व कथाभागावर विश्वास ठेवूं नये ही सूचना या ठिकाणीं देणें अवश्य वाटतें.

---

१०. म. सा. भाग १ पृष्ठें ८५-८६ यांतील भास्कराची चरित्रात्मक माहिती कै. भाव्यांनीं, त्यांना मिळालेल्या वरील उताऱ्यांतील माहितीवरूनच दिलेली असल्याचें समजतें. अर्थात तीही चुकीची आहे हें सांगावयास नकोच. श्री. पांगरकरादिकांच्या ग्रंथांतील माहितीही ( म. वा. इ. खंड १ पृष्ठें ४२७-४२८ आतां दुरुस्त करून घेणें अवश्य आहे. )

## विश्वसनीय उपलब्ध साधनें

भास्कराच्या चरित्रासंबंधीं विश्वसनीय अशी माहिती आपणांस प्रामुख्यानें श्रीनागदेवाचार्य–चरित्र व वृद्धाचार या दोनच ग्रंथांतून काय ती मिळते. यांत, महानुभावांच्या चरित्रग्रंथांतील ' इतिहास ' नामक प्रकरणांतील माहिती व साती ग्रंथांच्या तृतीय शोधनीच्या टीपग्रंथांतील उद्धवगीतेच्या व शिशुपालवधाच्या पूर्वपीठिकेंत आलेली अगदीं थोडी माहिती मिळवली म्हणजे आटोपलें. या शिवाय इतरत्र भास्कराच्या चरित्राची माहिती निदान आज तरी मिळूं शकत नाहीं. ह्या सर्व माहितीच्या आधारें आपल्या कवीचें त्रोटक चरित्र मी पुढें देणारच आहे. पण तत्पूर्वी वरील साधनें जशाच्या तशा स्वरूपांत येथें देणें मला अवश्य वाटतें. याचा एक फायदा असा कीं हे उतारे मूळ स्वरूपांत अभ्यासकांच्या समोर असले म्हणजे त्यावरून त्यांना स्वतंत्र दृष्टीनें कवीच्या चरित्राविषयीं व चारित्र्याविषयीं तर्क करतां येतील आणि अनुमाने बांधतां येतील. शिवाय प्रस्तुत पुस्तकाच्या पुढील भागांत अनेक ठिकाणीं या उताऱ्यांचा मी उपयोग करून घेतलेला असल्यामुळें, त्यांच्या साह्यानें मी केलेल्या विधानांच्या वाजवीगैरवाजवीपणाविषयीं सुद्धां अभ्यासकांस खात्री करून घेतां येईल. भास्कराच्या ग्रंथकर्तृत्वासंबंधीं आलेले उल्लेख इतरत्र ( प्रकरण ३ ) उध्दृत करणें अवश्य वाटल्यामुळें त्यांचा समावेश चरित्राच्या या प्रकरणांत केलेला नाहीं. तद्व्यतिरिक्त इतर माहिती देणारे उतारे पुढें दिलेले आहेत. ते येथें उध्दृत करतांना नागदेवाचार्य–चरित्र व वृद्धाचार यांतील त्यांची क्रमवार संगति जशीची तशीच कायम ठेवली आहे.

### नागदेवाचार्य–चरित्रां ( स्मृति स्थळां- ) तील उतारे

**बोरीकरां भानभटां अनुसरणः ॥** ऐक वेळ बोरीकरां भानभटां ( भटोबासां ) चें दर्शन जालें: कवणी परी जालें तें नेणीजे : भटोबासांपासुनि श्रवण जालें : भीक्षा केली : भटोबासा थोर पढीयेंति तयाचे आधील गुरु तयां नांव केसवाचार्ये : मग प्रकरणनुरूप भटोबासीं भानभटांचें नाम कवीस्वर ठेवीलें : तैसेंचि प्रकरणानुरूप ऐसें म्हणति : ।। ६५ ।। ५५।।

**भटोबासां कवीस्वरा जीज्ञासा उद्गृहणीके केसवदेवीं कवीश्वरां कोपणें :** ॥ ऐक वेळ भटोबास धर्मवार्त्ता करीत असतिः तीये धर्मवार्त्तेसि प्रधानत्त्वें भटोबासांसि कवीस्वरबास बोल्त असति : आक्षेपीं परीहारीं थोरि चर्चा करीत असति : तयात्ररुनि केसोबासीं कवीस्वरबासांतें म्हणितलें : " भटो ! अधीकरणेसीं इतुका तर्क वाढवितां दुषण असे : अधीष्टानीं प्रसन्नता जाए : ऐसेयापरी काए अर्थसीधी होइल ? : भटोबासांचें बोलणें तें ईश्वरवाणी कीं : तें आइकीलें तैसें सीरसां नमस्करुनि घेयावें : न परीसवें तरि आपणचि वीमर्सावें घेयावें : घोकावें : मग अधीकरणीं वर्त्तलेयां काळें-करुनि उमटैल : " ऐसें कवीस्वरां केसोबास कोपले : ॥ १२० ॥ २३७॥

**कवीस्वरबा झोळी प्रक्षाळणीं केसवाचार्यें तृतीय श्रृंगानुवादें उद्गृहणीका-पूर्वक तृतीय-श्रृंग-प्रतीष्टा :** ॥ कवीस्वरबासीं भटोबासांपासि भीक्षा केली : केसवाचार्ये ते कळंकीमार्गिचे आचार्ये : ते पूर्वि कवीस्वरबासांचे गुरु : एक दी कवीस्वरबास गंगेकडे झोळी प्रक्षाळावेया आले : तंव केसवाचार्ये पैलाकडोनि मार्गें एतां भेटले : आन उभयां ठाकोनि केसवाचार्यीं म्हणितलें : " भटो ! तूं एसणा वीद्वांसु : आन आमतें सांडुनि नागदेवभटांपासि आलासि : तरि काइ तुज तृतीय श्रृंग नीगालें ? : " ऐसें केसवाचार्ये कवीस्वरातें कटाक्षुनि म्हणितलें : तंव कवीस्वरबासीं म्हणितलें : " मां नीगालें कीं नाहीं ऐसें पाहा ना कां ! : " तंव केसवाचार्यीं म्हणितलें " तरि कैसें नीगालें ? :" यावरि उघानी प्रवर्तली : केसवाचार्ये नीरुत्तर केले : मग कवीस्वरबासीं ततक्षणींचि श्लोकु केला : श्रोतंचित्परतःप्रमाणमिहयन्निर्वेदमूळास्मृतिर्नान्योज्ञानविधानशेषयतिनाक्काप्यर्थवादःसतां ॥ मानुष्याभ्यधिकृत्यतपराधिकरनं न्यायैकमाशाश्रयंभाट्टंदर्शनमद्भुत प्रतिपदं धर्मोक्तिगीतार्थवत् ॥ चेतश्चितयचित्परंचितिहरं चिच्चीतनंचिन्मयंहोहंमुंचमनोमनोभव ( म ) हाकूपारपारंतरः ॥ अंतःकोशमकोशनिकरंसन्मूळमुन्मूळिनंजीवजीवपतेजगज्जनिकरचक्रेश्वरंतंपरं ॥ ऐसे श्लोक म्हणितलें : ते आइकोनि केसवाचार्यीं म्हणितलें : " होऐ तृतीये श्रृंग नीगालें ! : तरि आतां चाल नागदेवभटापासि : मज दाखवि : त्यांतें वीनवि : मग मीही भीक्षा करीन : " तें कवीस्वरबासीं मानीलें : ॥ २११ ॥ ११६॥

**तथा भेटी कवीस्वर-वीज्ञापनीं भटोबास-भीक्षादानीं मूळवाक्य श्रवण करणीं सीवसूत्रानुवादें भटोबासीं सीवसूत्र नीषेधें ईश्वरूवाणी प्रसंसाः** ॥ मग कवीस्वरबासीं केसवाचार्यातें भटोबासांपासि आणीलें : भटोबासां भेटि जाली : मागील अवघे सांघीतलें : मग कवीस्वरबासीं केसवाचार्याकरवी भटोबासांतें साष्टांग दंडवत घालविलें : आन म्हणितलें : " भटो ! केसवाचार्ये म्हणत असति 'मीं भीक्षा करीन :' तरि यां करवीं भीक्षा करवावी : " भटोबासीं म्हणितलें : " नको गा भटो ! हा अनधीकारी असे : याकारणें गोसावीयांचा दारवठा नुघडे गा ! : " तंव कवीस्वरबासीं म्हणितलें : " भटो ! मजकारणें गोसावीयांतें वीनवावें : " म्हणौनि कवीस्वरबासीं साष्टांग दंडवत घातलें : मग भटोबासीं कवीस्वरांतें उठउनि केसवाचार्यासि श्रवण केलें : मग भीक्षा करवीली : कांहीं नमस्कारावेया दीधलें : एक दीं तयातें मूळमहावाक्य घोकवीत होते : तंव केसवाचार्यीं म्हणितलें : " भटो ! वीचारुनि पाहतां हें आमचेया सीवसूत्रासि मीळत असे : " तंव भटोबासीं म्हणितलें : " जळो जळो तुझें सीवसूत्र ! : घाली पाणीयांतु ! : ऐसे तयांवरि कोपले ! ॥ २१२ ॥ ११७॥

**तथा प्रसाद-ग्रहणीं सास्त्राभिमानियें बोधहरणानुवादु :** ॥ यावरि भटोबासीं केसवाचार्यातें म्हणितलं : " आतां तूं जाए : माझें आहे तें दे : " मग कांहीं नमस्कारावेया दीधलें होतें : तें हीरुनि घेतलें : आन दवडीलें ! : तंव जातां केसवाचार्यें म्हणितलें : " हें भटो ! तुम्हीं घेतलें : परि माझीए हृदएं असे तें कैसेनि घेयाल ? : " तंव भटोबासीं म्हणितलें : " माझें अभीमानीयें हीरैल ! : " मग ते गेले : ॥ २१३ ॥ ११८॥

**वीद्वांस उद्‌गृहणीके सींपे व्यापारीं मध्यस्थळ-ग्रहणीं बोरीकरभानु अनुवादु :** ॥ एक दी भटोबास बैसले असति : तंव ऐकु वीद्वांसु आला : तो भटोबासांसि चर्चा करुं लागला : चर्चा करीतां तेणें भटोबासातें म्हणितलें : " हें ऐसें न घडे : हें ऐसें नव्हे कीं : " तेव्हेळीं कवीस्वरबास इतुकेया दुरि कांहीं सीवणें करीत होते : तयांसि तयांवरि लक्षुचि नाहीं : मग तेथौनि कवीस्वरबासीं म्हणितलें : " हें कैसें न घडे ? : " तंव वीद्वांसें पाहुनि म्हणितलें :

" मां यांतु तुम्हीं काइ जाणा ? : " तंव भटोबासीं म्हणितलें : "हा कैसा नेणें ? हा बोरीकर भानु नव्हे ? : यासी बोला : " मग तो कवीस्व ( र ) बासासी चर्चा करुं लागला : तो कवीस्वरीं नीरुत्तर करूनि आडीला : मग तयांतें थोर आश्चर्ये जालें ! : ॥ २१४ ॥ ११९"

**तथा मठद्वारीं गंगे पुराणकथनीं स्त्रीघटारोहणीं सभार पुरुषाद्यकर्षणीं श्रीभागवत श्रीगीताव्याख्यानानुज्ञा :** ॥ एक दीं नींबा मठापुढां गंगेसमीपचि कवीस्वरबास बैसले होते : तीया पुराणे म्हणत होते : तें आइकुनि लोकु वेधला : पाणीमठां बाइला पाणी वाहात होतीया : तीया वेधलीया : त्यांचीया डोइचीया घागरी डोइएसीच्चि ! : आन पुराण आइकति ! : दादुलेयांचीए डोइए कडबेयांचे भारे ! : ते तैसेच्चि आइकति ! : तेलीयाचीया गाडीया : गांवीचे महाज ( न ) ऐसे अवघे नगरीचे लोकु रसवृती वेधले : ऐसे कवीस्वरबा पुराण म्हणताति : तंव कव्हणीं एकीं येउनि भटोबासांपुढां सांघीतलें : " कवीस्वरांचेया पुराणासि अवघा लोकु आला : वेधला असे : मग भटोबासीं म्हणितलें : " काइ जालें या भटोसि ? : जा गा ! : बोलावा : " म्हणौनि बोलाउं पाठवीलें : तंव तंव तेहीं ते आकर्षिलें असे : मग भटोबासीं म्हणितलें : " भटो ! तुज जरि ऐसें व्यसन : तरि मजपुढां श्रीभागव ( त ) गीता म्हण : " तें कवीस्वरीं मानीलें : मग तैंलागुनि कवीस्वरबास भटोबासांपुढां श्रीभागवत अती रसवृती व्याख्यान म्हणति : तेणें भटोबासांचें द्रव्य ( द्रव ) : आन चंद्रमए होऐ ; ऐसें कवीस्वरबासीं भटोबासांपुढें श्रीभागवत वाखाणीलें : ॥ २१५ ॥ १२०"

**तथा भास्कर गीताव्याख्यानकरणीं चंद्रमए अंतःकरण कथनीं हरीभटां श्रीगीता व्याख्याना ज्ञान :** ॥ कवीश्वरबासां श्री भागवत वाखाणुं सरलें : मग भटोबासांतें म्हणितलें : " भटो ! आतां श्रीगीता-व्याख्यान म्हणों ? : " तंव भटोबासीं म्हणितलें : " तूं नको म्हणों : तूं म्हणतासि : आन माझें अंतःकरण अवघें चंद्रमए होतें ! : आन बाइयाचा व्यापारु अवघा प्रतिबंधतो ! : ऐसा रसु वोडवतो ! : " तंव कवीस्वरबासीं म्हणितलें : " तरि हरी करवी म्हणउं ? : " " हो कां ? : " म्हणौनि भटोबासीं मांनीलें :

मग कवीस्वरबासीं वांकलेया हरीभटातें म्हणितलें : " हरी ! आतां तूं श्रीगीता वाखाणि : " मग वांकले हरीभट गीता वाखाणीति : तयाचा शब्द नावेकु ठसु रसवृत्ती नाहीं : म्हणौनि आइकावेया बहुतेक गुरुकुळ तैसें न बैसे : ऐसी गीता वाखाणीली : तेथ भटोबासीं परीसीली : ॥ २१६ ॥१२१॥

**कवीस्वरबा सौकीर्येत्वें वोलि अथवा त्रीपति दसीयांचीए वाहाणी पांगुरवणें :** ॥ कवीस्वरबास रूपें सुंदर होते : ते संग्रहे वोलि त्रीपति सीवणी आंतु करुनि पांगुरति : आन सावेयाचि सौकीर्ये दीसेति : तें देखुनि एक दीं भटोबासीं म्हणितलें : " भटो ! सौकीर्ये दीसतासि : तुवां वोली अथवा त्रीपति दुसीया वाहीं पांगुरावी : " ॥ मग कवीस्वरबास दसीयाचीया वाहीं वोलि अथवा त्रीपति पांगुरति : ॥ २१८ ॥१२२॥

**कवीस्वरबा वीजनत्रए न पळणीं मठागमनीं भटोबासीं उचीत स्फुरलें म्हणणें :** ॥ एक दीं कवीस्वरबा वीजना गेले : ऐकि ठाइं बैसले : तंव तेथ मुंगीयांची हारी आली : तेथौनि उठीले : आणीक ठाइं बैसले : तंव तेथ सत्वा न एचि : तंव आपुलां मनीं म्हणितलें : " कां पां आजि वीजन पाळे ना : " म्हणौनि बीढारा आले : तंव अभ्यागतें आली असति : मग कवीस्वरबासीं म्हणितलें : " वीजन न पळेचि ते याचि कारणें : " मग भटोबासांपुढां मागील सांधीतलें : भटोबासीं म्हणितलें : " हें तुज उचीत स्फुरलें : " ॥ २१९ ॥७४॥

**कवीस्वरबा केसवाचार्ये भेटि वादनीएमें अवसरोचीत्त स्फुरणीं संसरण-प्रकरण-आक्षेपें केसवाचार्यें उद्गृहणी बाइदेवोबानुवादें : भटोबास-श्रवणें धर्मवार्त्ता :** ॥ हे आदि स्मृति न सोधेचि : ॥ २२० ॥

**श्रवणानंतर कवीस्वरबा पंचश्लोकीं भेटि भटो श्रृंगारीया कवी कथन :** ॥ हें भटोबासीं आइकीलेया उपरि मग कवीस्वरबास पांच श्लोक करुनि भटोबासांचीए भेटीसि आले : भेटि जाली : मग भटोबासा पुढां " चक्रेश्रीमतिगोकुळेनवनवक्रीडासमाडंबर " हें पांच श्लोक म्हणितले मग भटोबासीं म्हणितलें : " भटो श्रृंगारीया कवी कीं गा ! : " ॥ २२१ ॥

**परस्परें कवीत्वोत्कर्ष-दर्शनें भाषाभेदानुवादुः ॥** ऐक वेळ प्रकरणानुरूप भटोबासीं कवीस्वर : केसवदेव : पंडित यांचा कवीत्वोत्कर्ष देखुनि म्हणितलें : " भाटो ( नो) सि मऱ्हाटीया सरळि : केसवदेया संस्कृति सरळि : पंडिता गीति सरळि : ऐकु ऐकु जाणे : ऐकु ऐकु नेणे म्हणा : " ऐसा अनुवादु केला : ॥ २२२ ॥

**प्रतीष्ठानीं भटोबासानुज्ञा भास्करभटीं संन्यासीया पराजयो करणें : ॥** प्रतीष्ठानीं सन्यासी नावेक भटमार्गीचें पैसून्य बोलति : तें कवीस्वरबासीं आइकीलें होतें : मग एक दीं कवीस्वरबासीं म्हणितलें : " भटो! संन्यासियांसि गोठि करूं ? : ते नावेक पैसुन्य बोलताति ! " तंव भटोबासीं म्हणितलें : " भटो ! तूं होउनि नको करूं : तेचि पदन पाडीति तरि करि : " तंव एक दीं कोठें नेणों योग पुरला : मग कवीस्वरबासीं चर्चा करुनि तयांतें नोरुत्तर केलें : सन्यासीया दैन्य जालें : ॥ २३६ ॥ २०२५

**तथा भटोबास–नीराकरणीं महीष–तृण–वीस्तारणीं पींपळेस्वरीं वीद्वांस–प्रयोग–नीषेधें भास्करभटीं कुमति-हरणीं वीद्वांस सारदा अवतार–कथन : ॥** ऐकु वीद्वांस प्रतीष्ठानासि आला : तो म्हणे : " म्यां सकळ वीद्वांसासि तृण देरलें आहे ! : " ऐसें ब्रीद पढवी : परि तयांसि कव्हणी वीद्वांसु बोले ना : मग तो पींपळेस्वरीं पुराण सांघो लागला : भटोबासीं कवीस्वरबासातें वारीलें : " तुवां तीकडे न वचावें : " परि कवीस्वरबास भटोबासां अपरोक्ष तेथ पींपळेस्वरां गेले : तंव पींपळेस्वरीं ब्राह्मणांची सभा घनदाट बैसली असे : तो वीद्वांसु पुराणु सांघतु असे : तंव कवीस्वरबास द्वारशंखेसी टेकुनि पुराण आइकों लागले : तंव ऐकीं ठाइं चुकि देखीली : आन कवीस्वरबासीं म्हणितलें : " अबद्ध अबद्ध अबद्ध ! : त्रीसुधि अबद्ध ! : " म्हणितलें : तंव तेणें म्हणितलें : " ऐसें सामोरें येइ ! : कैसें अबद्ध ? : " मग कवीस्वरबास तयांपासि गेले : बैसले : मग जो श्लोकु वाखाणीत होता तोचि तयाकरवी म्हणवीला : " तो ऐसा नव्हे : " म्हणौनि आपण म्हणितला : तो तयाचां कळासीं बैसला : मग तेणें म्हणितलें : " आतां वाखाण : " आन कवीस्वरबासीं श्लोकु वाखाणीला :

आन तयातें म्हणितलें : " कां हा अर्थु जाला ? : " तेणें म्हणितलें : " हो जाला : " तंव कवीस्वरबासीं म्हणितला : " ना अर्थु नाहीं जाला : " " तो कैसा ? : " म्हणौनि आणीकी परी वाखाणीला : आन म्हणितलें : " कां आतां अर्थु जाला ? : " तेणें म्हणितलें : " हो जाला : " कवीस्वरबासीं म्हणितलें " ना नाहीं जाला : " म्हणौनि आणीकापरी वाखाणीला : ऐसा परी परी वाखाणीति : आन तयांतें म्हणति : " कां अर्थु जाला ? : " तो म्हणे " हो जाला : " मग तो अर्थ दूषुनि आणीकी परी वाखाणीति : ऐसां कवीस्वरबासीं ऐकु श्लोकु दाहें-दाहे परी वाखाणुनि दाखवीला : मग तेणें वीद्वांसें कवीस्वरबासांतें पुसिलें : " तुम्ही कवण ? : " मग कवीस्वरीं ततक्षणींचि श्लोक करुनि 'मी अमुका' ऐसें उत्तर दीधलें : तो श्लोकु ऐसा : केचित्खंडनगंडदंडितजगद्दीराधिपाःस्फुरतर्काखर्बकुगर्वपर्वतसमारूढात्रिमूढामृशं ॥ काव्यालापकळापकेळिकुशळाःशृंगारवीराकृत्ता केचित्कृष्णकथासुसुंदरमतिस्तद्भास्करोहंकविः ॥ " तो मी कवी भास्करु : " ऐसें सांघीतले : मग तेणें वीद्वांसें म्हणितलें : " तुम्ही मनुस्य नव्हां : तुम्हीं ऐथची अधीष्टात्री देवता मूर्ति जाली माझा गर्व झाडावेया : " तंव कवीस्वरबासीं म्हणितलें : " आम्हीं देवता नव्हों : आम्हीं वेधवंती नागदेवभटाचे : " ऐसा तयाचा गर्व परीहरीला : मग बीढारां आले : सकळजनां थोर आश्चर्ये जालें. ॥२३७॥ २०४॥

**गति गोंदोबा श्रवण :** ॥ नागाइसें कवीस्वरबासांचीं : त्यांची देमाइसें माउसी लागति : गति गोंदोबा नागाइसांचे आजे : ते रामपुरीऐं असति : ते भटोबासांचे सीस्य जाले : एक म्हणति कीती ऐका दिवसां भीक्षा केली : ॥ २४२ ॥ २३८.

## वृद्धाचारांतील उतारे.

**हीराइसाऽगमनीं पंडितीं आसनदानश्रवणें कवीस्वरीं पंडितप्रसंसा :** ॥ एक वेळ पंडितबास बैसले होते तंव हीराइसें आलीं : पंडितबास बैसले होते ते चौघडी उकलीली : आन " एकीकडे बैस " म्हणितलें : तंव हीराइसीं म्हणितलें : " कां तुम्हीचि बैसा : का मज बैसो देया : "

तंव पंडितबास " बैसा " म्हणौनि उठीले : परि तीयें न बैसतीचि : ऐसें कवीस्वरबासीं आइकिलें आन म्हणितलें : परश्रीसंतापाचा ज्वरु । न भोगी ऐसा नीर्मत्सरु नाहीं नरु । एकु पंडित दामोदरु । वांचोनियां ॥ " : ऐसें प्रसंसीलें ॥५॥

**भटोबासनीक्षेपस्थानीं गोपाळपंडित प्रसादकरणीं कवीस्वरीं नीराकरण :** ॥ आनोबासाचें नांव गोपाळपंडित : एक वेळ गोपाळपंडितीं कवीस्वरबासांतें म्हणितलें : " भटांचेया नीक्षेपावरि देउळ करूं ? : " कवीस्वरीं म्हणितलें : " बरवें मां : " आनोबासीं साटि आसु कवीस्वरबासाचां हातीं दीधलीया : कवीस्वरबासीं पाथरवट बोलावीलें : वीचारीलें : आन म्हणितलें : " पंडितो ! देउळ करूं नैए : कव्हणी लींग मांडील : तरि अन्यभजन रोकडे होइल : ना लींग ना मांडीति तरि काळेंकरूनि मेहेबोकड पडतील ! : " ऐसे दूषण दाखवीलें : तें गोपाळपंडितीं मानीलें : मग न करीतीचि : मग कवीस्वरबासीं तें द्रव्य मागौतें आनोबासाचें दीधलें : आन म्हणितलें : " गोपाळपंडितो ! हें द्रव्य देउनि जा : " तंव आनोबासीं म्हणितलें : " हें मज आतां चंडीष कीं ! : " म्हणौनि नेघतीच्चि : ॥ ७ ॥ ५।)

**रुजाभीभूत कवीस्वरां दंतीगोपाळबासीं साडेगांवीं तीर्थवीधी करवणीं कवीस्वरीं तोखणें :** ॥ एक वेळ कवीस्वरबास आन दंतेगोपाळबास अटणा नीगाले : तंव अटणीं कवीस्वरबासांसि असक्ति आली : मग दंतीगोपाळबाएं तयांसि दांडी केली : मग कवणां गांवां नेत होते तें नेणिजे : साडेगावीं देउळापूर्वे पा ( य ) रियांपासि दांडी उत्तरीली : अवघीं देउळ नमस्करीलें : कवीस्वरबासीं दांडीए वरूनि नीडळ खालि करूनि दोहीं हातीं तेथोनिच्चि " गोसावीयांचेया सेवासंबंधासि दंडवत " ऐसें म्हणौनि जए केलें : तंव दंतीगोपाळबासीं म्हणितलें : " कवीस्वर हो ! खालि उतरूनि एकि पाइरी तऱ्ही नमस्करीतां एइल : " कवीस्वरीं म्हणितलें : " हो एइल : " आन कवीस्वर हळुच दांडीएखालि उत्तरले : पहीली पाइरी नमस्करीली : मग अवघीयाचि नमस्करीलेया : मग चौकीं दंडवत घातलें : बैसलें : आन म्हणितलें : " भलें केलें गोपाळा ! : तुवां माझें अव्हेरण चुकवीलें : " म्हणौनि तयांसि हात जोडूनि दंडवत केलें : ऐसें तोखले : ॥ १८ ॥ ८ ५)

**कवीस्वरोपचारीं अकार्यें-कथनीं दंतीगोपाळवा ईश्वरु प्रवृत्ति प्रकटीए करणें :** ॥ एक वेळ कवीस्वरबास आन दंतेगोपाळबास आटणा गेले : कवीस्वरबासांचें देह नावेक तुटले : आन म्हणितलें : " गोपाळा ! आतां फांकणी करूं गा : " तीहीं मानिलें : मग फांकणी केली : मग अती संएमें करूनी कवीस्वरबासांचें देह अत्यंतीक तुटलें : गति कुंठली : एकी कांटीए तळीं पडीले : तंव हींडत हींडत गोपाळबास तया गावासि आले : भीक्षा करूनि वीजना स्वभावें तीएन्चि कांटीएकडे जात होते : तंव कव्हणी एकीं गोपाळबासापुढां सांघीतलें : " तुमचे एक माहात्मे पैलि कांटीएतळीं पडीले असती : " तंव गोपाळबास तेथ गेले : तंव कवीस्वरबास व्यग्र होउनि पडीले असती : " मग गोपाळबासीं तोंडीं उदकाचा बोळा घातला : आन कवीस्वरबा नावेक सावध केले : मग ऐसी वरुती वास पाहीली : तंव गोपाळबासातें वोळखीलें : आन म्हणितलें : " आहा गोपाळा ! माझें अकार्यें जालें : घडीए येकीचा बोलु होता : " म्हणौनि डोळेया अश्रुपात आले : तंव गोपाळबासीं म्हणितलें : " गोसावीयां प्रवृत्ति नाहीं : ऐसें तुम्ही जाणा पां : ऐसिएन्चि काळीं मजसि भेटि केलि : तुम्हीं आम्हांसि बहुतांसि धर्मरक्षण कीं : " मग उपंगळीए घेउनि गावांतु नेलें : तेथ एकीं देउळीं आंथुरण घालुनि नीजवीले : मग गावींचिया लोकांपासि गेले : तयांतें पुसिलें : " एथ कोण्ही वैद्य असे ? ; " तंव वैद्य घोडेया बैसूनि कोठें जातु होता तो तीहीं दाखवीला : " हा नव्हे : पैल वैद्य घोडेया बैसूनि जातु असे : " मग तैसेचि गोपाळबास लाहें लाहें तयापासि गेले : आन घोडें वागें धरीलें : आन वैद्यातें म्हणितलें : " दुष्टें गांजीलें तरि रायापुढां सांघीजे : आन रोगें अधीलें तरि वैद्यापुढां सांघीजे: " म्हणौनि तयापुढां मागील सांघीतलें : तेणें म्हणितलें : " ते कवणी ठाइं असति ? " : " ना ते पैली देउळीं असती : " " चाला " म्हणौनि तो तेथ आला : कवीस्वरबासाचा हातु पाहीला : आन तेणें म्हणितलें : " यांसि रोगु नाहीं : धातुसाम्य असें : एहीं शोखन केलें असे : कवणा कारणें तें हेचि जाणतिं : अन्नेवीण देह पडीलें असे : आतां यांसि तांदुळाचा भातु आन दूध जेउं घाला : " तंव गोपाळबासीं म्हणितलें : " तें तुम्हींचि जाणा : आमतें

कैचें ? : " मग वैद्यें दूधभातु साकर ऐसें तीनि दी पर्यंत पथ्य सूदलें : कवीस्वरबास नावेक सावध जाले : मग गोपाळबासीं म्हणितलें : " कवीस्वर हो म्यां तुमची जाणीव यां पुढां सांघीतली असे : तरि तुम्ही यां प्रति कांहीं बोलावें : " मग कवीस्वरबासीं तयां प्रति कांहीं गीतार्थाची धर्मवार्ता बोलीले ( ली ) : मग तेणें म्हणितलें " मज तम्हीं आपुलीए मार्गिचा उपदेसु द्यावा : " म्हणौनि साष्टांग दंडवत घातलें : तंव कवीस्वरबासीं म्हणितलें " उठा : आतांचि काइ जातु असौं ? : " म्हणौनि उठवीलें : मग एरे दीं त्यातें न पुसत सीवुणचिंचाना नीगाले : अटण करीतां आनोबासांची भेटि जाली : ।।१९।।९।।

**वासुदेवभट प्रस्नकरणीं कवीस्वरीं आनोबा प्रसंषणें : ॥**

एकवेळ कवीस्वरबास एके सांघातिएसीं अटणा नीगाले : अटण करीतां आनोबासांची भेटि जाली : श्रमनीवृति जाली : आनोबास कवीस्वरबासांचे पाय धूं रीगाले : तयांतें कवीस्वरबासीं म्हणितलें : " तुम्ही कैसे पाए धुवाल ? : " आनोबासीं म्हणितलें : " तें कां ना ? " : " तुम्ही एथ उपाधिमंतु : " तंव आनोबासीं म्हणितलें : " तुम्हीं काइं उपाधिमंतु न व्हा? : " तंव कवीस्वरबासीं म्हणितलें : " आम्हां आणीकीं ठाइं उपाधि : तुम्हा एथ उपाधि " : तंव आनोबासीं म्हणितलें : " भलें केलें कवीस्वर हो ! : " म्हणौनि आनोबासीं पाए धुतले : नावेक भरले आन वासुदेवोबासीं कवीस्वरबासांसि प्रस्नु केला : " कवीस्वर हो! आचरतेया पुरुषा सत्वभंगु नव्हता : तरि वीघ्न संपादणें आति कीं नास्ति ? " तंव कवीस्वरबासीं म्हणितलें : " भटो ! हें काइ अणिकीं ठाइं असे ? : हें आनोबा बोल्ती तैंचि जाणीजे कीं : " कवीस्वरबासीं मागीली गावींहूनि भीक्षा करूनि आणीली होती ते संपादीली : मग सपंक्ति जेउं बैसले : तंव आनोबासाचां सांगातीं कवीस्वरातें म्हणितलें : " हा आम्हा प्रसादु देयावा : " म्हणौनि जेवीतजेवीतां भीक्षान्न मागौनि घेतलें : हे खूण आनोबासीं सांघीतली होती : मग रात्रीं अभ्यागत जेवीले : ऐसे त्रीरात्र घातली : मग नीगाले : ।। २० ।।

**ब्राह्मणें भटोबासमार्गमहात्माभोजनीं सहभोजन निष्पन्नु स्वप्नुदर्सन कथनीं कवीस्वरीं तद्भोजन नीराकरण : ॥**

कवीस्वरबास : रामोपाध्य : कान्होपाध्य : परसरामबा हे चौघे पेहरासंगमासि आले : तंव तेथ व्यव्हारा एकु सहश्रभोजन करावेया आला होता : तेण रात्रीं स्वप्न देखीलें : जें : भटमार्गीचेया एका महात्मया जेउं घातलयां सहश्रभोजन होए : म्हणौनि म्हाळसां स्वप्न दाखवीलें : तंव उदयांचि तेण कवीस्वरबासातें देखीलें : साउमा एउनि दंडवत करूनि स्वप्न सांघीतलें : " तरि माहात्मे हो ! तुम्हीं माझें कांहीं जेवावें : " कवीस्वरबासीं म्हणितलें : " घेतों : परि आमचे गुरु पुढें गेले असती : " म्हणौनि नीराकरीलें : नीगाले : ॥ २३ ॥१२५

**माहोरीं कवीस्वरोद्गृहणिके राघवभटीं मध्यस्थळग्रहणें वीद्वांस पराजयो : कवीस्वरीं जैतपत्र देणें :** ॥ एक वेळ माहोरीं कवीस्वरबासांसि आन वीद्वांसासि वादु पडीला : तंव तेणेंचि काळें आनोबास आन राघवभट अटणवीशेषें तेणेंचि प्रांतें आले : ऐसे बोलतबोलतां कवीस्वरबास नावेक आनोजले ऐसें आनोबासीं आइकीलें : मग वीजनीं राघवभटांतें म्हणितलें : " कवीस्वर नावेक आनोजले ऐसे लोकु बोलतु असे : " राघवभटीं म्हणितलें : " हो नावेक दीसत असे : " हें दर्शन कवीस्वरीं वाचीलें नाहीं : ऐसें आम्हीं जाणतों : " मग आनोबासीं म्हणितलें : " कां तुम्हीं हातवसां कां मातें बोलावीतील तरि मी हातुवसीन : ॥ ऐसें म्हणौनि राघवभटातें पाठवीलें : आले : कवीस्वरांसि भेटि जाली : राघवभटीं मागील व्यवस्था सांघीतली : तंव तें अवघें लटीकें : वीद्वांस पराजयोपूर्वक कवीस्वर महोत्कट वादु करीत असती : मग एरें दीवसीं कवीस्वर-बासीं राघव-भटांतें म्हणितलें : " राघवभटो ! आजि तुम्ही बोला " : तीहीं मानीलें : तेंव्हेळीं उदैक बोलाउं आले : कवीस्वरबास तेथ कपाळ गुंडुनि गेले : बैसले : आन म्हणितलें : " माझां आंगीं आजि सुख नाहीं : मज बोलवेना : हे आमचे बुड्डवे ( बडवे ) बोलतील : " तंव माहाजनीं म्हणितलें : " तें तुम्हीं ठाइंचेचि वीचारा : यांचीया हारीं तुम्हां हारि : " कवीस्वरबासीं म्हणितलें : " यांचेनि जैतें तुम्हां ( आम्हां ? ) जैत : " मग राघवभटां आन वीद्वांसा वादु प्रवर्त्तला : वीद्वांसी बोलतां म्हणितलें : " हा आहे मेघलु : "

राघवभटीं म्हणितलें : " मेघलु म्हणजे काइं ? " " ना मीथ्यावादु : " " मीथ्यावादु म्हणिजे ल्टीकें : " ऐसा वादु करूनी राघवभटीं वीद्वांस नीरुत्तर केलें : तेंव्हेळीं माहाजनीं कवीस्वरबासांसि जएपत्र दीधलें : ॥ २६ ॥

**कवीस्वरीं हीरण्यगर्भे महावाक्य-व्याख्यानीं तत्हृदया न व ग मे (?) वाराणसीं गमनकथनीं आनोबाभेटि घेउनि जा म्हणणें :** ॥ हीरण्यगर्भ ते वीद्वांस : एक म्हणति ते राक्षसभुवनीचे : एक वेळ ते कवीस्वरबासांसि भेटले : थोर चर्चा केली : कवीस्वरबासीं ते खंडीले : मग कवीस्वरबासांपासि हीरण्यगर्भहरीबाएं भीक्षा केली : कवीस्वरबास तयांप्रति धर्मनीरूपण करुनि माहावाक्य वाखाणीत होते : तें तयाचिया हृदया नएचि : मग हीरण्यगर्भहरीबायें म्हणितलें : " कवीस्वर हो ! मी आतां वाराणसीसि जाइन : हे माझेया हृदयासि न ये : " कवीस्वरबासीं म्हणितलें : " जाल तरि पारीसनाथाचेया सीरपुरावरुनि जा : तेथ आमचे गुरुभाउ आनोबा असति : तयांसि भेटावें : मग सामोरें जावें : " तेंव्हेळीं ते श्रीपुऱ्यासि ( सीरपुरासि) गेले : आनोबासांसि भेटि जाली : मागोल क्षेमवार्ता सांघीतली : तेंव्हेळीं आनोबायें महेस्वरव्याकरणेंकरुनि महावाक्य तयाचीया हृदयासि आणीलें : तेंव्हेळीं वाराणसीं जातां राहीले : मग आनोबासीं म्हणितलें : " आतां तुम्हीं आपुलिया गुरुपासि जा : " म्हणौनि कवीस्वरबासांपासि पाठवीले : ते आटीए कवीस्वरबासांपासि आले : भेटि जाली : कवीस्वरबासांपासि मागील व्यवस्था सांघीतली : मग कवीस्वरबासीं म्हणितलें : "तुम्हीं कां आले ? तुम्हांसि गोसावीयें जयाचेनि मुखें ज्ञान दीधलें तेचि तुमचे गुरु : तुम्ही तयांचेचि अधीकारी : तुम्हीं तयांपासि जा : " म्हणौनि पाठवीले : ते मागौते श्रीपुऱ्यासि आनोबासांपासि आले : मग तयां नांव हरीबा ऐसें म्हणति : हे वासुदेवभटांहूनि धाकटे : ॥ २८ ॥ १६॥

## ' इतिहास ' प्रकरणांतील उतारा.

५७\ ' गमभटां उपरि बाइदेवबासाचें ती वर्षा देहावसान जालें: बाइदेवबासाऊपरि वर्षा एक केसोबासाचें देहावसान जालें: केसोबासाऊपरि सा मासा

पंडीताचें देहावसान जालें : पंडीतीं देहांती लीळाची पोथी कवीश्वराचा हातीं दीधली : मग जे गुरुकूळ ये ते कवीश्वरासि लीळा पूसपूसों घोकी : ऐसें असता द्रीलीचेनि सुल्तानें चालि केली : तेणें राजीक भेणें कवीश्वर कोकणा गेले : कमळाइसें वाल्हा राहीली : अनोबास झाडीमंडळांतु सीरपूरासि गेले : दंतेगोपाळबास ते कोकणा न वचतीचि : ते घाटमाथाचि राहिले : कवीश्वर कोकणा जाता मार्गी चोर उठीले : तेही कोकणींचा घाट ऊतरता समस्त गुरुकूळ नागवीले : पोथीयाची झोळी परसरामबासापासी होती : त्यांतूनि परसरामबासीं एक पुस्तक काढीले : ते भोइवरि तनात गाळीले : एर जवं गाळावी तंव एणें चोरें परसरामबासाचिये हातीची झोळी आसडूनि नेली : त्यांत आदीसहीत पाच रूपें चरीत्रें प्रकरणाची पोथी स्थानाची पोथी इतुके गेले : मग कवीश्वर कोकणांत गेले : राजक सामलें : देशी सुभिक्ष जालें : मग मागौतें गंगातीरासि आले : जे पुस्तक वाचले होते तेथ रत्नमाला स्तोत्र : ज्ञानभास्कर स्तोत्र : ज्ञानकलानिधी स्तोत्र : नरवीलाप स्तोत्र : नरींद्र कवीचें रुक्मीणी सैवर : पंडीताचें वत्साहरण : सीसूपाळवध : एकादश स्कंध : इतुके तीये पुस्तकी होते : मग स्थीर जालेयानंतरें अनोबास : कमळाइसें : कवीश्वरबास यासी परस्परें भेटि जालि : × × × : मग काळांतरें कवीश्वरांसि देहावसान जालें[११]

## टीपग्रंथ.

शिशुपाळवध ॥ श्री ॥ आधा मुळपीठीका ॥ तरी तेची कैसी : ना कवीश्वरबासीं वोवीबंध शीशुपालग्रंथ : १०८८ : दहासें आठयांसी वोव्या ग्रंथ केला : तो भटीं नीराकरिला : जें माझिया वीरक्ता योग्य नव्हे : म्हणौनि रामदरां एकाद (श) स्कंद केला : ऐसे बारा बंध केले : ते अन्वयस्थळीं आसति : एक म्हणति शीशुपाळ वीरक्ता योग्य नव्हे ऐसे बाईदेवबासीं म्हणितलें : कां रसीक वोडवला म्हणौनि : ॥

११. भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष १३. अंक २. पृ. ५१.

एकादशस्कंध : अ धा कवीश्वरबासीं वोत्रीबंध शीशुपाळग्रंथ केला : तो भटीं नीराकरीला : माझिया विरक्ता योग्य नव्हे : मग रामदरां एकाद ( श ) स्कंध केला : ऐसे बारा बंध केले : ते आन्वेय स्थळीं प्रसीध आसति : आन एक म्हणति शीशुपाळ ग्रंथ विरक्ता योग्य नव्हे ऐसें बायदेवबासीं म्हणितलें : आन कव्हणी एक : इतर वीद्वांस तो परमार्ग उथापन प्रवर्तनीं कवीश्वर वीद्वांस जींकनीं सैह्यसीखरी प्रभामंडळ दर्शनी एकादशस्कंध ग्रंथारंभ केला : तोचि कैसा : ना तो ऐसा : सैह्याचळाचिये चुळुके ( वगैरे ) तोचिग्रंथ रामदरा राहुनि संपुर्ण केला : ।।

## संक्षिप्त चरित्र.

वरील साधनांच्या आधारें भास्करभट्टाचें चरित्र पुढील प्रमाणें अगदीं थोडक्यांत देतां येईल. भास्कराचें मूळ नांव भानुभट असून तो बोरी येथील राहणारा. महानुभाव पंथांत शिरण्यापूर्वी कळंकीमार्गाचा आचार्य असलेला कोणी एक केशवाचार्य हा त्याचा गुरु होता. एके दिवशीं, कोणत्या प्रकारानें कांहीं कळत नाहीं, पण भानुभटास नागदेवाचें दर्शन झालें. पुढें तो नागदेवाचार्यास आपला गुरु करून महानुभाव पंथांत शिरला ( स्मृ. ६५ ) कर्मधर्मसंयोगानें एके दिवशीं त्याच्या पूर्वपंथांतील गुरूची–केशवाचार्याची–व त्याची भेट झाली. या भेटीचा परिणाम असा झाला कीं भानुभटाच्या नवीन गुरूचें शिष्यत्व आपणही स्वीकारावें असें केशवाचार्यास वाटलें. ( स्मृ. २११ ) त्याप्रमाणें भास्कर त्याला आपल्या गुरूकडे घेऊन गेला व केशवाला दीक्षा देण्याबद्दल त्यानें त्यांना विनंति केली. नागदेवाचार्यांची इच्छा नव्हती. पण भास्कराच्या आग्रहास्तव त्याला उपदेश करून आपल्या पंथांत ठेवून घेतलें. पुढें, चक्रधराच्या वचनांवर अढळ श्रद्धा न ठेवतां तो स्वतःच्या पूर्व पंथाचा अभिमान बाळगत असल्यामुळें नागदेवानें त्यास हाकून लावलें. ( स्मृ. २१२; २१३ ) भास्कर हा अत्यंत सुंदर होता. ( स्मृ. २१८ ) त्याच्या शरीरसौंदर्याला तीव्र बुद्धिमत्तेचीही जोड मिळालेली होती. म्हणूनच तो केशवाचार्य (स्मृ. २११),पैठण येथील संन्यासी (स्मृ.२३६) व इतर कांहीं विद्वान,यांचा (स्मृ.२१४;२३७) वादविवादांत सहज पराभव करूं शकला. माहोर येथील जयपत्राचा मात्र खराखुरा अधिकारी

भास्करभट्ट नसून राघवपंडितच आहे हें स्पष्ट दिसतें. ( वृ. २६ ) पण एका विशिष्ट ग्रंथाचा अभ्यास न केल्यामुळेंच भास्कराचा तेथें उपाय चालेना. एरवीं तो विद्वान व वादविवादपटु होता हें इतर आख्यायिकांवरून दिसूनच येतें. विद्वान असल्यामुळें शास्त्रचर्चेची आवडही त्याच्या ठिकाणीं होती. ( स्मृ. १२० ) ईश्वरकृपेनें त्याच्या विद्वत्तेला रसाळ वक्तृत्वाचीही जोड मिळालेली असल्यामुळें आपल्या श्रोत्यांचीं अंतःकरणें तो पूर्णपणें भारून टाकीत असे. ( स्मृ. २१५, २१६ ) शरीरसौंदर्य, विद्वत्त्व, रसिकत्व व वक्तृत्व यांचा इतका सुंदर संगम इतरत्र क्वचितच झालेला आढळेल. आचार्यांच्या हयातींत तो थोडेंफार कवित्वही करूं लागला होता. त्यांत दिसून येणारी त्याची शृंगारपर रचनेची धाटणी पाहून ' शृंघारिया कवी कीं गा ' म्हणून नागदेवानें त्याला गौरविलेंही होतें. ( स्मृ. २२१) आचार्यांच्या हयातींत लिहिलेलीं हीं काव्यें बहुधा मूर्तिवर्णनांतील कांही स्फुट श्लोकांच्या रूपांत असावींत. भास्कर हा कडक विरक्तीचा पुरुष होता. इतर लोकांची उपाधि टाळण्यासाठीं क्वचित त्यानें खोटें बोलण्यासही कमी केलें नाहीं. ( वृ. १९, २३ ) ईश्वरस्मरण करीत करीत या ठिकाणाहून त्या-ठिकाणीं निरंतर भटकत असावें व इंद्रिय–दमन करून शरीराची कोरडी करावी हा त्याचा नियम असे. ( वृ. १९; २० ) तो खरा विरक्त बनल्यामुळें, कोण-त्याही प्रकारचें मानापमानाचें झेंगट आपल्या पाठीमागें लागूं नये म्हणून पंच-कृष्णांतील एक कृष्ण श्रीगोविंदप्रभु व दीक्षागुरु नागदेवाचार्य यांच्यासुद्धां जवळ तो फारसा राहिला नाहीं असें नागदेवाचार्यचरित्र व ऋद्धपूरचरित्र या ग्रंथांवरून अनुमान करतां येतें. त्याच्या मित्रमंडळांत आनोबास, केसोबास दामोदर पंडित व दंतें गोपाळबास यांचा प्रामुख्यानें समावेश होतो. या सर्वांची त्रोटक माहिती स्वतंत्र रीतीनें पुढें देणार आहे.

## तृतीयाचार्य.

कवीश्वर भास्करभट्ट बोरीकर हा महानुभाव पंथाचा द्वितीयाचार्य[१२]

१२. म. म. वा. पृ. १६ ; शिशुपालवध ( मुद्रितप्रत. ) समाप्तिलेख; हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत. पृ. २०९, वगैरे.

आहे असें सामान्यतः मानण्यांत येतें. पण तें चुकीचें होय. वास्तविकरीत्या तो तृतीयाचार्य आहे ही गोष्ट अगदीं सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. चक्रधरानें, महानुभावपंथाच्या आचार्यपदाचा पहिला मान नागदेवास दिला होता. त्यानंतर बाइदेवबासांस ती गादी नागदेवानें स्वतःच अर्पण केली होती हें चरित्रग्रंथांच्या इतिहासप्रकरणावरून सहज दिसून[13] येतें. अर्थात बाइदेवबास हा या पंथाचा द्वितीयाचार्य होय. त्यानंतर आचार्यपदावर अधिष्ठित झालेला भास्कर कवीश्वर हा तृतीय आचार्य ठरतो हें सांगावयास नको. बाइदेवबासाची कारकीर्द अगदीं थोडी असल्यामुळें ती लक्षांत घेतां येत नाहीं असें कोहीं महानुभावांचें म्हणणें आहे. पण तें सयुक्तिक वाटत नाहीं. ऐतिहासिक दृष्टीनें देखील तिकडे दुर्लक्ष करणें इष्ट होणार नाहीं. शिवाय, नाहीं म्हटलें तरी बाइदेवबास हे तीन वर्षेपर्यंत आचार्य होते असें दिसतें. हा काळ कांहीं थोडा नाहीं. म्हणून द्वितीयाचार्याचा टिळा त्यांनाच लावावयास पाहिजे. आणि भास्करभट्टास अर्थात तृतीयाचार्य असेंच संबोधणें योग्य होय.

## यांचीं काव्यें ज्ञानेश्वरपूर्वकालीन नाहींत.

वरील उताऱ्यांवरून दुसरी एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट सिद्ध होते. आपल्या कवीची शिशुपालवध व उद्धवगीता हीं काव्यें अनुक्रमें शके ११९५ व ११९६ अथवा ११९७ सालीं लिहिलीं गेलीं असा सार्वत्रिक समज आहे व तो मुद्दाम करून देण्यांत आलेला आहे असें दिसतें. वरील काव्यांचीं व इतर आनुषंगिक पुराव्यांचीं प्राचीन हस्तलिखिते काळजीपूर्वक तपासून, वरील दोन्ही शक प्रक्षिप्त आहेत असें माझें मत बनल्याचें येथें स्पष्टपणें नमूद करणें अवश्य वाटतें. या प्रश्नांचा ऊहापोह ' कालनिर्णय ' या प्रकरणांत मी सविस्तर

---

१३ " बाइदेवया हा काळ पर्यंत : सर्वज्ञांचया वृत्ती : मीया सर्वज्ञांचा व्यापारू चालवीला : आतां तुवा चालवावा : ......... घाला गा तुम्ही समस्त बाइदेयासी दंडवत : आता समस्त तुम्ही याचीये आज्ञे अनुशे वर्तावें " भा. इ. सं. मं. त्रैमासिक. वर्ष १३. अंक २. पृष्ठ ५१ .

व सप्रमाण केलेला असल्यामुळें त्यांचें येथें विवेचन करीत नाहीं. माझ्या मतें हीं काव्यें शके १२२८ ते १२३१ च्या आंत लिहिलीं गेलीं असावींत. अर्थात् हे दोन्ही काव्यग्रंथ ज्ञानेश्वरपूर्वकालीन आहेत असा जो सर्व अभ्यासकांचा समज झालेला आहे तो पूर्णपणें चुकीचा होय यांत शंका नाहीं. हे दोन्ही ग्रंथ ज्ञानेश्वरोत्तरकालीन असले तरी तेवढ्यामुळें महानुभावीय वाङ्मय ज्ञानेश्वरापूर्वी निर्माणच झालें नाहीं असें मात्र ठरत नाहीं हें लक्षांत ठेवावें. कारण लीळाचरित्रादि गद्यग्रंथ व महदंबेचे धवळे, मूर्तिप्रकाशादि काव्यें माझ्या मतें ऐतिहासिक दृष्ट्या देखील ज्ञानेश्वरपूर्वकालीन सप्रमाण ठरूं शकतात. पण त्याचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. केवळ भास्करभट्ट व त्याचीं काव्यें या संबंधानेंच विधान करावयाचें म्हणजे तो मराठींतील आदि कवि नाहीं व त्याची रचनाही ज्ञानेश्वरपूर्वकालीन नाहीं हें मात्र निश्चित. अर्थात् शिशुपालवध हें मराठींतील पहिलें ललित काव्य होय असें जें मत मी स्वतः[१४] मागें दिलें होतें तें आतां परत घेणें भाग आहे. आद्य ललितकाव्याच्या मानाचें शेलापागोटें आतां नरेंद्रबासाच्या रुक्मिणीस्वयंवरालाच देणें प्राप्त आहे. नवीन संशोधनानें हीं मतें पुन्हा बदलावीं लागतील तर सांगतां येत नाहीं. पण सध्यां उपलब्ध झालेल्या साधनांच्या साह्यानें तरी वरील मतें सप्रमाण ठरतात. आद्य ललितकाव्य कोणतें या संबंधांत फार झालें तर मतभेद होईल, पण भास्कराची काव्यरचना ज्ञानेश्वरोत्तरकालीन असून तो मराठीचा पहिला कवि नव्हे ही गोष्ट मात्र निश्चित आहे. ती बदलावी लागणार नाहीं अशी मला खात्री वाटते.

## शिक्षण

मागील उताऱ्यांवरून भास्कराच्या शिक्षणाविषयीं प्रत्यक्ष अशी फार थोडी माहिती मिळते. गीताभागवतादि ग्रंथांवर व्याख्यान करणारा आपला कवि चांगला संस्कृत पंडित असावा ( स्मृ. २१५, २१६ ) त्यानें केलेल्या नरविलाप या संस्कृत काव्यावरून तर या विधानाविषयीं संशयच उरत नाहीं

१४. वि. ज्ञा. वि. नोव्हें. १९३२. पृष्ठ. ३६५,

( वृ. १० ). गीताभागवतादि पुराण-ग्रंथांप्रमाणें व्याकरणाचाही त्यानें चांगला अभ्यास केला होता असें दिसतें. ( स्मृ. २३७ ) शिशुपालवधावर पडलेल्या माघाच्या छायेवरून त्या कवीच्या काव्याचा भास्करानें आस्वाद घेतलाच होतासें दिसतें. कालिदास जयदेवादिकांचीं काव्येंही त्यांच्या नजरेखालून गेलीं असावींत ( प्र. ५ वें पहा ). शिवाय साहित्यशास्त्र, कामशास्त्र भरतमुनीचें नाट्यशास्त्र इत्यादि ग्रंथांचेंही त्याचें चांगलेंच अध्ययन होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. ( प्र. ५ व ६ ) सारांश एखाद्या सुविद्य पंडिताला लागेल इतकें संस्कृतभाषेचें व तदंतर्गत शास्त्रांचें त्यानें काळजीपूर्वक शिक्षण घेतलेलें दिसतें. उद्धवगीतेंतील ज्ञानाज्ञान प्रकरणाच्या निरूपणावरून श्रीमच्छंकराचार्यांचें ब्रह्मसूत्रावरील भाष्यसुद्धां भास्करानें अभ्यासिलें होतें असें म्हणतां येतें ( उ. ५७४ ओवी ). महानुभावपंथांत शिरल्यानंतर लीळाचरित्रादि ग्रंथांचा सश्रद्ध अभ्यास व पंथीय कवींच्या कृतींचें परिशीलन त्यानें केलें असलें तर त्यांत आश्चर्य नाहीं. चक्रधराच्या लीळा आपल्या शिष्यांना त्यानें घोकविल्या होत्या यावरून त्याला त्या मुखोद्गत येत असाव्या असें वाटतें. नरेंद्राचें रुक्मिणीस्वयंवर व केसोबासाचा मूर्तिप्रकाश या दोन अतीव सुंदर काव्यांचीं त्याच्या स्वतःच्या कवितेवर पडलेली छाया, त्यानें केलेल्या त्या ग्रंथांच्या परिशीलनाची स्वच्छ साक्ष देतच आहे. ( प्र. ५ व ६ पहा ). यावरून त्या-वेळीं प्रसिद्ध असलेल्या महत्त्वाच्या संस्कृत व प्राकृत काव्यांचा त्याचा अभ्यास झालेला होता व तो करण्यासाठीं योग्य व उपयुक्त असें शिक्षण त्याला मिळालें होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं.

## नागाइसा

भास्कराच्या आप्तस्वकीयासंबंधानें, उपलब्ध पण विश्वसनीय अशा पोथ्यांवरून विशेष माहिती मिळत नाहीं. खुद्द त्याच्या मातापितराविषयींची आपली जिज्ञासा तृप्त होणें अशक्य आहे. तथापि नागाइसा नांवाची भास्कराला

एक पुतणी होती हें मात्र निश्चित समॅजतें. नातनागाईसा म्हणून प्रसिद्ध असलेली, नागदेवचार्याची नात व महेश्वर पंडिताची कन्या ही व भास्कराची पुतणी नागाइसा या दोन्ही व्यक्ती निरनिराळ्या आहेत. रा. नी. ब. भालकर यांनीं त्यांना एकच मानलेलें आढळतें. पण तें बरोबर नाहीं. महेश्वराच्या कन्येनें आपल्या आजोबाला– ( नागदेवाला ) गुरु केले होते. अर्थात् ती नागदेवाचीच शिष्या होय. कवीश्वर भास्कराची नव्हे. नाति नागाइसा ही नागदेवाचार्यांची शिष्या आहे तर आपली नागाइसा भास्कराची शिष्या आहे. या नागाइसेला बालवैधव्य प्राप्त झालें होत. पुढें विरक्ति उत्पन्न झाल्यावर तिनें आपल्या काका ( भास्कर ) पासूनच दीक्षा घेतली व पंथांत प्रवेश केला. ही बरीच सुविद्य होती असें दिसतें. ‘ कवीस्वराचा नागाइसीं दुसरी लक्षणें आनिका माळिका आन सप्यापालना आन दुर्भगा हे च्यान्ही प्रमए केलीं : त्यांत माळीका दायीभागवतीं दवडीलिया ’ असा तिच्या ग्रंथरचनेविषयीं सोंगोनासाच्या अन्वयस्थळांत उल्लेख आढळतो. महानुभावपंथाचीं तेरा शकलें झाल्यानंतर परशरामबासानें आपला जवळील प्रसादविशेषांचा विभाग करतांना ‘ उरला वस्त्रप्रसाद तो हि आन दाढेचा विशेष आन तीसरा भाग वस्त्रप्रसाद : ऐसे कवीश्वरबासाची धाडी नागाइसासि दिधला ’ होता. चरित्रग्रंथाच्या अनेक पाठांपैकीं मुनीबा पाठाचा जनक मुनी राघोबास हा या नागाइसाचाच शिष्य होय. सारांश भास्करभट्टाची ही पुतणी आपल्या काकाप्रमाणेंच विद्यासंपन्न असून ग्रंथकर्त्रीही होती. इच्याशिवाय भास्कराच्या इतर आप्तांचा पत्ता लागत नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय.

१५. ‘ कवीश्वरबासाची धाडी ( पुतणी ) नागाइसें : ’ भा. इ. सं. त्रै. वर्ष १३ अंक. २. पृष्ठ ५३.

१६. “ नागाइसें तीये भटोबासांची नाति : महेस्वर पंडितांची कन्या : तयांसि भटोबासांपासौनि श्रवण जालें : अनुसरण : ” ( स्मृ. २१० )

१७. “ पैकी पहिलें प्रमेय कवीस्वरबासांची शिष्या व नागदेवाचार्यांच्या महेश्वरपंडितनामक पुत्राची मुलगी ‘ नाति नागाइसे ’ हिनें लिहिला असून ... ... ( महानुभावांचा एक प्राचीन ग्रंथ. ) महाराष्ट्र ता. २६ ऑगस्ट १९३४.

१८. भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष १३ अंक २. पृष्ट. ५३.

श्री. केशव आप्पा पाध्ये यांनीं आपल्या ग्रंथांत[19] भावेदेवव्यास हा भास्कर कवीश्वराचा (आपल्या भास्करभट्टाचा) थोरला मुलगा असल्याचें नमूद केलें आहे. तें पूर्णपणें चुकीचें होय. तो भास्कराचा पुत्र नसून त्याचा गुरुबंधु असल्याचें दुसऱ्या प्रकरणांत त्यासंबंधीं दिलेल्या माहितीवरून स्पष्ट होईल. 'कवीश्वर भास्कराचार्य यांचे जेष्ठ गुरुबंधु भावेदेवव्यास—' असा या दोघांचा परस्पर-संबंध रा. य. खु. देशपांडे यांनीं असंदिग्ध शद्बांत मांडलेलें[20] असतांना सुद्धां रा. पाध्यांनीं भावेव्यासाला भास्कराचा थोरला मुलगा कोणत्या आधारानें बनविलें कांहीं कळत नाहीं. त्यांनीं आपल्या ग्रंथांत नमूद केलेल्या अनेक[21] चुकीच्या माहितींपैकींच हीही होय. कारण त्यांच्या या विधानाला महानुभाव-पंथाच्या कोणत्याच ग्रंथांत आधार सांपडूं शकत नाहीं.

## शेवटचे दिवस

भास्कराच्या आयुष्यांतील शेवटचे दिवस परिभ्रमणांत गेले असावेत असे दिसतें. दिल्लीच्या सुलतानानें केलेल्या स्वारीमुळें उद्भवलेला उपद्रव टाळ-ण्यासाठीं कवीश्वरबास कांहीं शिष्यांसह कोंकण प्रांतांत गेल्याचा उल्लेख चरित्र-ग्रंथांच्या इतिहासप्रकरणांत आढळतो.[22] तिकडे जात असतांना रस्त्यांत चोरांनीं त्यांवर हल्ला केला व त्यांच्या जवळची चीजवस्त लुटून नेली. त्यांत परशाराम-

१९. हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत. पृष्ठ २०९

२०. म. म. वा. पृष्ठ २१.

२१. यांपैकींच एक चुकीचा उल्लेख असा कीं "कवीश्वर भास्कर... वगैरे प्रतिभासंपन्न महानुभावीय ग्रंथकार यांचा यादव (जाधव) रामदेवराव त्यांचे दरबारांत बहुमान होत असे अशाबद्दल महानुभाव वाङ्मयांत जागोजाग उल्लेख केलेले आढळतात" (हेमाद्रि. पृ. २२) असें रा. पाध्ये म्हणतात. पण त्यांचें हें विधान सबळ पुराव्यानिशीं सिद्ध होऊं शकत नाहीं. भास्करासंबंधींचा उल्लेख—जागो-जाग तर काय पण एकाही विश्वसनीय ग्रंथांत मला आढळला नाहीं.

२२. भा. इ. सं. मं. वर्ष १३ अंक २ पृष्ठ ५३.

बासाच्या हातांत असलेली पोथ्यांची झोळीही गेली. चोर आपल्या आंगावर येण्यापूर्वी परशरामानें मोठ्या युक्तीनें झोळींतील एक पोथी हळूंच जवळील गवतांत लपविली. इतर पोथ्या लपवण्यास मात्र त्याला वेळ मिळाला नाहीं. पुढें, कांहीं दिवस कोकणांत राहून, सर्वत्र शांतता प्रस्थापित झाल्यावर भास्करभट्ट पुन्हा महाराष्ट्रांत परत आले. सुल्तानाच्या स्वारीमुळें इकडे तिकडे पांगलेल्या आनोबास कमळाइसा इत्यादि महात्म्यांची पुन्हा भेट झाली. यानंतर कांहीं काळानें त्यांचा अंत झाला. तो कसा व कोठें झाला याविषयीं निश्चित असें कांहींच सांगतां येत नाहीं. आपल्या आयुष्यांतील शेवटचा काळ त्यानें अष्टी ( अहमदनगर जिल्हा ) येथें काढला असावा असें मानण्यास जागा आहे ( पृ. २८ ) तेथेंच त्याचा मृत्यु झाला असावा असें वाटतें.



## नागदेवाचार्य.

नागदेवाचार्य हा चक्रधराचा प्रमुख शिष्य[1] असून भास्करभट्ट बोरीकराचा दीक्षागुरु[2] होय. त्याचें संक्षिप्त चरित्र देण्यासाठीं नागदेवाचार्य-स्मृतींतील एक उतारा येथें उध्दृत केल्यास काम भागेल.ती स्मृति[3] अशी. "भटोबासां अनुसरण ( तथा ) वीयोग : ।। भटोबासाचे पीते माधवभट : माता आबाइसें ते पुरींची : ( तीयेसीं ) तीघे पुत्र : एकि कन्या : वडील सारंगपाणीभट : तथी[4] कान्होबा : तया धारा भटोबास : भटोबासां धाकुटे वैजोबा : तया धाकुटीं उमाइसें : माधवभट ते काळधर्मासि गेले : वडील सारंगपाणीभट : ते वाटे मारवीले : उमाइसाचे हातें रीतले[5] : तेणें दुखें आबाईसीं रावसगावीं सीद्धनाथीं गुंफा केली : तेथ तीयें असति : तंव रामदेव आले : रामदेवासि भेटी जाली : रामदेव ते गोसावीयांचे : तयापासोनि अवघेयां कांहीं गोमटें जालें : रामदेवीं गोसावीयांचिया सौंदर्ये-लावण्या-अश्वर्याचीया लीळा सांघीतलीया : मग रामदेव गोसावीयांचेया दर्शना नीगाले : रामदेवांतें आबाइसीं म्हणितलें : बा रामदेव हो : आमतें गोसावीयांचेया दर्शना न्या : मग रामदेवासरीसीं आबाइसें : उमाइसें : महदाइसें[6] : भटोबास : ऐसीं गोसावीयांचेया दर्शना नीगालीं : तीयें श्रीनगरासि[7] आली : तेथ भीलमठीं गोसावीयांचें दर्शन जालें : तेथ अधि-

१. लीळाचरित्र पूर्वार्ध. शेवटची लीळा.

२. ना. स्मृ. ६५.४

३. ना. स्मृ. २.

४. याचा अर्थ असा कीं, कांहींच्या मतें वडील पुत्राचें नांव सारंगपाणीभट होतें तर कांहींच्या मतें त्यांचें नांव कान्होबा होतें.

५. हात रीतले= रिक्तहस्ता ( विधवा ) झाली.

६. धवळे लिहिणारी महदंबा.

७. हल्लीचें सिन्नर. ( नाशीकजवळ )

कवि वेध संक्रमला : याउपरि भटोबासां आणिक सा भेटि जालीया : साहा-वीए भेटीं बोध जाला : सातवीये भेटीं खडकुलीयें अनुसरण जालें : च्यारि वरुषें सन्निधान : त्यांतु सा मास श्रीगोविंदप्रभु गोसावीयांचा सन्निधानी गेले : आउठ वरुषें आमचेया गोसावीयांचें : सन्निधान ज्ञान–चरी-तार्थ होआवें (आ) होतें : तंव गोसावीयां अन्य देसा बीजें करावेयाची प्रवृत्ति जाली : मग भटोबासीं वीनवीलें : जी जी : मज कवणासि नीरोवीलें जी : गोसावीयें म्हणितलें : तुज श्रीप्रभुसि नीरोवीलें गा : मग गोसावी बीजें केलें : शके ११९४ श्रीमुखसंवत्सरी माघमासीं सुध चतुर्थि सोमवारीं बीजें केलें : ॥ २ ॥"

वरील स्मृतिवरून नागदेवाचार्यांच्या चरित्राविषयींचा आराखाडा वाचकांच्या डोळ्यांसमोर सहज येईल. या शिवाय त्याच्याविषयींची महत्त्वाची माहिती अशी. नागदेव हा पूर्ववयांत मोठा रंगेल होता. आपल्या केसांची आडवी वेणी घालून व खांद्यावर खांडा टाकून मोकळ्या कासोट्यानें तो नेहमीं फिरत असे. या रंगेल राहणीला अनुरूप अशीं अनेक व्यसनेंही त्याला लागलीं असावींत असें दिसतें. त्याच्या पत्नीचें नांव गंगाइसीं, इच्यापासून त्याला महेश्वर नांवाचा मुलगा झाला. त्यानंतर नागदेवानें चक्रधराजवळ संन्यास-दीक्षा घेतली. तेव्हां चक्रधराजवळ आपला पति परत मागण्यासाठीं आलेल्या गंगाइसाला नागदेवानें एकवेळ संबंध यावा[11] अशी चक्रधरानें त्यांस आज्ञा केल्यामुळें नागदेवाला संन्यासाश्रमांत असतांना केलेल्या या संभोगापासून वैराग्यदेव नांवाचा मुलगा झाला. वस्तुतः चक्रधरानें वरील प्रकारची आज्ञा नागदेवास करावयास नको होती. परंतु त्याच्यापासून गंगा-

---

८. विहंगम. जुलै १९३५. पृष्ठ ६.

९. ढंढाचे 'अन्येक व्यसनीय जाले' विहंगम. कित्ता.

१०. लीळाचरित्र पूर्वार्ध.

११. कित्ता.

इसेच्या पोटीं एक बालक जन्मास येणार असल्याचें विधिलिखित चक्रधराला माहित असल्यामुळेंच त्यानें तशी परवानगी दिली असें महानुभाव मानतात.

## जन्म मृत्यूचे शक.

सांप्रदायिक दृष्टया कां होईना पण नागदेवाच्या जन्ममृत्यूचे शक स्मृतिस्थळांतील एका स्मृतीच्या आधारें ठरवितां येणें शक्य झालें आहे. "शके १२२४ प्लव ( वंग ) संवत्सरीं भाद्रपद वदि येकादसि भटोबासी बीजें केलें : भटोबासाचें अवघें आयुश्य सासटि वरुषें : ६६ : बतीसां वरुषां अनुशरण : च्यारि वरुषें गोसावीयांचें सन्निधान : त्यांतु सा मास श्रीप्रभुचां सन्निधानीं होते : मग गोसावीयां मागां श्रीप्रभुगोसावीयांचां सन्निधानीं वरुषें १४: श्रीप्रभुमागां वरुषें १६ ऐसें सासटि वरुषें राज्य केलें : लीळादानीचें आयुष्य : २४ : वरुषें ।।३५७।।" यावरून नागदेवाचा जन्म शके ११५८, लीळादान शके ११८२, संन्यासदीक्षा शके ११९० व मृत्यु शके १२२४ इतके काळ आपणांस ठरवितां येतात. अर्थात् हे सर्व सांप्रदायिक शक आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या नागदेवाचा संन्यासदीक्षेचा काल ११-९४ ठरतो. तदनुरोधानें जन्म मृत्यूचे शक देखील चार चार वर्षांनीं पुढे ढकलावे लागतात. चौथ्या प्रकरणांत चक्रधराचा प्रयाण-शक निश्चित करतांना केलेल्या विवेचनावरून हा चार वर्षांचा काल कां वाढवावा लागतो हें वाचकांस कळून येईल. तें सर्व विवेचन लक्षांत घेतलें असतां नागदेवाचा जन्म शके ११६२, संन्यासदीक्षा शके ११९४ व मृत्यु शके १२२८ मधें झाला असें मानावें लागतें.

नागदेवाचा मृत्युकाल ठरविण्याचें दुसरें एक साधन उपलब्ध आहे. त्याचा येथें अवश्य विचार केला पाहिजे. रामदेवराव वारल्यानंतर त्याची पत्नी कामाइसा ही सती जाण्यास तयार नसल्यामुळें तिचा पुत्र शंकरदेव यानें तिला बळजबरीनें अग्नींत ढकलून सती जाण्यास भाग पाडलें (ना.स्मृ.१७३).हा प्रसंग घडला त्याकाळीं नागदेवाचार्य हयात असल्याचा उल्लेख त्याच आख्यायिकेंत आहे. त्यावरून रामदेवरायाच्या मृत्युसमयीं म्हणजे शके १२३१ मधें नागदेव हयात होता असें मानावें लागतें. तसेंच वरील शंकरदेवाच्या वधाच्या घटनेचा

उल्लेख स्मृतिस्थळांत येत नसल्यामुळें त्यापूर्वी म्हणजे शके १२३४ पूर्वीच नागदेव वारला असावा. या आख्यायिकेवर व तर्कावर भिस्त ठेवूनच नागदेवाचा मृत्यु शक १२३१ ते १२३४ च्या दरम्यान असावा असें मत रा. वा. ना. देशपांडे यांनीं प्रतिपादिलें आहे. (धवळे. प्रस्ता.) पण मला तें मान्य नाही. कारण या मताला आधारभूत असलेली कामाइसाच्या अग्निप्रवेशाची आख्यायिका ऐतिहासिक दृष्ट्या खरी धरूनच वरील मत बनवावें लागतें. खुद्द रा. वामनराव देशपांडे यांनींच यापूर्वी एकदां 'प्रत्यंतर पुराव्याचा अभावीं तो कितपत खरा आहे हें सांगणें कठीण आहे' (विश्ववाणी डिसें. १९३३. पृ. ६१) अशी कामाइसेच्या वृत्तांतासंबंधीं शंका निर्माण केली होती. पण आतां या प्रसंगीं ती आख्यायिका ते कां खरी धरून चालतात कांहीं कळत नाहीं. एखादा 'प्रत्यंतर पुरावा' त्यांना मिळाला असल्यास तो त्यांनीं विवेचनांत नमूद करावयास पाहिजे होता. केवळ कालगणनेच्या दृष्टीनें पाहिलें तर वरील आख्यायिका ऐतिहासिक सत्याच्या चौकटींत बसत नाहीं. रा. देशपांडे यांनीं 'बिनीचे महानुभाव ग्रंथकार व त्यांच्या कृति यांचे काल ठरविण्यास रस्त्यावरील मैलाच्या दगडाप्रमाणें मार्गदर्शक' मानलेला गोविंदप्रभूचा निधनशक १२०८ हा गृहीत धरून चाललें तरी नागदेवाचा मृत्युशक १२३१ होऊं शकत नाहीं. कारण गोविंदप्रभूंच्या मृत्यूनंतर नागदेव १६ वर्षांनीं मरण पावल्याचें बहुतेक महानुभावीय पोथ्यांवरून कळतें. या बाबतींत मतभिन्नतेला जागा नाहीं. आणि म्हणून १२२४ हाच नागदेवाचा समाधिशक मानावा लागतो. खुद्द रा. देशपांडे यांनीं निश्चित केलेल्या व त्यांना तंतोतंत पटलेल्या गोविंदप्रभूच्या निधनशकाच्या साह्यानें विचार केल्यास वरील आपत्ति ओढवते. अर्थात् १२३१ पर्यंत नागदेव हयात असूं शकत नाहीं. म्हणूनच कामाइसाची आख्यायिका प्रक्षिप्त ठरते. फार झालें तर असें म्हणतां येईल कीं कामाइसाची आख्यायिका खरी असणें संभवनीय आहे. पण त्यावेळीं नागदेवाचार्य हयात असल्याचा उल्लेख मात्र प्रक्षिप्त असावा. एरवीं रा. देशपांडे यांच्या एका निश्चित मताच्या अनुरोधानें ठरूं पहाणारा १२२४ हा नागदेवाचा मृत्युशक किंवा मी ठरविलेला १२२८ हा शक, या दोन्ही शकांच्या आधारानें विचार

केल्यास कामाइसेच्या अग्निप्रवेशाचा व नागदेवाचार्याच्या हयातीचा मेळ बसूं शकत नाहीं. त्यावरून रा. देशपांडे यांनीं जो १२३१ पर्यंत नागदेवाचा मृत्युशक लांबविला आहे तो सयुक्तिक नाहीं असें म्हणावें लागतें व म्हणूनच मी ठरविलेला १२२८ हा नागदेवाचा समाधिकाल बदलविण्याचें मला कांहीं कारण दिसत नाहीं.)

## नागदेवाच्या कर्तृत्वाचें मोजमाप ×

नागदेवाचार्याचें चक्रधरावर आत्यंतिक प्रेम होतें. चक्रधरानेंही या आपल्या सच्छिष्यावर आपल्या कृपेची मायापाखर सदैव घातली. 'अपेक्षा[12] पाखवा देउनि : जे जीव जीववी पक्षिणि : तेवि श्रीचक्रपाणी : पाळिला जो' असें या दोघांच्या प्रेमाचें वर्णन नारायणबास बह्याळिये करतो. परशास्त्राचें सम्यक् ज्ञान नागदेवाला चक्रधरापासून पूर्णपणें झालें होतें. म्हणून शास्त्रज्ञानाच्या दृष्टीनें देखील परम पदाला पोंचलेल्या या आपल्या अत्यंत प्रेमळ व श्रद्धावान शिष्याला चक्रधरानें मृत्युपूर्वी आपल्या इतर सर्व शिष्यांचें व पंथाचें आचार्यपद अर्पण[13] केलें. परब्रह्माचा प्रत्यक्ष अवतार म्हणून मानलेल्या श्रीचक्रधरानें हें अधिकारदान दिलेलें असल्यामुळें व चक्रधराचा प्रत्यक्ष सहवाससंबंध प्राप्त झालेला असल्यामुळें अर्थातच नागदेवाची योग्यता फार वाढली. ग्रंथारंभीं कृपाप्रसाद मागण्यासाठीं नागदेवाला स्तुतिपूर्वक अभिवंदन करणें हें पंचकृष्णांच्या वंदनाइतकेंच महत्त्वाचें होऊन बसलें. यामुळेंच बहुतेक महानुभावीय ग्रंथांच्या सुरवातीला नागदेवाच्या वंदनपर व स्तुतिपर अनेक ओव्या लिहिलेल्या आढळतात. चक्रधराच्या प्रेमाला व आतांपर्यंत झालेल्या सर्व महानुभावीय महात्म्यांच्या आदराला नागदेव पूर्ण पात्र होता यांत शंका नाहीं. आपल्या गुरूच्या विशिष्ट मतांचा व उपदेशाचा प्रसार आपल्या शिष्यमंडळींत नागदेवानें मोठ्या आस्थेनें केला. किंबहुना चक्रधराच्या हयातींत जें कार्य होऊं

१२. ऋद्धपूरवर्णन. १८

१३. लीळाचरित्र उत्तरार्ध.

शकलें नाहीं तें नागदेवानें त्याच्या पश्चात् यशस्वी रीतीनें घडवून आणण्यांत बरीच मदत केली असें म्हणावयास हरकत नाहीं. चक्रधराच्या चरित्रात्मक लीळांची व तात्त्विक विचाररत्नांची शास्त्रीय दृष्ट्या विभागणी करून त्यांना ग्रंथमंजूषेत सांठवून ठेवण्याची जी कामगिरी म्हाइंभट, बाइदेवबास केसोबास इत्यादिकांनीं केली तिचें सर्व श्रेय अप्रत्यक्षपणें या आद्याचार्याकडेच जातें. तसें पाहिलें तर नागदेवानें स्वतः एकही ग्रंथ लिहिला नाहीं किंवा संपादिला नाहीं. पण इतरांनीं जी ग्रंथरचना केली ती त्याच्या नेतृत्वाखालीं केली. चक्रधराच्या सर्व मतांचें यथार्थ ज्ञान झालेला शिष्य त्यावेळीं नागदेवच होता. त्याच्यापासून केसोबासादिकांना ज्ञान झाल्यानंतर ते योग्य रीतीनें ग्रंथरचना करूं शकले. हे सर्व शिष्य आपापलीं लिखितें नागदेवाचार्यास वाचून दाखवीत व चुकलें असेल तेथें नागदेवाचार्य दुरुस्तीही[१४] पण सुचवीत असे. विशेषतः म्हाइंभटानें लिहिलेलीं चरित्रें अशा रीतीनें नागदेवानें मोठ्या कसोशीनें तपासलीं असावींत[१५] असें दिसतें. महानुभावांच्या सर्व धर्मतत्त्वांचा सांठा या ग्रंथांत असल्यामुळें व तो ग्रंथ नागदेवाच्या प्रेरणेनें व देखरेखीखालीं तयार झाल्यामुळें या आद्याचार्यानें बरेंच महत्त्वाचें कार्य केलें असें म्हणतां येतें. एरवीं नागदेव नसता तर महानुभावांची ग्रंथरचना झाली असती कीं नाहीं, व झाली असती तर ती यथार्थ झाली असती कीं नाहीं याविषयीं शंका वाटते. सारांश वाङ्मयाच्या दृष्टीनें, प्रत्यक्ष जरी नाहीं तरी अप्रत्यक्ष रीतीनें, बरेंच महत्त्वाचें कार्य नागदेवानें केलें हें निःसंशय होय. त्याच्या कारकीर्दींत महानुभावपंथाचा फैलावही फार झाला. चक्रधरावर त्याच्या हयातींत केवळ श्रद्धा ठेवणाऱ्या व्यक्तींनीं व चक्रधरापासून ज्ञान प्राप्त झालेल्या व्यक्तींनीं चक्रधरानंतर नागदेवाचार्याजवळच संन्यासदीक्षा धारण केली. नवीन नवीन शिष्यही त्याला येऊन मिळाले. हें शिष्यप्रसाराचें किंवा पंथप्रसाराचें कार्य नागदेवानें हेतुपूर्वक केलें असें मात्र म्हणतां येत नाहीं. ज्या नवीन शिष्य व शिष्यिणी त्याला

---

१४. ना. स्मृ. ४६.

१५. वागीश्वरी ( नागपूर ). सप्टें. १९३३. पृष्ठें ३२८–३२९.

मिळाल्या त्या यदृच्छेनेंच त्याजकडे आलेल्या दिसतात. पंथांत प्रविष्ट करून घेण्यासाठीं चक्रधराच्या मतांचा त्यानें त्यांना मुद्दाम उपदेश केला किंवा इतरांपेक्षां आपल्या सांप्रदायांत मोक्षप्राप्तीचा दृष्टीनें विशेष काय आहे तें सांगून त्यानें श्रद्धालु लोकांचीं मनें वळविलीं, असें कांहींच झाल्याचें दिसत नाहीं. आपल्या पंथाच्या भजनीं न लागलेल्या लोकांत जाऊन, ब्रह्मविद्या-शास्त्राचीं प्रवचनें करून नवीन अनुयायी नागदेवाचार्यानें मिळविलेले दिसत नाहींत. जे कोणी त्याजकडे येत ते, आपल्यापूर्वी पंथांत प्रविष्ट झालेल्यांच्या तोंडून त्यांच्या धर्मशास्त्राची थोरवी ऐकूनच येत. यामुळें नागदेवानें पंथप्रसाराचें कार्य पद्धतशीर रीतीनें केलें असें मुळींच म्हणतां येत नाहीं. तसें न करतांना सुद्धां त्याच्या कारकिर्दीत पंथाचा प्रसार झाला ही गोष्ट निराळी. म्हणून महानुभावीयेतरांच्या दृष्टीनें नागदेवाचें कर्तृत्व केवळ चक्रधराचें तत्त्वज्ञान शिष्य-वर्गात यथातथ्य उपदेशण्यांत व त्याच्या आधारें लिहिलेले ग्रंथाचे खरडे संशोधण्यांतच काय तें सांठविलेलें आहे. पंथप्रसारकाच्या नात्यानें त्यानें प्रत्यक्ष अशी कोणतीच कामगिरी केलेली नाहीं. असो, नागदेवाचार्याच्या कर्तृत्वाचें विस्तृत विवेचन करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें वरील सिंहावलोकनावरच तृप्त होणें भाग आहे.

## भास्करभट्ट व नागदेवाचार्य

भास्कराचा व नागदेवाचा विशेष संबंध आलेला दिसत नाहीं. किंबहुना केसोबास व दामोदर पंडित हे जितके आचार्याचे आवडते होते तितका भास्करभट्ट नसावा.(' ते आचार्या थोर पढिएंते ' असे जरी ६५ व्या स्मृतींत म्हटलें असलें तरी त्या विधानाला विशेष किंमत नाहीं. कारण बहुतेक शिष्या-विषयीं ग्रंथकर्त्यानें तेंच विधान केलें आहे. (बाइदेवबास, दामोदर पंडित इत्यादिकांना श्रीचक्रधराचा प्रत्यक्ष संबंध घडलेला असल्यामुळें भास्करापेक्षां ते त्यांस अधिक आवडते असावे यांत आश्चर्य नाहीं.) आपल्या मृत्युपूर्वी नागदेवानें बाइदेवबासालाच आचार्यपद देण्यांतील रहस्य मुद्धां हेंच आहे कीं (त्याला

१६. भा. इ. सं. मं. त्रैमासिक. वर्ष १३ अंक २. पृ. ५१

चक्रधराचा प्रत्यक्ष सहवास घडला होता व म्हणून तो गुरुकुळाला अधिक वंद्य होता. कांहींही असलें तरी भास्कर हा सर्वात आवडता शिष्य होता असें म्हणावयास आधार नाहीं, स्मृतिस्थळांतील त्याच्या संबंधींच्या असलेल्या थोड्या आख्यायिका पाहिल्या म्हणजे त्यावरून भास्कर हा नागदेवाच्या सान्नि-ध्यांतही विशेष नव्हता असें दिसतें. तथापि ग्रंथकर्तृत्वाच्या दृष्टीनें नागदेव भास्कराची योग्यता ओळखत होता यांत शंका नाहीं. मराठीमध्यें सुंदर काव्य करण्याबद्दल भास्कराला नागदेवाचें प्रशस्तिवचन होतेंच. पण त्याची काव्यरचना थोडी शृंगाराकडे अधिक झुकते असा नागदेवाचा मार्मिक अभिप्राय होता. तो खरा आहे. अशा प्रकारच्या विद्वान व रसिक कवीला परशास्त्राचें ज्ञान देऊन उजळल्याबद्दल नागदेवाचार्यांची 'बापु कळा वानु कैसी : जो भास्करातें प्रकाशी' अशी नारायणबासानें ऋद्धपुर--वर्णनांत केलेली स्तुति योग्य आहे यांत शंका नाहीं.

## बाइदेवबास

'भावे देव व्यास' म्हणून ज्याचा उल्लेख नेहमीं केला जातो त्याचें मूळ नांव बाइदेवबास असें आहे. तो गंगातीरावरील नेवासें प्रांतांत राहणारा असून चक्रधराच्या सान्निध्यांत त्यानें बरेच दिवस घालविले होते असें दिसतें. तथापि प्रत्यक्ष दीक्षा नागदेवाचार्यांकडून घेतल्यामुळें आचार्यांच्या प्रमुख शिष्यांतच त्याचा समावेश होतो. आणि म्हणूनच बाइदेवबास भास्करभट्टाचा गुरुबंधु ठरतो. रा. पांध्ये यांनीं त्यास भास्कराचा थोरला मुलगा बनविलें आहे. पण ती उघड उघड चूक असल्याचें पहिल्या प्रकरणांत नमूद केलेंच आहे. दुसऱ्या एका दृष्टीनें विचार केल्यास बाइदेवबास भास्कराचा गुरुही ठरूं शकतो. कारण नागदेवाचार्यांच्या मृत्युनंतर महानुभावपंथाचें आचार्यत्व बाइदेवबासास मिळाल्यामुळें तो सहजच भास्कराला गुरुस्थानीं झाला. नागदेवाच्या अनेक

१७. ऋद्धपूरवर्णन ओ. २४

१८. म. म. वा. पृ. २१.

१९. हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत. पृ. २०९

शिष्यांमध्यें सर्व दृष्टींनीं श्रेष्ठ असा बाइदेवबासच होता. आपले मोक्षगुरु श्रीचक्रधर व श्रीगोविंदप्रभु यांच्याविषयीं त्याच्या अंतःकरणांत प्राणापलीकडे प्रेम होतें. चक्रधरानें ज्या गांवाहून उत्तरेकडे प्रयाण केलें त्या गांवाचें ( बेलापुराचें ) दर्शन देखील बाइदेवबासाला सहन होणार नाहीं या कल्पनेनेंच एकदा अटणप्रसंगीं नागदेवानें बाइदेव आपल्याजवळ असतांना तिकडे जाण्याचें टाळलें.[20] त्याच प्रवासांत ते डोंबेगांवास गेले असतां 'तेथें[21] गोसावी श्रीमुखींचेया तांबोळाचें पीक भीतिभंगाचेया चीरेयावरि सांडीलें होतें. तें भटोबासीं देखीलें : आन जीभ लावीली : आन हामरौनि म्हणितलें : "हें घेया गा गोसावीयांचेया तांबोळाची पीक ! : " त्यावेळीं बाइदेवबासाची कशी अवस्था झाली ती पहा. 'तेथ बाइदेवोबा आले आन लोळणी घातली : थोर दुख करूं लागले : दुख करीति आन तेवीचि जीभवरि पीक चाटीति : ऐसें चाटीतां जीभ सोलली : फुटुनि जीभे रगत नीगालें : ऐसें थोर दुःख भरलें : मग भटोबासें म्हणितलें : "नको गा बाइदेया ! दुखें अंतःकरण जाइल : उठी : " म्हणौनि भटोबासें हातीं धरुनि उठवीलें : ' परमेश्वरांवरील त्याच्या या निरतिशय प्रेमाला योग्य असेंच त्याचें खडतर वैराग्यही होतें. वरील कारणांमुळेंच नागदेवानें मृत्युसमयीं समस्त गुरुकुळाचें आचार्यपद बाइदेवबासास[22] दिलें असावें हें स्पष्ट दिसतें. नागदेवाचार्यांच्या मृत्युनंतर बाइदेवबास तीन वर्षे हयात होतो[23]. अर्थात् सांप्रदायिक दृष्ट्या शके १२२७, तर ऐतिहासिक दृष्ट्या शके १२३१ मध्यें बाइदेवाला मृत्यु आला असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

२०. 'मग नीगतां भटोबासीं वीचारीलें : "बेलापुरा जाइन तरि तेथ बाइदेयाचें देह जाइल : " म्हणौनि न वचतीचि ' ना. च. स्मृ. २९

२१. ना. च. स्मृ. २७

२२. प्रस्तुत पुस्तकाच्या २५ व्या पानावरील तळटीप पहा.

२३. प्रस्तुत पुस्तक. प्र. १. पृ. २१ वरील ' इतिहास ' प्रकरणांतील उतारा पहा.

याच्या नांवावर ' त्रिकाल पूजावस्वरें, पाचापुराचें मूर्तिज्ञान, नामाचे दहा ठाये, सठी प्रश्नें ' इतकी ग्रंथरचना महानुभाव-कवि-काव्य सूचींत दिलेली आहे.[२४] पैकीं महत्त्वाचा ग्रंथ गद्य पूजावसर हाच होय. महाराष्ट्रसारस्वतांत ( भाग १ पृ. ९६-१०१ ) तो संपूर्ण छापलेला आहे. त्यावरून चक्रधराची दिनचर्या बाइदेवबासानें किति आस्थेनें व भाक्तियुक्त अंतःकरणानें लिहून ठेवली आहे याची चांगली कल्पना येते. जुन्या मराठी भाषेचा सुंदर नमुना म्हणून तरी वाचकांनीं तो एकदां अवश्य वाचावा.

(भास्करभट्टाचा व बाइदेवबासाचा संबंध बरेच वेळां आला असावा. परंतु दुर्दैवानें त्या संबंधींच्या विशेष आख्यायिका उपलब्ध नाहींत. तथापि भास्कराच्या शिशुपाळवधावरील बाइदेवबासाचा अभिप्राय संग्रहित करणारी आख्यायिका इतकी प्रसिद्ध आहे कीं तीमुळें या दोघांचा असलेला अन्योन्यसंबंध विसरतां येणें शक्य नाहीं. वरील अभिप्रायांत बाइदेवबासाची मार्मिक रसिकता जशी व्यक्त झालेली आहे तशीच त्याची कडक वैराग्यवृत्तीही प्रतिबिंबित झाल्याचें दिसून येतें.)

## परशरामबास.

भास्करभट्टाच्या अनेक शिष्यांमध्यें नागाइसा, परशरामबास व रामेश्वरबास ह्या तीनच व्यक्ति विशेष प्रसिद्ध आहेत. यांपैकीं नागाइसा संबंधींची माहिती पहिल्या प्रकरणांत नमूद केलेली आहे. खरें पाहिलें असतां, परशरामबास व रामेश्वरबास हे दोघेही भास्करभट्टाचे दीक्षित शिष्य नाहींत. बाइदेवबासापासूनच त्यांनीं संन्यासदीक्षा घेतली होती आणि त्यामुळें बाइदेवाचेच शिष्य म्हणून ते ओळखले जात. ( वृ. ३९[२५] ). परंतु पुढें मृत्युसमयीं बाइदेवानें या दोघांनाही भास्करभट्टाच्या मांडीवर दत्तक दिलें. तेव्हांपासून ते भास्कराचे शिष्य म्हणून ओळखले जाऊं लागले असें कळतें. या दोघांपैकीं, परशरामबास

---

२४. म. क. का. सूची. पृष्ठ. १८.

२५. वृद्धाचार. ९.

हा फार तीक्ष्ण बुद्धीचा होता. एकदां त्यानें केलेली धर्मवार्ता ऐकून आनोबास इतका खुश झाला कीं ' पैरसरामाचें बोलणें तें गगना गवसणी कीं ' या शद्बांत त्यानें त्याचा गौरव केला.परशरामाची पठनशक्तीही तीव्र होती. रत्नमालादि स्तोत्रें त्यानें फार लौकर पाठ केल्याचे दाखले वृद्धाचारांत सांपडतात. ( वृ. ३३,३४ ). आपल्या बुद्धिमत्तेला साजेल अशी ग्रंथरचनाही त्यानें केलेली आहे. " परशरामबासीं नीर्वचन : नीर्वचनाची असति परि केली : दोहीं स्थळाचेया पुढीला-प्रमाणां अन्वयो लावीला : आदि करूनि वेगळीया टांचीलीया : उद्धरण : चैतन्यमूतिका बोलीले : दृष्टांत : प्रमेयें बोलीलीं : ऐसा सान्वान्वयो लावीला :" ( वृ. ४५ ) याशिवाय धाकटें आचारस्थळ व विचारस्थळ त्यानें केलेलें असून ( वृ. ४१ ) सुप्रसिद्ध 'नागदेवाचार्य चरित्र' अथवा 'स्मृतिस्थळ' या ग्रंथाचा कर्ताही विरोधी पुराव्याच्या अभावीं, तोच दिसतो.[२७] "तसेंच[२८] 'इतिहास' नामक एका गद्य प्रकरणावरून असें समजतें कीं 'लीलाचरित्रा'चे जे तेरा पाठ झाले त्यांत 'परशराम पाठ' म्हणून एक पाठ असून त्यांतील लीळा परशराम-व्यासानें आपला गुरु भास्करभट्ट कवीश्वराचार्य याजपासून शिकून घेतल्या होत्या व परंपरेनें त्याच सदर पाठांत समाविष्ट करण्यांत आल्या होत्या ". भास्करभट्टानंतर परशरामबास हाच महानुभावपंथाचा आचार्य होता. याच्याच कारकीर्दीच्या शेवटीं प्रस्तुत पंथाचीं तेरा शकलें होऊन निरनिराळे तेरा आम्नाय निर्माण झाले. परशरामाचा गुरुबंधु व भास्करभट्टाचा दुसरा शिष्य रामेश्वरबास याला वाङ्मयदृष्ट्या विशेष महत्त्व नसल्यामुळें त्याची माहिती येथें देणें आवश्यक वाटत नाहीं.

## मित्रमंडळ.

भास्कराच्या मित्रमंडळांत बाइदेवबास, दामोदर पंडित, केसोबास, गोपाळ पंडित ऊर्फ आनोबास, दंतेगोपाळबास, इत्यादि महात्म्यांचा प्रामुख्यानें

---

२६. वृद्धाचार. ३१.

२७. विश्ववाणी डिसें. १९३३, पृ. ५९.

२८. विश्ववाणी डिसें. १९३३, पृ. ५९.

समावेश होतो. पैकीं बाइदेवबासाची माहिती मागें दिलीच आहे. दामोदर पंडिताचें चरित्र[२९] कै. भावे यांनीं संपादलेल्या वत्सहरणाच्या प्रस्तावनेंत विस्तारपूर्वक आलेलें असल्यामुळें येथें त्याचें पुनर्लेखन करणें–स्थलाभावामुळेंही–इष्ट नाहीं. दंते गोपाळबास याला साहित्यिक या नात्यानें फारसें महत्त्व नसल्यामुळें त्याच्या हकीकतीनेंही पुस्तकाचीं पानें अडवून वाचकांचा वेळ घेणें मला योग्य वाटत नाहीं. त्यासंबंधीं आवश्यक तेवढी माहिती पहिल्या प्रकरणांतील उताऱ्यांत आलेलीच आहे. राहिलेले दोन मित्र केसोबास व गोपाळ पंडित यांची माहिती देणें मात्र आवश्यक वाटतें. या दोघांचाही भास्करभट्टाशीं वारंवार संबंध तर येतच होता पण त्याहीपेक्षां साहित्यिक म्हणून त्यांना अधिक महत्त्व असल्यामुळें त्यांच्या चरित्राविषयीं अभ्यासकांस जिज्ञासा असणें साहजिक आहे.

## केसोबास

पैठणजवळील वरखेडवाडें या गांवीं राहणाऱ्या अनंतभटाचा पुत्र चक्रपाणी[३०] यांस दोन मुलें होतीं. वडील मुलाचें नांव गोपाळ पंडित व धाकट्याचें नांव केसोबास. गोपाळपंडिताविषयींची माहिती पुढें देणारच आहे. चक्रपाणीभट आपल्या या दोन्ही पुत्रासह चक्रधराकडे जाऊन येऊन असे. चक्रधरानंतर नागदेवाचार्यांशीं हा केसोबास कधीं कधीं धर्मशास्त्रावर चर्चाही करीत असे.[३१] या धर्मशास्त्रचर्चेचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला. केसोबासाला पूर्ण विरक्ति उपजली व तो नागदेवाचें शिष्यत्व स्वीकारून महानुभावपंथात प्रविष्ट झाला.[३२] त्यापूर्वींच केसोबासाचें लग्न झालेलें असल्यामुळें त्याचा सासरा व वडील-

---

२९. या प्रस्तावनेच्या ५ व्या पृष्ठावर ‘ कवीश्वर व्यास म्हणजे केशवराजसूरी ’ असा जो उल्लेख केलेला आहे तो चुकीचा आहे. कवीश्वरव्यास म्हणजे आपला भास्करभट्ट होय तर केशवराजसूरी हें मूर्तिप्रकाशकार केसोबासाचें ‘ संस्कृत ’ नांव होय.

३०. ना. स्मृ. ४१

३१. ना. स्मृ. ४१

३२. ना. स्मृ. ४२

भाऊ यांनीं, त्यानें संन्यास सोडून पुन्हा गृहस्थाश्रमांत यावें म्हणून फार प्रयत्न केले. नागदेवापासून त्यांनीं त्यास बलात्कारानें ओढून नेलें, अनेक प्रकारें उपदेश केला, आके विद्वांसीकडून[33] त्याच्याशीं चर्चाही करविली. पण सर्व व्यर्थ. शेवटीं केसोबासाला व त्याच्या बायकोला एका घरांत[34] कोंडलें. 'तेथ तीयें बाजेवरि नीजेति तरि आपण खाली नीजेति : तीये खालि नीजेति तरि आपण बाजेवरि नीजेति' पण आपली संन्यस्त वृत्ती त्यानें सोडली नाहीं. शेवटीं सर्वांनीं त्यास मोकळें सोडलें व तो नागदेवापाशीं परत आला. स्त्रीसान्निध्यांतील त्याचें हें अविक्रियत्व पाहून आचार्यांनीं त्याचा 'शुकयोगींद्र' या शद्वांनीं गौरव केला[35]. केसोबासाचें वैराग्य खरोखरच तीव्र होतें. एका गांवीं भिक्षेला गेला असतां रात्रीच्या वेळीं संभोगलालसेनें एक तरुणी मांडीवर येऊन बसली[36] तरी कोणत्याही प्रकारें अंतःकरणांत विकार उद्भवूं न देतां मोठ्या युक्तीनें तो तेथून निसटला. तीव्र वैराग्याप्रमाणें शास्त्रचर्चेची आवडही केसोबासला फार होती. दामोदरपंडित व रामेश्वरबास यांच्यासह तो अखंड शास्त्रचर्चा करीत बसावयाचा. पुढें नागदेवाच्या सांगण्यावरुन त्यानें शास्त्रचर्चा करणें सोडून[37] दिलें. त्याच्या धर्मज्ञानाविषयीं आचार्यांस फार आदर[38] होता. 'पंडिता! केसवदेया! भटमार्गा वेधले जीव तुमचेया गळां झोंबतील गों[39]' हे आचार्यांचे, दामोदर पंडित व केसोबास यांना उद्देशून काढलेले उद्गार वरील आदरभावच व्यक्त करतात. केसोबासानें रत्नमाळास्तोत्र व मूर्तिप्रकाश हे दोन स्वतंत्र ग्रंथ रचले असून पहिल्या नऊ प्रकरणांचा सूत्रपाठ व दृष्टांत यांचें त्यानें संपादन केलेलें आहे. दृष्टांतिक, लापिका, अवस्थाभूत गीत इत्यादि रचनाही त्यानें केलेली आहे. वर उल्लेखिलेल्या मूर्तिप्रकाश काव्याचा कर्ता प्रस्तुत केसोबास नसून, भास्करभट्टाचा पूर्वाश्रमींचा गुरु केशवाचार्य आहे असें कित्येकांचें मत[40] दिसतें तें चिन्त्य आहे. प्रस्तुत काव्य शके १२१० च्या सुमारास लिहिलें गेलें असावें.

३३. त्यावेळचा एक पंडित.
३४. ना. स्मृ. ४४
३५. ना. स्मृ. ४४
३६. ना. स्मृ. १२४
३७. ना. स्मृ. १४, १५.
३८. ना. स्मृ. १२६
३९. ना. स्मृ. २८३.
४०. सोंगोबास वृद्धान्वय.

## केसोबास व भास्करभट्ट

केसोबास हा भास्कराचा गुरुबंधु होय. पण चक्रधराच्या सान्निध्याचें भाग्य बालपणीं केसोबासाला लाभलेलें असल्यामुळें भास्कर त्याला श्रेष्ठ मानीत असावा असें दिसतें. केसोबासाचा उपदेश तो तात्काळ मान्य करीत असे. एकेदां[41] नागदेवाचार्याशीं भास्करभट्ट विशेष जोरानें चर्चा करीत असलेला पाहून " भटो ! अधीकरणेंसीं इतुका तर्क वाढवीतां दूषण असे : अधीष्ठानीं प्रसन्नता जाए : ऐसेयापरी काए अर्थसीधी होइल ? " इत्यादि शद्बांत केसोबासानें केलेला उपदेश त्यानें विनम्रतेनें ऐकून घेतला, यावरून काय दिसतें ? केसोबासाच्या मूर्तिप्रकाशाचा तर भास्करानें चांगलाच अभ्यास केलेला होता. या काव्यांतील अनेक कल्पना भास्करांच्या काव्यांत जशाच्या तशा उतरलेल्या आहेत. वरील दोन्हीतिन्हीग्रंथांतील समान कल्पनांचें तुलनात्मक निरीक्षण शिशुपालवध व उद्धवगीता या दोन्ही प्रकरणांत स्वतंत्रपणें केलेलें आहे तें पहावें. म्हणजे केसोबाचा मूर्तिप्रकाश, अखंड अध्ययनानें भास्करानें कसा पचविला होता याची कल्पना येईल. दुर्दैवानें या दोन विद्वानांच्या परस्पर मैत्रीविषयीं विशेष आख्यायिका स्मृतिस्थळ व वृद्धाचारांत नमूद केलेल्या नाहींत. तथापि तीर्थाटनाला केसोबास, दामोदरपंडित, भास्करभट्ट इत्यादि अनेक विद्वान मित्रमंडळी वारंवार एकत्र जात असत असें दिसतें. त्यांचा तो प्रवास फार संस्मरणीय होत असेल यांत शंका नाहीं. त्याचा वृत्तांत स्वतंत्रपणें नमूद करून ठेवला असता तर बहार झाली असती. पण त्याला इलाज नाहीं.

## गोपाळपंडित

केसोबासाचा वडील भाऊ गोपाळपंडित उर्फ आनेराजबास हा होय. साता महिन्याचाच आईच्या उदरांतून बाहेर पडल्यामुळें जन्मताक्षणीं हा आंधळा होता. त्याच स्थितींत चक्रपाणीबासानें गोपाळाला श्रीचक्रधराच्या पुढें

४१. ना. स्मृ. १२०

नेऊन ठेविलें व त्याला दृष्टि प्राप्त व्हावी म्हणून प्रार्थना केली. चक्रधराच्या कृपेनें त्याला दृष्टि आली. म्हणून आनेराजबासाला पारमांडल्य असेंही संबोधतात. ( पारिमांडल्य = अणुपरमाणुप्रमाणें सूक्ष्म वस्तु देखील पाहणारा ). सुभाषितांत्याक्षरी, दृष्टांतव्याख्या, दृष्टांतलक्षण इत्यादि ग्रंथ यानें लिहिले आहेत. तळेगांवकर मंडळीपैकीं कांहीं महंत आपल्या स्वतंत्र सूत्रपाठाचें[42] जनकत्व आनेराजाला देतात पण तें बरोबर नाहीं. हा गोपाळपंडित ऊर्फ आनेराज पारिमांडल्य, रामदेवरावाची पत्नी कामाईसा[43] तिच्या व्यापारखात्यावरील अधिकारी होता. त्याच्याच अनुभवावरून कामाइसानें नागदेवाला आपलें गुरु केलें.

या आनोबासाचा व भास्करभट्ट कवीश्वराचा बराच संबंध येत असे असें दिसतें. शक्य असेल तेव्हां गोपाळपंडित भास्कराची सेवा मनोभावानें करी हें पुढील[44] कथेवरून दिसून येईल. ' एक वेळ कवीश्वरबास : गोपाळबास : रामेश्वरबा : परशरामबा : ऐसे हे चौघे वाटा जातु होते : तंव एकीं ठायीं साउलीए बैसले : कवीश्वरबासीं उदकपात्रीं उदक पाहीलें : तंव उदक नाहीं : तैसेचि गोपाळपंडित अवघेयांची उदक पात्रें घेऊनि उदका गेले : उदकपात्रें भरूनि आणीली : ते तयां संपादिली : अवघीं उदक घेतलें : " नागदेवाचार्यांच्या निक्षेपस्थळीं देउळ बांधण्याची गोपाळपंडिताची फार इच्छा[45] होती. तत्प्रीत्यर्थ त्यानें भास्करभट्टाजवळ ६० आसु देखील आणून दिले. पण, देउळ केल्यास पुढें कोणी त्यांत लिंग बसवील व त्यामुळें ईश्वराखेरीज अन्यभजनाचें पाप आपणावर येईल, किंवा मूर्ति न बसवल्यास तेथें मेढेंबोकड वगैरे येऊन घाण करतील, सबब देऊळ न करणें इष्ट असा उपदेश त्यास कवीश्वरानें केला. ही आख्यायिका व एका विशिष्ट प्रसंगीं भास्करानें गोपाळपंडिताची प्रशंसा

४२. वागीश्वरी जून १९३४ पृ. ७२. या संबंधांत वागीश्वरी ऑग. १९३४ मधील श्री. बाळकृष्णशास्त्री यांचा लेखही वाचावा.

४३. ना. स्मृ. १६८

४४. वृद्धाचार. ८.

४५. वृद्धाचार. ७.

केल्याची आख्यायिका मागें पूर्णपणें उध्दृत केलेलीच आहे. प्रवास करतां करतां कवीश्वरबास एकदा माहुरास गेले. तेथें त्यांच्या व इतर विद्वानांच्या वाद-विवादांत भास्कराला विजय मिळवून देण्यास देखील गोपाळपंडितच कारणीभूत झाला हें ' माहोरीं कवीस्वरोद्गृहणिके राघवभटीं मध्यस्थळग्रहणें वीद्वांस पराजयो : कवीस्वरी जैतपत्र देणें ' या, मागें उध्दृत केलेल्या आख्यायिकेवरून स्पष्ट दिसून येईल.

---

४६. वृद्धा. २०.
४७. वृद्धा. २६.

## प्रास्ताविक.

महानुभावीय वाङ्मयाच्या नभोमंडळांत आपल्या प्रशांत व आल्हादकारक तेजानें प्रकाशत असलेल्या अनेक ताऱ्यांमध्यें शिशुपालवधकार भास्कराची प्रभा कांहीं निराळीच आहे. स्वतः तेजःसंपन्न असून इतरांनाही प्रकाशित करण्याचें सामर्थ्य अंगीं मिरवणारा तो खरोखरच भास्कर आहे. आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या शिशुपालवध नांवाच्या त्याच्या एकाच काव्यानें साहित्यभक्तांचीं अंतःकरणें पूर्णपणें भारून टाकलेलीं आहेत हें त्या काव्यावर प्रसिद्ध झालेल्या अनेक चिकित्सात्मक व रसग्राही टीकालेखांवरून सहज दिसून येईल. या भास्करभट्टानें शिशुपालवधाखेरीज इतर अनेक ग्रंथ लिहिले आहेत असें म्हणतात. त्यांपैकीं उद्धवगीता नांवाचें काव्य मी नुकतेंच मुद्रित स्वरूपांत वाचकांच्या हातीं दिलें आहे. हे दोन्ही ग्रंथ भास्करभट्टाचेच आहेत हें निःसंशय. पण याव्यतिरिक्त ज्या कित्येक ग्रंथांचें कर्तृत्व त्याला कै. वि. ल. भावे, श्री.य. खु. देशपांडे आदिकरून कांहीं संशोधकांनीं दिलें आहे त्या बाबतींत मात्र साधकबाधक प्रमाणांवरून अधिक विचार होणें अत्यंत आवश्यक वाटतें.[१] प्रस्तुत कर्त्रीच्या चरित्राची साधनसामुग्री जुळवीत असतां कांहीं असे उतारे माझ्या आढळांत आले कीं त्यांवरून, भास्कराच्या नांवावर मोडणारे कांहीं ग्रंथ त्याचें नसून ते इतराचेच असावेत असें मला वाटूं लागलें. महानुभावीय वाङ्मयाचें संशोधन करणाऱ्या इतर विद्वानांच्याही लक्षांत ही गोष्ट आली असावी असें वाटतें. पण त्यांपैकीं कोणीच आतांपर्यंत या प्रश्नावर सप्रमाण चर्चा केली नसल्यामुळें ती मला करावी लागत आहे इतकेंच. या चर्चेमुळें भास्कराच्या ग्रंथकर्तृत्वासंबंधीं अभ्यासकांच्या मनांत असलेल्या चुकीच्या समजुती नाहींशा होऊन खरें काय तें कळण्यास मदत होईल अशी आशा आहे.

### कै. भावे व श्री. देशपांडेद्वय.

कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं आपल्या महाराष्ट्र सारस्वतांत

१. म. सा. भाग १ . पृष्ठ ९२.

भास्करानें शिशुपालवध, एकादशस्कंध टीका, पूजावसर, चौपद्या, ईशस्तुति, विरहाष्टक, चक्रपाणीचरित्र दत्तात्रयचरित्र, श्रीकृष्णचरित्र व गीताटीका इतके ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख केलेला आहे. पैकीं पहिले ६ पद्यमय असून इतर गद्य ग्रंथ आहेत. रा. यशवंत खुशाल ऊर्फ आप्पासाहेब देशपांडे यांच्या ' महानुभावीय मराठी वाङ्मयां '[२] वरून आपल्या कवीनें शिशुपालवध, श्रीमद्‌भागवत एकादशस्कंद ( उद्धव-गीता ), पूजावसर, ईशस्तुति, दत्तात्रयचरित्र, व श्रीकृष्णचरित्र इतके ग्रंथ लिहिल्याचें दिसून येतें. कै. भावे यांनीं उल्लेखिलेल्या चक्रपाणीचरित्राचा, विरहाष्टकाचा व चौपद्यांचा उल्लेख श्री. देशपांडे यांनीं मुळींच केलेला नाहीं. कदाचित त्यांच्या मतें हे ग्रंथ भास्कराचे नसावेत. पण असें ज्या अर्थी त्यांनीं स्पष्ट म्हटलेलं नाहीं त्या अर्थी... ' ईशस्तुति, दत्तात्रयचरित्र इत्यादि गद्य व पद्य ग्रंथहि—' या त्यांच्या वाक्यामधील ' इत्यादींत ' या अनुल्लिखित ग्रंथांचा समावेश होतो असें समजणें चुकीचें होणार नाहीं. वरील दोन्ही विद्वानांचे ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर जवळ जवळ चार वर्षांनीं, नागदेवाचार्यचरित्र, वृद्धाचार, कवीश्वर-वंशवर्णन, कवीश्वर-जामोदेकर-वंशवर्णन वगैरे ग्रंथांच्या आधारें ' शिशुपालवध कर्ता भास्करभट्ट कवीश्वराचार्या'वर सविस्तर लेख लिहिणारे रा. वामन नारायण देशपांडे यांचें या बाबतींत काय म्हणणें आहे तें पाहूं. विविधज्ञानविस्तारामधील आपल्या लेखांतें[३] त्यांनीं भास्करभट्टाच्या ग्रंथकर्तृत्वाविषयीं विचार केलेला आहे. त्यांत त्यांनीं, शिशुपालवध, उद्धवगीता ( किंवा एकादशस्कंद टीका ), व श्रीकृष्णचरित्र हे ग्रंथ भास्कराचे म्हणून स्वतः उल्लेखिले असून याशिवाय पूजाअवसर, चौपद्या, ईशस्तुति, विरहाष्टक, हे पद्यग्रंथ व चक्रपाणीचरित्र, दत्तात्रेयचरित्र, गीताटीका हे गद्यग्रंथ भास्कराच्या नांवावर असल्याबद्दल ' महाराष्ट्र सारस्वता 'चा हवाला दिला आहे. त्याच लेखांत पान ३९८ वर असलेल्या शेवटच्या परिच्छेदांतील विधानावरून व ३९९ पानावरील " आणि ' शिशुपालवध ' व

२. म. म. वा. पृष्ठें १७, १८, २०.

३. वि. ज्ञा. वि. ऑक्टो. १९२८. पृष्ठ ३९८,३९९

‘ श्रीकृष्णचरित्र ’ हे त्याचे दोन ग्रंथ मराठी भाषा जिवंत असेपर्यंत कायमचे टिकतील, हें निःसंशय आहे ! ” या अभिप्रायावरून श्रीकृष्णचरित्र हा ग्रंथ भास्कराचाच असावा असें त्यांचें मत दिसतें. श्री. पांगारकरोंादि ग्रंथकारांनीं वरील तिघांच्याच माहितीचा उपयोग केलेला असल्यामुळें त्याचें म्हणणें लक्ष्यांत घेण्याचें कारण नाहीं. सारांश श्रीकृष्णचरित्र, दत्तात्रेयचरित्र, चक्रपाणीचरित्र इत्यादि कांहीं गद्यग्रंथांचें कर्तृत्व वरीलपैकीं एक किंवा अनेक विद्वान भास्कराला देतात असें सामान्यतः म्हणावयास हरकत नाहीं. आतां वस्तुस्थिति काय आहे तें पाहूं.

## उपलब्ध साधनें

१ महानुभाव वाङ्मयांत श्रीनागदेवाचार्यचरित्र, वृद्धाचार व वृद्धान्वय हे तीन ग्रंथ अनेक दृष्टींनीं महत्त्वाचे समजले जातात. श्रीचक्रधराच्या प्रयाणापासून तो परशरामबासाच्या देहावसानापर्यंत झालेल्या प्रमुख व्यक्तींची व ठळक प्रसंगाची माहिती पहिल्या दोन ग्रंथांत ग्रथित केलेली आहे, तर वृद्धान्वयामध्यें सामान्यतः सर्वच प्रमुख महानुभावांनीं लिहिलेल्या ग्रंथांची यादी टिपून ठेवलेली आढळते. वरील ग्रंथांवरून भास्करभट्टाच्या वाङ्मयनिर्मितीसंबंधीं मिळालेली माहिती वाचकांच्यासमोर प्रथम जशीची तशी ठेवतों. नागदेवाचार्यचरित्रामध्यें प्रस्तुत कवीविषयीं बरीच माहिती आलेली आहे. पण त्याच्या मुख्य ग्रंथांचे उल्लेख मात्र त्यांत नसून ते वृद्धाचारांतच आढळतात. हे उल्लेख येणेंप्रमाणेः—

१ **बाइदेवोबासीं शिशुपालवधनीराकरणीं कवीश्वरीं एकदसु करणें** :॥ एक वेळ कवीश्वरबासीं सीसुपाळुवध केला : मग बाईदेवबासापुढां म्हणितला : तो बाईदेवबासीं परीसीला : आन म्हणितलें : भटो हा ग्रंथु निका जाला : परी नीवृत्ताजोगा नव्हेचि : प्रवृत्ताजोगा जाला : मग कवीश्वरबासीं रामदरां एकादसस्कंधु केला : मग एउनि तोही बाईदेवोबासापुढां म्हणितला : तो परीसूनि बाइदेबासीं म्हणितलें : आतां होए कवीस्वर हो : हा आतां निवृत्ताजोगा जाला : ऐसें म्हणोनि थोर तोखले : ॥ वृद्धाचार १ ॥

४. म. वा. इ. खंड १. पृष्ठें. ४२८, ४४०, ४४३, ४४४.

**तथा इश्वरुवीरहें नरवीलापु करणें :** ॥ कवीश्वरबासीं ईश्वरुवीरहें नरवीलाप स्तोत्र केलें : ॥ वृद्धाचार १० ॥

**कवीस्वरीं पूजावसर सप्तवीशती श्लोक करणें :** ॥ एक वेळ कवीश्वरबासीं 'वेदादयोपि न विदुः परभारथिश :' ऐसे पूजावसरीचे सत्तावीस श्लोक केले : ॥ वृद्धाचार १२ ॥

**तथा वोवी करणें :** ॥ एक वेळ कवीश्वरबासीं 'जयाचिया नामसंगती' एथोनि 'ऐसीया वोवीया पढतां । जीवा होए चोखाळतां । परब्रम्हेंसी होए सायुज्यता । म्हणे कवी भास्करू ॥' ऐसीया पूजावसरीचेया वोवीया साटि बांधलीया : संक्षेपुमात्रें स्मरावी ( व ? ) या : ॥ वृद्धाचार १३ ॥

## वृद्धान्वयांतील उल्लेख.

आन कवीश्वरबासीं निर्वचन स्तोत्र केलें १८ श्लोक : आन २७ पुजा आवस्वर श्लोक : आन ३९ प्रस्तावा श्लोक : आन नरविलाप स्तोत्र : आन नीलांभोजस्फुटरुचिशिखी' हे आवतारषत्क ( षट्क ) : आन गद्यचाळी सातपांच ( =१२ ) श्लोक : आष्टकें तीन : त्यांत श्रीयाष्टकें संस्कृत : आन रुद्धीपुरीचे श्लोक ४० : आन वोवीबंध शिशुपाळ केला : तो भटीं निराकरीला मास्नेया विरक्ता योग्य नव्हे म्हणौनि : मग रामदरां एकादसस्कंद केला : ऐसें बारा बंध केले : एक म्हणति बाइदेबासीं म्हाणेतलें ॥ छ ॥

वरील उताऱ्यांवरून वृद्धाचारकर्त्यांच्या मतानें भास्करभट्टानें शिशुपालवध, एकादशस्कंध ( उद्धवगीता ), नरविलापस्तोत्र ( संस्कृत ), २७ श्लोकांचा संस्कृत पूजावसर आणि ६० ओव्यांचा मराठी पूजावसर एवढे पांचच ग्रंथ लिहिले असावेत असें दिसतें तर वृद्धान्वयकार एकूण बारा काव्यांचें कर्तृत्व भास्कराला देतो. त्यांत १ शिशुपालवध, २ एकादशस्कंध ऊर्फ उद्धवगीता, ३ नरविलाप स्तोत्र (संस्कृत), ४ संस्कृत पूजावसर, ५ निर्वचनस्तोत्र, ६ गद्यचाळी, ७ प्रस्ताव श्लोक ३९, ८ ऋद्धिपुरच्या ओव्या, ९ अवतारषट्क आणि १०-११-१२ तीन अष्टकें, ( विरहाष्टक, जयाष्टक व श्रीयाष्टक ) यांचा समावेश होतो. वृद्धाचारकर्ते व वृद्धान्वयकार यांच्या टिपणांमध्यें वरील प्रकारचें

महद्‌ंतर दिसून येतें. सामान्यतः, लोकप्रिय झालेल्या कवीच्या नांवावर त्यानें न लिहिलेल्याही ग्रंथांचें कर्तृत्व लादण्याचा संस्कृतवाङ्मयांत व आपल्या प्राचीन मराठी वाङ्मयांत जो प्रकार आढळतो तो लक्षांत घेतला म्हणजे भास्कराच्या ग्रंथकर्तृत्वासंबंधीं उडालेल्या घोटाळ्याबद्दल विशेष आश्चर्य वाटायला नको. कविकुलगुरु कालिदासाच्या नांवावर कितीतरी अधम कवींनीं आपलीं काव्यें खपविण्याचा प्रयत्न केला आहे ! ज्ञानदेव व तुकाराममहाराजांच्या अभंगांत तरी काय असा घोटाळा कमी आढळतो ? भास्कराच्या बाबतींतही जवळजवळ असेंच झालेलें दिसतें. त्याच्या शिशुपाळवधादि रसाळ काव्यांना मिळालेली प्रसिद्धी पाहून कोणीतरी आपलीं स्वतःचीं काव्यें त्याच्या नांवावर खपविण्याचा प्रयत्न केला असणें शक्य आहे. वृद्धाचार व वृद्धान्वय यांच्या लेखकांनीं दिलेल्या यादींत कै. भावे व रा. देशपांडेद्वय यांनीं प्रस्तुत कवीचे म्हणून निर्देशिलेले गद्यग्रंथ श्रीकृष्णचरित्र, दत्तात्रयचरित्र, चक्रपाणीचरित्र वगैरे, यांची भर घातली म्हणजे भास्कराच्या ग्रंथांची संख्या कशी फुगते हें पाहण्यासारखें आहे. एखाद्या सरोवराच्या पाण्यांतील कमलवेलींच्या जाळ्यांतून सुखरूपपणें सुटणें जितकें कठीण तितकेंच किंबहुना त्याहीपेक्षां कठीण काम, वरील संशोधकांनीं दिलेल्या यादींतून भास्कराचेच तेवढे ग्रंथ शोधून काढण्याचें होय. उपलब्ध पुराव्याच्या आधारें काय दृष्टोत्पत्तीस येतें तें पाहूं.

## गद्यग्रंथ भास्करभट्टाचे नाहींत.

पहिली व तात्काळ लक्षांत येण्यासारखी गोष्ट अशी कीं, कै. भावे व देशपांडेद्वय यांनीं निर्देशिलेल्या गद्यग्रंथांपैकीं एकही ग्रंथ भास्कराचा नाहीं. श्री. य. खु. देशपांडे व श्री. वामनराव देशपांडे यांना माझें विधान तात्काळ पटेल–किंबहुना पटेल असें म्हणण्यापेक्षां ही गोष्ट त्यांच्या लक्षांत यापूर्वींच आली असेल असें म्हणणें अधिक युक्त होईल. पण प्रस्तुत विवेचन वरील व्यक्तीं-पेक्षां इतरांसाठींच प्रामुख्यानें करावयाचें असल्यामुळें त्यांची खात्री पटविण्याचा प्रयत्न करणें आवश्यक आहे. वृद्धाचार व वृद्धान्वय यांपैकीं एकाही ग्रंथांतील जंत्रींत भास्कराच्या नांवावर या गद्यग्रंथांचा उल्लेख आढळत नाहीं हा माझ्या

विधानास एक मोठाच महत्त्वाचा व सबळ पुरावा आहे. कवीचें कर्तृत्व फुगवून दाखविण्यासाठीं जेथें इतरांचे ग्रंथ भास्कराचेच म्हणून उल्लेखिले जाणें शक्य आहे तेथें भास्करानें खरोखरच लिहिलेल्या ग्रंथांचा उल्लेख नसणें विशेष संभवनीय नाहीं. हे ग्रंथ जर आपल्या कवीचे असते तर वरील पोथ्यांत त्यांचा उल्लेख अवश्य आला असता. पण तसा उल्लेख नसल्यामुळें हे ग्रंथ भास्कराचे नसावेत असें म्हणावें लागतें. पण याहीपेक्षां सबळ पुरावा म्हणजे हे सर्व गद्यग्रंथ म्हाइभट महानुभावानें लिहिल्याचें लीळाचरित्र, नागदेवाचार्यचरित्र इत्यादि ग्रंथांवरून आज संशयातीत सिद्ध होऊं शकतें. चक्रधराच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्य हे नेहमीं कशाचें तरी स्मरण करण्यांत दंग झालेले आढळत. हें पाहून म्हाइभटानें एक दिवशीं त्यांस विचारलें 'हीं भटो : तुम्ही नीरंतर काइसयाचें मनन करीत असा ?' नागदेवानें उत्तर केलें '... जीया लीळा वर्तलीया तीया सर्वज्ञ प्रसंगें : भक्ताप्रती सांघीतलीया : तीया आठवीतूचि असे : आन सर्वज्ञ जे एकांकी राज्य केलें : तीया लीळा सर्वज्ञ प्रसंगें भक्ताप्रती नीरूपीलीया : तीया ही 'आठवीतूचि असे : आन सर्वज्ञ द्वापरीचीया लीळा : द्वारावतीकाराचीया लीळा : श्रीदत्तात्रयप्रभूचीया लीळा : श्रीप्रभूचीया लीळा : प्रसंगें भक्ताप्रती नीरोपीलीया : तीयाही आठवीतूचि असे' ह्याच सर्व लीळा म्हाइभटानें चरित्रग्रंथांतून संग्रहीत केलेल्या आहेत. त्यांतील द्वापरीचीया लीळांना श्रीकृष्णचरित्र; द्वारावतीकाराचीया लीळांना श्रीचक्रपाणीचरित्र; श्रीदत्तात्रयप्रभूचीया लीळांना श्रीदत्तात्रयचरित्र व श्रीप्रभूचीया लीळांना ऋद्धिपूरचरित्र अशीं नांवें असून खुद्द चक्रधरानें केलेल्या लीळा ज्यांत अंतर्भूत झालेल्या आहेत त्यांस लीळाचरित्र असें संबोधतात. प्रस्तुत लेखाच्या दृष्टीनें महत्त्वाची गोष्ट एवढीच कीं श्रीदत्तात्रयचरित्र, श्रीचक्रपाणीचरित्र व श्रीकृष्णचरित्र हे ग्रंथ म्हाइभटानें लिहिले आहेत. 'महानुभावांचे चरित्रग्रंथ' या आपल्या लेखांतें रा. आप्पासाहेब देशपांडे यांनीं स्वच्छच लिहिलें आहे ...'त्यावरून दिसून येईल कीं, श्रीचक्रधरांनीं वेळोवेळीं श्रीदत्तात्रय, श्रीकृष्ण व श्रीचक्रपाणी यांच्या

५. भा. इ. सं मं. त्रै. वर्ष १३. अंक २ पृष्ठ ५०

संबंधानें शिष्यांना वेळोवेळीं ज्या लीळा सांगितल्या त्या महींद्र भटांनीं ग्रथित केल्या आहेत.) कै. भावे व श्री. देशपांडे यांनीं भास्कराच्या ग्रंथांतील म्हणून जे उतारे आपापल्या ग्रंथांत दिलेले आहेत ते म्हाइभटाच्या उपरोक्त चरित्र ग्रंथांतीलच होत. अर्थात् भास्करभट्टानें हे ग्रंथ लिहिलेले नाहींत, हें निराळें सांगावयास नको. म्हाइभटाच्या चरित्रग्रंथाशिवाय वरील व्यक्तींचीं गद्यचरित्रें महानुभावपंथांतील इतर कोणी लिहिल्याचें उपलब्ध नसल्यामुळें तर हे ग्रंथ भास्कराचे नाहींत असें खात्रीपूर्वक सांगावयास मुळींच हरकत नाहीं.

वस्तुतः ही गोष्ट 'महानुभाव-महाराष्ट्र-ग्रंथावली. कविकाव्य-सूचि' तयार करणाराच्या लक्षांत आली होती असें दिसतें. या पुस्तकांत भास्करव्यास कवीश्वराचार्याच्या नांवावर[६] "शिशुपालवध ओ. १०८७, उद्धवगीता ( एकादशस्कंद भागवत ) ओ. ८२७, पूजावसर श्लोक, पूजावसर ओ. ६०, विन्हाष्टक, जयाष्टक, मूर्तिवर्णन गद्य, श्रीमद्भगवद्गीता भाष्य" इतक्या ग्रंथाचा उल्लेख केलेला आहे. यांत श्रीकृष्णचरित्र, श्रीदत्तात्रयचरित्र व श्रीचक्रपाणीचरित्र या ग्रंथांचा उल्लेख नाहीं. या काव्यसूचीचे लेखक कै. वि. ल. भावे असल्याचें त्या पुस्तकावर छापलेलें आहे. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं 'कार्तिक शु ॥ १५ मा शके १८४६' मध्यें प्रसिद्ध केलेल्या या सूचींत भास्कराच्या नांवावर ज्या चरित्रग्रंथाचा निर्देश केलेला नाहीं त्यांचा निर्देश त्यांनीं 'मिति पौष शु. ११ शी शके १८४६' मधें म्हणजे जवळ जवळ दोनच महिन्यानंतर प्रसिद्ध केलेल्या महाराष्ट्र सारस्वताच्या तिसऱ्या आवृत्तींत केलेला आहे. या दोन महिन्यांत त्यांचें हें मतपरिवर्तन झालें कीं काय? झालें

६. म. क. का. सू. ( लेखक कै. भावे. ) पृष्ठ १८.

७. या महानुभावीय कविकाव्यसूचीचें कर्तृत्व कै. भाव्यांनी आपल्याकडे घेतलेलें असलें तरी वस्तुस्थिति तशी नसावी असें मला वाटतें. एरवीं हल्लीं हयात असलेल्या व्यक्तींच्या काव्यांचा उल्लेख त्यांत घुसला नसता. ( मागें पृष्ठ ५ पहा ) माझ्या मतें ही सूची कोणीतरी महानुभावानेंच तयार केली असून ती भाव्यांनी आपल्या नांवावर छापली असावी. म्हणूनच तींत अनेक प्रमाद राहिलेले आढळतात.

असल्यास त्याचीं कारणें द्यावयास पाहिजे होतीं. पण तीं त्यांनीं दिलेलीं नाहींत. कांहींही असलें तरी कै. भाव्यांनीं आपल्या कवीच्या नांवावर लादलेल्या दोन्ही तिन्ही ग्रंथांचें कर्तृत्व चुकीचें व निराधार होय यांत शंका नाहीं. श्री. य. खु. देशपांडे व श्री. वा. ना. देशपांडे यांनीं आपले ग्रंथ व लेख लिहितांना कै. भाव्यांच्या महाराष्ट्र-सारस्वतांतून भास्कराच्या ग्रंथाविषयींची माहिती उचलली असावी असें दिसतें. आणि म्हणूनच, हे चरित्रग्रंथ ( श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रय व श्रीचक्रपाणी ) भास्कराचे म्हणून लिहिण्यांत त्यांचीही चूक झालेली आहे.

## गीतेवरील टीका:

भास्करभट्टानें गीतेवर एक टीका लिहिल्याचा उल्लेख कै. भावे यांनीं केलेला आहे. श्री. य. खु. देशपांडे यांनींही हा उल्लेख केला आहे पण 'एक संस्कृत व एक मराठी' अशी पुस्ती त्यांनीं जोडलेली आढळते. अर्थात् श्री. देशपांडे यांच्या मतें भास्करानें गीतेवर दोन टीका लिहिल्या होत्या असें दिसतें. महानुभाव कवि-काव्य-सूचींत सुद्धां 'श्रीमद्भगवद्गीताभाष्य' नांवाचा एक ग्रंथ भास्कराच्या नांवावर नमूद केलेला आढळतो. पण भास्करानें खरोखर गीतेवर एखादी दुसरी टीका 'लिहिली' होती कीं नाहीं हा वादग्रस्त प्रश्न आहे. भास्करानें टीका लिहिली नसावी असें माझें स्वतःचें मत आहे. अन्वयस्थळांत भास्कराच्या इतर ग्रंथांबरोबर 'श्रीमद्भगवद्गीताभाष्य वाखाणती : तो भाष्य आला नाहीं' असा या टीकेचा निर्देश आहे व त्यावरूनच बहुधा वरील तिन्ही ठिकाणीं भास्करानें गीताटीका लिहिल्याचा उल्लेख केला असावा. पण वृद्धाचारांत मात्र या टीकाग्रंथाचा निर्देश आढळत नाहीं. वृद्धान्वयापूर्वी वृद्धाचार लिहिला गेला आहे व म्हणून तो अधिक विश्वसनीय मानावा लागतो. शिवाय वृद्धान्वयांतील उल्लेखसुद्धां कांहीं असंदिग्ध शद्बांत नाहीं. 'श्रीमद्भगवद्गीताभाष्य

८. म. सा. भाग १ पृष्ठ ९२
९. म. म. वा. पृष्ठ. २४.
१०. म. क. का. सू. १८

वाखाणती ' याचा 'कित्येक असें म्हणतात ( स्तुतिपूर्वक ) कीं भास्करानें गीताभाष्य लिहिलें आहे ' असा सरळ अर्थ होतो. त्यावरून वृध्दान्वयकारानें ही माहिती खात्रीची म्हणून नमूद केलेली आहे असें म्हणतां येत नाहीं. त्याच्या वेळीं तो ग्रंथ उपलब्ध नव्हता व आजही नाहीं. अर्थात् प्रस्तुत भाष्य ऊर्फ टीका भास्करानें लिहिली असावी कीं नाहीं याबद्दल खुद्द वृध्दान्वयकाराला स्वतःलाच संशय होता असें स्पष्ट दिसतें. म्हणून त्याचा आधार उपयोगाचा नाहीं. नागदेवाचार्यांच्या समोर भास्करभट्टानें गीतेवर व्याख्यान केल्याचा उल्लेख स्मृतींत[११] आहे. पण त्याचें तें व्याख्यान त्यानें स्वतः अथवा इतर कोणी लिहून ठेवल्याचा उल्लेख मात्र नाहीं. जें व्याख्यान ऐकतांना खुद्द आचार्यांचें अंतःकरण ' चंद्रमए ' होत असें तें जर ग्रंथनिविष्ट झालें असतें तर त्याचा उल्लेख स्मृति अथवा वृध्दाचार या दोन महत्त्वाच्या ग्रंथांपैकीं कशांत तरी आल्याविना राहिला नसता. पण या दोन्ही ग्रंथांत तसा निर्देश नाहीं व वृद्धान्वयांतील निर्देश संदिग्ध आहे. त्यावरून भास्करानें हा ग्रंथ लिहिला नसावा असें वाटतें. भास्करानें केलेल्या प्रवचनांच्या उल्लेखाच्या आधारावरच त्यानें गीताभाष्य रचलें असावें अशी कांहीं श्रद्धाळु शिष्यप्रशिष्यांची समजूत झाली असावी. पण तींत कांहीं अर्थ नाहीं हें वरील पुराव्यांवरून स्पष्ट दिसतें.

## व्याकरणविषयक प्रबंध

या गीता-टीकांप्रमाणेंच भास्कराच्या व्याकरणविषयक रचनेचीही स्थिति आहे, किंबहुना ती अधिक शोचनीय आहे असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. श्री. मो. स. मोने ( अध्यापिकाशाळा, हिंगणें-पुणें ) यांनीं संग्रहीत केलेल्या, पण्डित भीष्माचार्यकृत पञ्चवार्तिकाच्या[१२] आरंभीं महानुभावीय व्याकरणकारांची माहिती देतांना भास्करभट्टाला मराठी भाषेचा आद्य व्याकरणकार ' बनविलें ' आहे. ' भाषाशास्त्रावर, व्याकरणावर निबंध पं. वर्य श्रीकवीश्वरव्यासाचा होता, अशा प्रकारचे उल्लेख महानुभावीय वाङ्मयामध्यें आढळतात '

११. ना. स्मृ. २१५. मार्गे. प्र. १. पृष्ठ पहा.

१२. पंचवार्षिक पृ. ३-४

असें आरंभींच म्हटलेलें आहे. पण तें खरें नाहीं. निदान माझ्या वाचनांत आलेल्या एकाही ग्रंथांत ( पोथींत ) भास्करानें व्याकरणावर निबंध लिहिल्याचा चुकुन सुद्धां उल्लेख मला आढळला नाहीं. निरनिराळ्या श्रेष्ठ व ज्येष्ठ महानुभावांच्या ग्रंथांचीं टांचणें ज्यांत असतात अशा वृद्धान्वयांतमुद्धां भास्कराच्या नांवावर व्याकरणाचा एखादा ग्रंथ उल्लेखिलेला आढळत नाहीं. मागें उध्दृत केलेल्या वृद्धान्वयांतील उताऱ्यावरून वाचकांच्या ही गोष्ट सहज लक्षांत येईल. वृद्धान्वयाच्या इतर पोथ्यांत ( आम्नायांच्या ) देखील मला असा निर्देश आढळला नाहीं. स्मृति व वृद्धाचारांत तर तो नाहींच नाहीं. सारांश भास्करभट्ट यानें व्याकरणावर ग्रंथ लिहिल्याचे उल्लेख महानुभावीय वाङ्मयांत आढळतात असें लेखकानें म्हटलें असलें तरी पुराव्याच्या अभावीं तें विश्वसनीय मानतां येत नाहीं. रा. देशपांडे व कै. भावे यांच्या ग्रंथांत तसेंच महानुभावकविकाव्यसूचींत मुद्धां भास्कराच्या नांवावर व्याकरणाचा ग्रंथ आढळत नाहीं हेंही लक्ष्यांत घेण्यासारखें आहे. श्री. वामनराव देशपांडे यांनीं भास्कराच्या चरित्रावर लिहिलेल्या लेखांतही भास्कर व्याकरणकार असल्याचें ते नमूद करीत नाहींत. फक्त पञ्चवार्तिकाच्या प्रास्ताविक भागांतच त्याला व्याकरणकार बनविलेलें आढळतें. भास्कराचें व महानुभावपंथाचें कर्तृत्व फुगवून दाखविण्याचा हा प्रयत्न जितका निराधार आहे तितकाच तो शोचनीयही आहे. पंचवार्तिकाच्या या आवृत्तींत ‘ श्रीभास्करकवीश्वर व्यासा ’ विषयीं जी माहिती दिलेली आहे तिच्याच आधारानें माझ्या म्हणण्याचें यथार्थत्व पटवून देतां येईल. ‘ पंचवार्तिककारानें आपल्यापूर्वी झालेल्या निबंधकारांचा उल्लेख याप्रमाणें केला आहे ’ अशी प्रस्तावना करून आनोबासाचें व्याकरणकर्तृत्व दाखविण्यासाठीं एक वाक्य लेखकानें उध्दृत केलें व पुढें ‘ तयाप्रमाणें कवीश्वरव्यासाच्या भाषाशास्त्र–मराठी व्याकरण–या निबंधाचा उल्लेख आहे ’ असें विधान तो करतो. ज्या ठिकाणीं कवीश्वर व्यासाच्या निबंधाचा उल्लेख आहे तें वाक्य लेखकानें उध्दृत कां केलें नाहीं ? कवीश्वराची माहिती देतांना, आनोबासाच्या कर्तृत्वाचा दाखला देण्यासाठीं एक वाक्य उध्दृत करणें लेखकाला अवश्य वाटलें आणि

खुद्द चरित्रनायकाच्या कर्तृत्वाविषयीं ? त्याचा मात्र उडता उल्लेख ! असें कां ? उत्तर अगदीं स्पष्ट आहे. मूळ आडांतच नाहीं तर पोहोऱ्यांत कुठून येणार ? पंचवार्तिक मूळ ग्रंथ अथपासून इतिपर्यंत वाचला तरी भास्कराच्या व्याकरण ग्रंथाचा उल्लेख त्यांत कुठेंच आढळत नाहीं. आणि जेथें भास्करानें मुळीं ग्रंथ लिहिलेलाच दिसत नाहीं तेथें बिचारा पंचवार्तिककार तरी उल्लेख कोठून करणार ? याच चरित्रवजा माहितींतील दुसरीही एक विसंगति लक्षांत घेण्यासारखी आहे. पांचव्या पृष्ठावर भास्कराच्या ग्रंथांची खरीखोटी यादी देतांना इतर ग्रंथांबरोबर ‘ महाराष्ट्रभाषा ’ या नांवाच्या व्याकरणविषयक ग्रंथाचा हे लेखक निर्देश करतात, तर एक पान उलटून ( ६ व्या पानावर ) ‘ कवीश्वराचार्यांच्या व्याकरणविषयक निबंधाचें नांव ‘ सुभाष्य ’ किंवा ‘ भाष्य ’ असें होतें ’ म्हणून तेच लेखक लिहितात. यांतून खरें नांव कोणतें ? महाराष्ट्रभाषा ? कीं भाष्य ? कीं सुभाष्य ? कीं यांपैकीं एकही खरें नाहीं ? हा शेवटचाच तर्क तर्कशुद्ध असल्याचें आमच्या वरील विवेचनावरून अभ्यासकांच्या लक्षांत येईल अशी खात्री वाटते. तात्पर्य भास्कराला व्याकरणकार (ही) बनवण्याचा प्रयत्न केला आहे हें उघड दिसतें. पण हा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं व होणें शक्य नाहीं ही गोष्ट सुद्धां तितकीच उघड आहे. गीताटीकेचा वृद्धान्वयांत निदान संदिग्ध कां होइना पण उल्लेख तरी आहे, परंतु व्याकरणविषयक ग्रंथाचा तर उल्लेखही नाहीं. स्मृति व वृद्धाचारांतही तो नाहीं.[१] या सर्व पुराव्याच्या साह्यानें भास्करानें व्याकरणावर एखादा ग्रंथ लिहिलेला आढळत नाहीं असें खात्रीपूर्वक म्हणतां येतें.

## नरविलापस्तोत्र

वरील विवेचनावरून, कांहीं आधुनिक संशोधकांनीं भास्करभट्ट बोरीकराचे म्हणून निर्देशिलेले श्रीकृष्णचरित्र, श्रीदत्तात्रयचरित्र, श्रीचक्रपाणीचरित्र गीता टीका व व्याकरणविषयक प्रबंध हे ग्रंथ त्याचे नाहींत ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत सहज येईल. आतां राहिला वाद वृद्धाचार व वृद्धान्वय यांच्या लेखकांनीं निर्देशिलेल्या इतर ग्रंथांसंबंधींचा. या दोहोंतही ज्यांचा उल्लेख

आढळतो असे फक्त चारच ग्रंथ आहेत. १ शिशुपालवध २ उद्धवगीता ३ नरविलापस्तोत्र व ४ संस्कृत श्लोकबद्ध पूजावसर. यांपैकीं शिशुपालवध व उद्धवगीता हे ग्रंथ भास्कराचे असल्याबद्दल शंकाच घ्यावयास नको. हव्या तितक्या अंतर्गत व बाह्य पुराव्यावरून तें सहज सिद्ध करतां येईल. नरविलापस्तोत्र म. श्रीदत्तलक्षराज कवीश्वर ( माहूर ) यांनीं इ. स. १९०० च्या सुमारास पेशावर येथें प्रसिद्ध केलेलें आहे. शिशुपालवध व उद्धवगीता या ग्रंथांत ज्याप्रमाणें ग्रंथकर्त्याचें नांव मधून मधून अनेक ठिकाणीं आलें आहे त्याप्रमाणें तें मुद्रित नरविलापांत मात्र आढळत नाहीं. त्यामुळें हें स्तोत्र भास्कराचें आहे किंवा नाहीं हें अंतर्गत पुराव्यावरून सांगणें कठिण आहे. तथापि या काव्यांतील हृदयाल्हादकारी कल्पनांकडे व श्रुतिसुभग रचनेकडे लक्ष दिलें तर तें भास्कराचें असावें असें वाटतें. भास्कराच्या रसिक प्रतिभेला व बुद्धिमत्तेला शोभेल अशीच या स्तोत्राची रचना आहे. या अंतर्गत काव्यगुणां-वरून व वृद्धाचार आणि वृद्धान्वयांतील उल्लेखांवरून हें स्तोत्र भास्कराचें असावें असें वाटतें. मला नुकत्याच मिळालेल्या एका जीर्णपोथींत हें काव्य लिहिलेलें आढळलें. त्याच्या आरंभीं ' ।। श्रीपरेशायनम : ।। भास्करकवि ' असा उल्लेख असून शेवटीं तर ' इति श्रीपूज्यपादाचार्य्यावर्य्य श्रीमन्नागार्जुनाचार्य्यशिष्य कविभास्करविरचितं नरविलापस्तोत्रं संपूर्णसमाप्त ।। ' असा समाप्तिलेख आहे. यावरून सुद्धां माझ्या विधानाला पुष्टि मिळते व नरविलाप भास्कराचेंच काव्य होय असें खात्रीपूर्वक वाटतें.

## संस्कृत पूजावसर

जी गोष्ट नरविलापाची तीच संस्कृत पूजावसराचीही होय. वृद्धान्वयांत या पद्यांचा निर्देश आहेच. हे श्लोक अजून पावेतों छापलेले नाहींत. महन्त श्रीदत्तलक्षराज माहूरकरांच्या टिपणावरून मला ते प्रथम वाचावयास मिळाले होते. वर निर्देशिलेल्या पोथींत हे पूजावसराचे श्लोकही लिहिलेले आहेत. त्यांच्या शेवटीं ' इति श्रीभास्करकविविरचितास्त्रयःपूजावसराःसमाप्ताः ।। ' असा उल्लेख आहे. यावरून प्रस्तुत काव्य भास्कराचें असावें याविषयीं शंका वाटत

नाहीं. चक्रधराची सकाळ, दुपार व संध्याकाळ या तिन्ही काळांतील दिनचर्या हा रूक्ष विषय यांतील कथावस्तु असल्यामुळें त्यांत भास्कराला आपल्या शक्तीची करामत दाखवावयास विशेष जागा सांपडली नाहीं. आणि म्हणूनच हे संस्कृत पूजावसराचे श्लोक नीरस वाटतात.ते कसेही असले तरी ते भास्कराचेच आहेत हें मात्र उपलब्ध पुराव्यावरून निश्चित सांगतां येतें.

## मराठी पूजावसर.

संस्कृत पूजावसर भास्करभट्टाचा असला तरी मराठी पूजावसर मात्र त्यानें लिहिलेला आहे असें निश्चित मानतां येत नाहीं. भास्करानें मराठी पूजावसर लिहिला असावा असें मानावयास दोन प्रमुख कारणें आहेत. एकतर मागें उध्दृत केलेल्या वृद्धाचारांतील आख्यायिकेंत तसा स्पष्ट उल्लेख आहे. शिवाय दुसरें असें कीं त्या आख्यायिकेंतील, या पूजावसराची शेवटची म्हणून निर्देशिलेली ओवी व भास्कराच्या इतर काव्यांतील शेवटच्या ओव्या यांत विलक्षण साम्य आढळतें. शिशुपालवधाच्या अंतिम भागांत आलेली

हा शिशुपालवधु : आईकतां तुटे भवबंधु
जीवां होये प्रबोधु : परमतत्त्वांचा ॥ १०८७ ॥

ही ओवी, तसेंच उद्धवगीतेच्या अंतिम भागांतील

या आईकतां उद्धवगीता
प्रबोधु उपजे श्रोतेयाचिया चित्ता
परब्रह्मेसीं होए सायोज्यता
म्हणे कवी भास्करू ॥ ८२७ ॥

ही ओवी, या दोन्ही ओव्यांचें प्रतिपाद्य पूजावसरांतील शेवटच्या म्हणून निर्देशिलेल्या

ऐसीया ओव्या पढतां
जीवा होए चोखाळता
परब्रह्मेसीं होए सायुज्यता
म्हणे कवी भास्करू ॥

या ओवीशीं असलेलें साम्य पाहून तर तिहींचाही कर्ता भास्करभट्टच असावा, अर्थात् मराठी पूजावसर भास्कराचाच, असें वाटतें, पण तसें खात्रीपूर्वक मात्र मानतां येत नाहीं. कारण एक तर या पूजावसराची संपूर्ण प्रत अजून माझ्या अवलोकनांत आलेली नाहीं. माहूर व रितपुर या दोन्ही संग्रहालयांत ती अनुपलब्ध आहे. शिवाय कोणत्याच वृद्धान्वयांत या पूजावसराचा निर्देश नाहीं, ही गोष्ट सुद्धां महत्त्वाची आहे. भास्कराच्या सर्व ग्रंथाचा निर्देश करीत असतांना वृद्धान्वयकार पूजावसराचा उल्लेख करावयास विसरले असतील असें वाटत नाहीं. बरें या पूजावसराचा निर्देश वृद्धाचाराच्या सर्वच प्रतींत आढळतो असें म्हणावें तर तसेंही नाहीं. मागें उध्दृत केलेली आख्यायिका माहूर प्रतीवरून घेतलेली आहे. रितपूर येथें मिळालेल्या एका पोथींतील आख्यायिकेपेक्षां माहूर प्रतींत जवळ जवळ १८ आख्यायिका ज्यास्त आहेत. त्या सर्वच प्रक्षिप्त आहेत कीं काय हें आज निश्चित करतां येत नाहीं; पण माहूरप्रतींतील पूजावसराची आख्यायिका तरी प्रक्षिप्त असावी असें मला वाटतें. कारण एक तर रितपुर प्रतींत ती आढळत नाहीं. शिवाय तींत निर्देशिलेल्या मराठी ओवीबद्ध पूजावसराचा कोणत्याच वृद्धान्वयांतही उल्लेख आढळत नाहीं. यामुळें त्या आख्यायिकेच्या सत्यत्वाविषयीं जबर संशय उत्पन्न होतो. आणि असें वाटावयास लागते कीं बहुधा, शिशुपालवध व उद्धवगीता यांतील अंतिम ओव्यांचें मुद्दामच अनुकरण करून या आख्यायिकेंतील कल्पित पूजावसराची शेवटची ओवी तयार केलेली असेल. निदान मला तरी तसें वाटतें. कै. भावे व श्री. य. खु. देशपांडे यांनीं दिलेल्या यादींत 'पूजावसर' आहे पण तो संस्कृत कीं प्राकृत हें त्यांनीं स्पष्ट केलेलें नाहीं. बहुधा तो संस्कृतच असावा. कारण त्याचा स्पष्ट उल्लेख वृद्धाचार व वृद्धान्वय या दोन्ही ग्रंथांत आहे महानुभावकविकाव्यसूचींत त्याचा उल्लेख आहे. पण ही सूची तयार करणारे महंत माहुरकरच असल्यामुळें व वरील प्रक्षिप्त आख्यायिका माहूर प्रतींतीलच असल्यामुळें तिच्यांतील उल्लेखाचा पुरावा म्हणून विशेष उपयोग नाहीं हें कोणाच्याही ध्यानांत येईल. सारांश वरील कारणांमुळें एखादा मराठी ओवीबद्ध पूजावसर आपल्या भास्करभट्टानें लिहिला असावा असें मला वाटत नाहीं.

## वृद्धान्वयांत उल्लेखिलेलीं इतर काव्यें.

वृद्धाचारांत उल्लेखिलेल्या पांच ग्रंथांपैकीं १ शिशुपालवध, २ उद्धवगीता, ३ नरविलाप स्तोत्र व ४ पूजावसर ( संस्कृत ) हे चार ग्रंथ भास्करभट्ट बोरीकराचेच असल्याबद्दल आतांपर्यंत आपण विचार केला. आतां वृद्धान्वयांत उल्लेखिलेल्या इतर सात ग्रंथांचा थोडक्यांत विचार करून हें विवेचन संपवूं. त्यांत आरंभीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं सामान्यतः वृद्धान्वयांतील माहितीपेक्षां वृद्धाचारांतील माहिती अधिक विश्वसनीय समजली जाते. कारण वृद्धान्वयापूर्वी अनेक वर्षें अगोदर वृद्धाचार लिहिला गेला. शिवाय महानुभाव पंथांतील निरनिराळ्या आम्नायांचे निरनिराळे वृद्धान्वय असल्यामुळें क्वचित त्यांच्या माहितींत फरक असलेला सुद्धां आढळून येतो. वृद्धाचारांत जी माहिती येणें शक्य होतें ती तेथें नसून फक्त वृद्धान्वयांतच आढळली म्हणजे तिच्या सत्यतेबद्दल तात्काळ शंका उत्पन्न होते. वृद्धान्वयांत निर्देशिलेल्या भास्कराच्या इतर सात ग्रंथांबद्दल अशी शंका घ्यावयास बरीच जागा आहे. हे ग्रंथ जर भास्कराचे असते तर वृद्धाचारकर्त्यानें त्यांचा उल्लेख आपल्या पुस्तकांत अवश्य केला असता. एका विशिष्ट आम्नायाचा प्रवर्तक या नात्यानें भास्कराची पदवी बरीच मोठी होती. शिवाय महानुभाव पंथाचे प्रमुख आचार्यत्व त्याजकडे अनेक वर्षें असल्यामुळें तर त्याच्या श्रेष्ठत्वाविषयीं निराळें लिहावयासच नको. अशा या पूज्य व्यक्तीच्या सर्व ग्रंथांचा उल्लेख वृध्दाचारकर्त्यानें अवश्य केला असता. पण ते ग्रंथच अस्तित्वांत नसल्यामुळें बिचाऱ्या वृद्धाचारकर्त्यानें तरी काय करावें ? सारांश, वृद्धाचारांत नसलेले पण वृद्धान्वयांत उल्लेखिलेले हे सात ग्रंथ भास्कराचे नसावेत असें सामान्यतः म्हणावयास हरकत नाहीं. याला फक्त ' प्रस्ताव श्लोक ३९ ' ( चालीसाख्यें[१३] स्तोत्र नांवानें प्रसिद्ध असलेल्या ) पुस्तकाचाच अपवाद केला पाहिजे. या स्तोत्रांत भास्कर

१३. मागें उल्लेखिलेल्या जुन्या पोथींत हे श्लोक आहेत. पण त्यांची संख्या सुद्धां ४० आहे. श्लोकांच्या शेवटीं असलेला समाप्तिलेख असाः— ' इति श्री कवीश्वरसूरिविरचितं प्रस्तावायकथाकथनस्तोत्रं समाप्तिमगमत् '

कवीनें निरनिराळ्या वेळीं लिहिलेल्या श्रीकृष्णगुणवर्णनपर श्लोकांचा अंतर्भाव केला आहे. अर्थात् भास्कराच्या मृत्यूनंतर केव्हांतरी त्याच्या कोणातरी शिष्यानें हे इतस्ततः विखुरलेले श्लोक एकत्रित करून त्यांस चालिसाख्य स्तोत्र हें नांव दिलें असावें. वृद्धाचारांत यांचा उल्लेख नाहीं त्यावरून, वृद्धाचार लिहिला गेल्यानंतरच हे श्लोक एकत्रित करण्यांत आले असावे असा तर्क करावयास हरकत नाहीं.

भास्कराच्या नांवावर वृद्धान्वयकारानें दिलेलें निर्वचन स्तोत्र व ऋद्धिपूरच्या ओव्या मला वाचावयास मिळाल्या नाहींत. या दोन्ही काव्यांचा महानुभाव–कवि–काव्यसूचींत भास्कराच्या नांवावर उल्लेख नसल्यामुळें, आतांपर्यंत कोणत्याही पोथींत आपल्या कवीच्या नांवानें हीं काव्यें आढळलीं नसावीं असें दिसतें. त्यानंतर झालेल्या संशोधनांतही तीं कुठें दृष्टोत्पत्तीस आलीं नाहींत. निर्वचन स्तोत्रें व ऋद्धिपुरवर्णनें इतर अनेक कवींनीं लिहिलेलीं असल्यामुळें त्यांपैकींच कुणाचीं तरी काव्यें भास्कराचींच समजून वृद्धान्वयकारानें त्यांचा निर्देश केलेला असावा असें वाटतें. शिवाय यांचा उल्लेख वृद्धाचारांत नाहीं हेंही याठिकाणीं लक्षांत घेणें अवश्य आहे. जी गोष्ट वरील दोन ग्रंथांची तीच राहिलेल्याची सुद्धां आहे. अवतारषट्क म्हणून उल्लेखिलेले श्लोक अद्याप कुठेंच आढळले नाहींत. विरहाष्टक, जयाष्टक व श्रीयाष्टक हीं तिन्ही अष्टकें, श्रीदत्तराज महंतांनीं नकलून ठेवलेलीं मला वाचावयास मिळालीं. यांपैकीं एकाच्याही शेवटीं भास्कराचें नांव नाहीं; यांना 'अष्टकें' म्हणून संबोधिलें असलें तरी त्यांपैकीं प्रत्येकांत नऊ श्लोक आहेत. भास्करासारख्या श्रेष्ठ कवीकडून नऊ श्लोकांच्या काव्यास अष्टक म्हणून नांव दिलें जाणें संभवनीय वाटत नाहीं; शिवाय वृद्धाचारांत यांचा उल्लेख नाहीं या कारणांवरून हीं 'अष्टकें' भास्कराचीं नसावीं असेंच म्हणावें लागतें. राहतां राहिले गद्यचाली ७+५=१२ श्लोक. पं. श्री. दिवाकर महानुभाव शिष्य, हरिबा पंजाबी यांनीं करसाल (पंजाब) येथें १२ श्लोकांचें मूर्तिवर्णन स्तोत्र भास्कराच्या नांवावर प्रसिद्ध केलें आहे. त्याचेही, एक पांच श्लोकांचा व दुसरा सात श्लोकांचा असे दोन भाग आहेत. हें मूर्तिवर्णन स्तोत्र म्हणजेच वृद्धान्वयकारानें उल्लेखिलेले गद्यचाली १२ श्लोक होत

जुने महानुभावीय महंत नियमक श्लोकांना गद्यचालीचे श्लोक म्हणून संबोधीत असत असें दिसतें. हय्यग्रीवबासाच्या गद्यराज–स्तोत्रावरूनही हीच गोष्ट लक्षांत येते. याही श्लोकांच्या शेवटीं किंवा मध्यें कोठेंच भास्कराचें नांव नाहीं. वृद्धाचारांत तर यांचा उल्लेख नसल्याचें आपण वर पाहिलेंच. यामुळें हे श्लोक भास्कराचेच असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं.)

सारांश, भास्करभट्ट कवीश्वराच्या नांवावर निरनिराळ्या विद्वानांनीं उल्लेखिलेल्या १५–१६ ग्रंथांपैकीं शिशुपालवध, उद्धवगीता व पूजावसर ( संस्कृत ) या तीनच काव्यांचें कर्तृत्व त्याजकडे अगदीं निर्विवादपणें जातें. अंतर्गत काव्यगुणांवरून व वृद्धाचारांतील पुराव्यावरून नरविलाप–स्तोत्राचें जनकत्वही या संन्याशी महानुभावाकडे द्यावयास हरकत नाहीं. राहिलेल्या काव्यांपैकीं चालिसाख्य-स्तोत्र या ३९ श्लोकांच्या संग्रहाशिवाय इतर कोणतेंच काव्य भास्कराचें नसावें, असें माझें मत आहे, या बाबतींत माझा कोणत्याच प्रकारचा आग्रह नाहीं. वरील विवेचनांत ज्या काव्यांचें कर्तृत्व मी भास्करा-कडून काढून घेतलें आहे तीं काव्यें भास्करानेंच लिहिलीं असें सप्रमाण सिद्ध झाल्यास त्यांत मला आनंद वाटेल हें या ठिकाणीं नमूद करणें अवश्य वाटतें.

---

## शिशुपालवधाचा लेखनकाल.

भास्करभट्ट बोरीकराच्या ग्रंथांचा, आणि त्यांतही विशेषतः शिशुपालवधाचा लेखनकाल निश्चित होणें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. कारण केवळ महानुभावीयचें[1] नव्हे तर सर्व मराठी काव्यांतील आद्यग्रंथाच्या मानाचें पान या काव्याला अनेकांनीं दिलेलें आढळतें. शिवाय इतर कांहीं ग्रंथांच्या व प्रसंगांच्या[3] कालनिर्णयासाठीं या काव्याच्या लेखनशकाचा नेहमीं आधार घेतला जातो. याप्रमाणें इतर ग्रंथांच्या व प्रसंगांच्या कालनिर्णयाची इमारत प्रस्तुत काव्याच्या लेखनशकरूपी पायावर आधारलेली असल्यामुळें या पायाचें विशेष विचिकित्सात्मक दृष्टीनें व्यवस्थेशीर विवेचन होणें अत्यंत आवश्यक आहे. हा प्रश्न या ठिकाणीं उपस्थित करण्याचें कारण, आजपर्यंत बहुतेक लेखकांनीं प्रतिपादलेला किंवा मान्य केलेला लेखनशक मला स्वतःला संमत नाहीं हें वरील त्रोटक प्रस्तावनेवरून वाचकांच्या लक्षांत येईलच.

### शकाची ओवी प्रक्षिप्त

कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं संपादिलेल्या शिशुपालवधाच्या मुद्रित प्रतींत शेवटीं पुढील ओवी छापलेली आहे.

शके शरांकरुद्रशत रोकडे :
श्रीमुख माधवमासु चोखडे :
तै श्रीकृष्णाचे पवाडे
वाणिले मियां ॥ १०८८ ॥

---

१. म. सा. भाग १. पृ. ९५; वाङ्मय ( नाशीक ) वर्ष २. मधील माझा ' महानुभावांचा आद्यग्रंथ ' हा लेख पहा.

२. वि. शा. वि. फेब्रु. १९३३ पृष्ठ ७२-७३.

३. वि. शा. वि. ऑक्टो. १९३२ ' श्रीचक्रधरचरित्र-भूमिकापर ऐतिहासिक दृष्टी ' पृ. १२. तळटीप पहा.

वरील ओवीवरून शके, शर ( ५ ) अंक ( ९ ) रुद्रशत ( ११ शें ) =११९५ ( ' अंकानां वामतो गतिः ' या नियमानुसार ) मध्यें, माधव = वैशाख महिन्यांत प्रस्तुत काव्य लिहिलें गेल्याचें समजतें. कै. भावे यांनींच आपल्या महाराष्ट्र सारस्वतांत दिलेली ओवी मात्र थोडीशी भिन्न आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे. महाराष्ट्र सारस्वतांतील ओवी येणेंप्रमाणें

शरांक रुद्र रोकडे : श्रीमुख माधव चोकडे
श्रीकृष्णवर्णन तोकडें : वानिलें मियाँ

ही ओवी लक्षांत घेतली असतां एकतर कै. भाव्यांच्या सारस्वतांतील ओवींत कांहीं शब्द गळालेले असावेत किंवा काव्याच्या मुद्रित प्रतींत कांहीं शब्दांची भर तरी पडली असावी असें म्हणावें लागतें. तिसऱ्या चरणांत असलेला फरक तर फारच जाणवणारा आहे. शिवाय भास्करभट्टाची काव्यरचनाशैली लक्षांत घेतली असतां, प्रस्तुत ओवींतील ' रोकडे ' ' चोकडे ' ' तोकडे ' वगैरे सारख्या निरर्थक शब्दांचीं भेंडोळीं त्याच्याकडून वापरलीं जाणें संभवनीय दिसत नाहीं. यावरून ही ओवी किंवा ह्या दोन्ही ओव्या प्रक्षिप्त असल्या पाहिजेत, भास्करभट्टाच्या त्या नव्हत असें मानण्याकडे मनाचा कल बऱ्याच अंशीं झुकतो. महाराष्ट्रसारस्वताच्या मुद्रणकाळीं तयार करून घातलेल्या ओवीवर संस्करण होऊन कदाचित त्या काव्याच्या अखेरीस छापलेली वर उल्लेखलेली कालनिदर्शक ओवी तयार झाली असणें संभवनीय आहे. असो. पण केवळ वरील कारणांमुळेंच ती ओवी प्रक्षिप्त मानणें विशेष सयुक्तिक होणार नाहीं. त्यासाठीं प्रस्तुत काव्य शके ११९५ मधें लिहिलें जाणें कसें असंभवनीय आहे हें दाखविलें पाहिजे, तें दाखविण्यासाठीं कांहीं सबळ पुरावा मिळत असल्यास तो आधीं विचारांत घेणें अवश्य आहे.

४. म. सा. भाग १. पृ. ८९.

५. महन्त माहूरकरांच्या हस्तलिखित टिपणांत ही ओवी अगदीच भिन्न शब्दांत लिहिलेली आढळते. एकाच ओवीच्या या तीन स्वरुपांमुळें तर ती प्रक्षिप्तच असावी असें खात्रीपूर्वक वाटावयास लागते.

## श्री. बाळकृष्णशास्त्री यांची ‘ ऐतिहासिक दृष्टि ’

महानुभाव पंथांतील एक विद्वान व अधिकारी महंत श्री. बाळकृष्ण शास्त्री महानुभाव यांनीं आपल्या लेखांत[६] चिकित्सात्मक दृष्टीनें ठरविलेले श्रीचक्रधराच्या आयुष्यांतील कांहीं ऐतिहासिक शक–विशेषतः संन्यासदीक्षेचा शक लक्षांत घेतल्यास चक्रधराच्या प्रयाणाचा सांप्रदायिक काल शके ११९४ माघ व. ४ मंगळवार हा जवळ जवळ चार वर्षांनीं पुढें ढकलावा लागतो असें दिसून येईल. शके ११९० मध्यें चक्रधरानें स्वतः संन्यासदीक्षा घेऊन नागाम्बिकेला भक्तिदान दिलें व तदनंतर शके ११९४ मध्यें त्यानें बद्रिकाश्रमाकडे प्रयाण केलें असा उल्लेख शास्त्रीबोवा करतात. म्हणजे स्थूलमानानें संन्यासदीक्षा धारण केल्यानंतर अवघ्या चारच वर्षांनीं त्यानें आपलें अवतारकार्य समाप्त केलं असें त्यांच्या निर्देशावरून दिसतें. पण ही चूक आहे. चक्रधराच्या प्रयाणाच्या सांप्रदायिक शकाला चिकटून राहण्याची त्यांची ती व्यर्थ धडपड आहे असें मला वाटतें. नागदेवाचार्यचरित्रा ( स्मृतिस्थळा ) च्या कोणत्याही पोथींत पाहिलें तरी असें दृष्टोत्पत्तीस येतें कीं नागदेवाचार्यानें चक्रधराजवळ संन्यासदीक्षा घेतल्यावर चार[७] वर्षांनी त्याचे गुरु बद्रिकेदारकडे निघून गेले. आणि श्री. बाळकृष्ण शास्त्री यांच्या म्हणण्यावरून तर असें दिसतें कीं स्वतःच्या संन्यासदीक्षेनंतर चार वर्षांनीं ते निघून गेले ! मग यावरून चक्रधर व नागदेव यांनीं एकाच वर्षीं संन्यासदीक्षा घेतली असें मानावयाचें कीं काय ? आणि तसें मानलें तर तें सयुक्तिक व वस्तुस्थितीस धरून होईल काय ? याला सरळ उत्तर ‘ नाहीं ’ असें आहे. खुद्द शास्त्रीबोवांच्याच वाक्यांवरून ही चूक अधिक स्पष्टपणें निदर्शनास आणून देतां येईल. नागाम्बिकेला भक्तिदान दिल्यापासून तों आचार्यांच्या संन्यासदीक्षेच्या कालापर्यंत चक्रधराचा ‘ पूर्वार्धकाल ’ मानला

६. वि. ज्ञा वि. ऑक्टो. १९३२. ‘ श्रीचक्रधरचरित्रभूमिकापर ऐतिहासिक दृष्टि ’ पृष्ठ १२.

७. ‘ खडकुळीए अनुसरण जालें : चारी वरूषें सन्निधान ’ ( स्मृ. २ ) मागें प्र. २ रें नागदेवाचें चरित्र पहा.

जातो व नागदेवाच्या संन्यासदीक्षाकालापासून तों चक्रधराच्या बद्रिकाश्रमप्रयाणापर्यंतचा काल ‘ उत्तरार्ध काल ’ मानला जातो असें ते म्हणतात. हा पूर्वार्ध व उत्तरार्ध काल शास्त्रीबोवांच्या मतें चारच वर्षांचा आहे. तर स्मृतिस्थळाच्या सर्व पोथ्या केवळ उत्तरार्धाचाच काल चार वर्षांचा असल्याचें दृष्टोत्पत्तीस आणून देतात. शास्त्रीबोवांनीं पूर्वार्धाचें काय केलें कांहीं कळत नाहीं. मला स्वतःला तर असें वाटतें कीं ऐतिहासिकदृष्ट्या शके ११९० हा चक्रधराच्या संन्यासदीक्षेचा काल निश्चित केल्यावर, त्याचा प्रयाणकाल हा सांप्रदायिककालापेक्षां चार वर्षांनीं पुढें ढकलावा लागतो असें त्यांच्या नजरेस आलें असावें. पण सांप्रदायिक प्रयाणशक तर जसाचा तसाच कायम रहावा या इच्छेनें त्यांनीं पुढील विवेचनाला बगल देऊन त्याविषयीं पूर्णपणें मुग्धता स्वीकारली असावी. ‘ श्रीचक्रधरचरित्रा’च्या भूमिकेवर ‘ ऐतिहासिक दृष्टि ’ फेकणाराला हें खात्रीनें उचित नाहीं. कोणत्या का कारणानें होईना पण श्री. बाळकृष्णशास्त्री यांनीं ही विसंगती जाणून बुजून ठेवलेली दिसते. तरी पण आपणांस मात्र ती काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. शिशुपालवधाचा काल ठरविण्यासाठीं प्रथम चक्रधराच्या प्रयाणाचा काल निश्चित होणें अवश्य असल्यामुळें प्रथम तिकडे लक्ष देऊं.

## चक्रधराचा प्रयाणकाल.

चक्रधरानें संन्यासदीक्षा सिंहस्थांत घेतली असें रत्नमालास्तोत्र व लीळाचरित्रं या दोन्ही ग्रंथांवरून सिद्ध होत असल्यामुळें ही घटना निश्चित मानावयास हरकत नाहीं. अनेक पोथ्यांतून हा संन्यासदीक्षेचा शक ( प्रतिष्ठानगमन ) ११८६ दिला आहे. पण ऐतिहासिक दृष्टीनें विचार केला असतां या सुमाराचा सिंहस्थ शके ११९०ला येतो हें शास्त्रीबोवांनींच नमूद केलें आहे.

८. ‘ सिंहस्थे व्रजतीश नाथसुजनो गंगां व्रजामो वयम् ’ वगैरे. श्लोक १८८

९. ‘ सिंहस्त प्रसंगे त्र्यंबकायात्रे निर्गमन ’ ही व यापुढील लीळा ( लीळाचरित्र. एकांकभाग )

१०. वि. शा. वि. ऑक्टो. १९३२. ऐ. दृ. पृष्ठ. ११.

श्री.दत्तात्रय विष्णु आपटे[11] (व्यवस्थापक आनंदाश्रम.पुणें); प्रो. विश्वनाथ बळवंत नाईक[12] पुणें; श्री. दप्तरी[12] इत्यादि विद्वानांच्या मतेंही या सुमाराचा सिंहस्थ शके ११९० लाच येतो. त्यावरून कालनिर्णयाची ही एक मर्यादा निश्चित मानावयास हरकत नाहीं. सिंहस्थांत संन्यासदीक्षा घेऊन नागाम्बिकेला भक्तिदान दिल्यानंतर किती वर्षांनीं चक्रधरानें बद्रिकेदारला प्रयाण केलें हें पाहिलें म्हणजे आपल्या प्रश्नाचें उत्तर सहज मिळूं शकेल.

एका वृद्धान्वयाच्या[13] आरंभीं मला खालील प्रसंगांचा उल्लेख आढळला. "शके ११८६ क्षए संवत्सरी कार्तिक मासीं प्रत्येष्ठानीं आबाइसा भेटि दीधली ।। शके ११८८ विभव संवत्सरीं चैत्रमासीं श्रीनगरी भटा भेटि दीधली ॥ शके ११९० प्रमोद संवत्सरी माघमासी खडकुलीसी भटां अनुसरण." ग्रंथकर्तृत्वाच्या प्रकरणांत निर्देशिलेल्या पोथींतही वरील शकसंवत्सरांचाच उल्लेख आहे. या दोन्ही उल्लेखांतील शकांचा संवत्सरांशीं मात्र मेळ पडत नाहीं. त्यामुळें त्यांच्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं. पण त्यांतील निरनिराळ्या प्रसंगांमधें असलेलें कालांतर मात्र विचारांत घेण्यास कांहीं हरकत नाहीं असें मला वाटतें. म्हणजे संन्यासदीक्षेनंतर दोन वर्षांनीं चक्रधर व नागदेव यांच्या भेटीचा प्रसंग घडून आला व त्यानंतर पुन्हा दोन वर्षांनीं नागदेवानें चक्रधराजवळ संन्यासदीक्षा घेतली.अर्थात् चक्रधराच्या संन्यासदीक्षेपासून नागदेवाच्या संन्यासदीक्षेपर्यंतचा हा पूर्वार्धकाल चार वर्षांचा ठरतो.या विधानाचा पाठपुरावा करण्यासाठीं लीळाचरित्राच्या(पीढीपाठ)एका पोथींतील पुढील कालगणनेचा उतारा लक्षांत घेतल्यास संशयाला जागाच राहत नाहीं. हा उतारा असा. "आतां पूर्वार्धी लीळाकाळाचा नेम : पुसमासीं सर्वज्ञें प्रतीष्टानांसि बीजें केलें : बाइसांची भेटि तेथ : १० : भोगनारायेणीं गुंफे अवस्थान केलें : तेथ एक चातुर्मासि जाली : मग दीवाळी जालेयां कार्त्तीकमासीं ईश्वरपुरा निगाले : मासा एका ईश्वरपुरा बीजें केलें : तेथ दीस २० अवस्थान केलें :

---

११-१२. वि. ज्ञा. वि. ऑक्टो. १९३२. ऐ. दृ. पृष्ठ ११.

१२. खाजगी मत. ( श्री. नेने यांच्याकडून विचारणा. )

१३. धारासिव ओंकारबासाचा शिष्य सोंगोबास यानें लिहिलेला.

मग मासा एका पुसामध्यें एळापुरा बीजें केलें : तेथ मास सा अवस्थान जालें: मग तेथौनि श्रीनगरा संपतेनि जेष्ठें बीजें केलें : तेथ एक चातुर्मासि जाली : चैत्र जाला मास दाहा अवस्थान जालें ।। मग तेथौनि त्र्यंबक सारूनि संपतेनि उन्हाळे बीडा बीजें केलें : तेथ एक चातुर्मासि जाली : मास ४ अवस्थान जालें : मग दीपवाळीये जालेयां घाटावरौनि एलौरावरूनि तल्हाटीस बीजें केलें : भडेगांवीं सीमगा जाला : मग घाटावरि पाउसाळा करंजखेडीं हीवरळीए : ऐसि एकि चातुर्मासि जाली : मग दीपावळीयेचीये तीजे तेथौनि बीजें केलें तें गंगातीरें : मासा ती दीसा बारा संगमेस्वरा बीजें केलें : तेथ माहोमासीं सूद्ध चतुर्दसीचेनि अनूमानें भटां बोध जाला : मग खडकाळिये अवस्थान : पूढां उत्तराधलीळा : ऐसा अवघा **पूर्वार्धकाळ वर्षें ४ आन मास दीढ :** एवं काळाची संख्या ।। ( पूर्वार्धे पिढीपाठाची पोथी गोपीराज ग्रंथसंग्रहालय. )

यावरून चार वर्षें व दीड महिना इतका चक्रधराच्या पूर्वार्धांतील आयुष्याचा काळ असल्याचें निश्चित समजतें विवेचनाच्या सोयीसाठीं स्थूलमानानें हा काळ आपण चार वर्षांचाच धरून चालूं. उत्तरार्धाचा कालसुद्धां चार वर्षांचाच असल्याचें आपण मागें पाहिलें. म्हणजे संन्यास घेतल्यानंतर आठ वर्षांनीं आपलें अवतारकार्य संपवून चक्रधर बद्रिकेदारकडे निघून गेला असें स्थूलमानानें ठरतें. पोथ्यांतील शकसंवत्सरांतील विसंगतीमुळें त्यांवर विश्वास न ठेवला तरी त्यांवरून दिग्दर्शित होणारे हे कालखंड मात्र खरे मानावयास हरकत नाहीं. इतर ज्या ज्या ठिकाणीं मला हे शक पाहावयास सांपडले त्या त्या ठिकाणांवरून वरील चार चार वर्षांचे दोन्ही कालखंड ( पूर्वार्ध व उत्तरार्ध ) सर्वत्र सारखे आहेत असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय येत नाहीं. शिवाय लीळाचरित्राच्या पिढीपाठांतील वरील उतारा व नागदेवाचार्य चरित्रांतील दुसरी स्मृति या पुराव्यानी सुद्धां हे चार चार वर्षांचे दोन कालखंड स्वतंत्रपणें सिद्ध होतातच. सिंहस्थाचा शककाल ऐतिहासिक दृष्टीनें निश्चित करतां आल्यामुळें त्याच्याच साह्यानें वरील कालखंडाचे मर्यादा-

शकसुद्धां निश्चित करतां येणें शक्य आहे. ते असे. सिंहस्थ शके ११९० मधें येतो. याच वर्षी चक्रधर पैठणला गेला. तेथें त्यानें स्वतः संन्यासदीक्षा घेतली व नागाम्बिकेला भक्तिदान दिलें. त्यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे शके ११९२ मधें नागदेवाची व चक्रधराची भेट झाली. यानंतर पुन्हा दोन वर्षांनीं म्हणजे शके ११९४ मधें नागदेवानें संन्यास घेतला. येथें चक्रधराच्या आयुष्याचा पूर्वार्धकाल संपतो. त्यापुढें त्यानें फक्त चारच वर्षें इहलोकांत वास्तव्य केलें. म्हणजे शके ११९८ मधें तो बद्रिकेदारकडे निघून गेला व त्याचा अवतार समाप्त झाला. वर केलेल्या विवेचनावरून, उपलब्ध पुराव्यांच्या आधारें शके ११९८ हाच चक्रधराच्या प्रयाणाचा शक ठरतो हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल असें वाटतें.

## ११९५ मधें शिशुपालवध लिहिलें जाणें अशक्य.

आणि ११९८ मधें जर चक्रधर उत्तरेकडे गेला तर मग ११९५ मधें शिशुपालवध निर्माण होणें कसें शक्य आहे? भास्कराला चक्रधरानें बंदिखान्यांतून[14] सोडविल्याची हकीकत विश्वसनीय नाहीं हें आपण त्याच्या चरित्रांत पाहिलेंच. पण ती गोष्ट खरी आहे असें जरी गृहीत धरून चाललें तरी शके ११९५ मधें शिशुपालवध निर्माण होऊं शकत नाहीं हें वरील कालनिर्णयावरून स्पष्ट दिसतें. चक्रधराच्या प्रयाणानंतर बऱ्याच कालानें भास्कर नागदेवाचार्याजवळ आला व त्यानें पंथाची दीक्षा घेतली. तदनंतर पंथीय तत्त्वाज्ञानाच्या अभ्यासांत थोडाबहुत काळ गेल्यानंतरच शिशुपालवधाची निर्मिती त्याच्या हातून होणें संभवनीय आहे. कांहींही असलें तरी चक्रधराच्या हयातींत भास्करभट्ट पंथांत आला नव्हता हें निश्चित. तसें असतें तर लीळाचरित्रांत त्याचा उल्लेख अवश्य याव-

---

१४. चक्रधरानें उज्जयिनी येथील बंदी सोडवल्याचा उल्लेख लीळाचरित्रांत आहे. (उत्तरार्ध) पण त्यांत कोणाचाच नामनिर्देश नाही. अर्थातच भास्कराचाही नाहीं. हा संबंध भानुविजयकारानें व स्मृतींतील पूर्वोक्त प्रक्षिप्त उतारा तयार करणारानेंच जोडलेला दिसतो.

याला पाहिजे होता. पण, बंदिखान्यांतून सोडविल्याचा तर काय पण भास्कर-भट्टाचा कोणत्याच प्रकारचा उल्लेख लीळाचरित्रांत आढळत नाहीं. त्यावरून चक्रधर बद्रिकेदारकडे जाण्यापूर्वी भास्कर पंथांत आला नव्हता किंवा त्याची व चक्रधर किंवा नागदेव यांच्यांपैकीं कोणाचीही भेट झाली नव्हती असें खात्रीपूर्वक सांगतां येतें. आणि म्हणूनच शके ११९५ मधें शिशुपालवध निर्माण होणें अशक्य आहे असें विधान करावयास हरकत वाटत नाहीं.

यावर कित्येक असें म्हणतील कीं चक्रधराचा सांप्रदायिक प्रयाणकाल ऐतिहासिक दृष्टीनें जसा चार वर्षें पुढें ढकलला तसाच शिशुपालवधाचाही सांप्रदायिक शक चार वर्षांनीं पुढें ढकलावयास नको काय ? आणि तसें केलें म्हणजे चक्रधरातें प्रयाण व शिशुपालवधाची निर्मिती यांतील कालांत असलेली विसंगति सहजच दूर होते. दुसऱ्या शद्बांत सांगावयाचें म्हणजे दोन्ही बाजूंचे एकतर सांप्रदायिक किंवा एकतर ऐतिहासिक शक लक्षांत घेऊनच विवेचन करणें अधिक सुसंगत होईल. हा आक्षेप अगदीं वाजवी आहे. तदनुरोधानें, शिशु-पालवध ११९५ मधें लिहिलें जाणें संभवनीय नाहीं हें दाखविण्यासाठीं चक्र-धराचा सांप्रदायिक प्रयाणकाल शके ११९४ हाच विचारांत घेऊन काय निष्पन्न होतें तें पाहूं. माझ्या मतें वरील शक विचारांत घेतला तरी शिशुपालवध ११९५ मधें निर्माण होणें शक्य नाहीं. चक्रधराच्या प्रयाणाची नक्की मिति ( सांप्रदायिक ) शके ११९४ माघ[१५] वद्य ४ थी आहे व शिशुपालवधनिर्मितीची मिति शके ११९५ वैशाख अशी आहे. या दोहोंतील अंतर जास्तींत जास्ती तीन महिने अकरा दिवसांचें मानतां येईल. एवढ्या लहानशा काला-वधींत भास्करभट्टाला नागदेवाचें दर्शन, बोध व अनुसरण ( दीक्षा ) होऊन तदनंतर त्याचा पंथीय तत्त्वज्ञानाचा आकलनपूर्वक सखोल अभ्यास आणि मग

१५. ‘ शाके वेदनवेन्दु भूमिगणिते संवत्सरे अंगिरे । कृष्णे माघ चतुर्थि मंगलदिने ग्रामांत बेलापुरे । गंगातीर तजौनिया सुरपती बीजे करी उत्तरे ’ ( तीर्थ मालिका ) तसेंच प्र. २ रें. आरंभीं दिलेल्या नागदेवाच्या अनुसरणाच्या लीळेचा शेवट पहा. मात्र तेथें वद्य ४ थी ऐवजी ‘ सुद्ध चतुर्थि सोमवारीं ’ असा उल्लेख आहे.

शिशुपालवधासारख्या १०८८ ओव्यांच्या ग्रंथाचें लेखन–ह्या सर्व गोष्टी घडून येणें संभवनीय वाटत नाहीं. भास्करभट्ट केवढाही बुद्धिमान असला तरी नुसत्या काव्यनिर्मितीलाच त्याला एकदोन महिने लागले असतील असें मानणें चुकीचें होणार नाहीं. शिवाय चक्रधर निघून गेल्यानंतर लागलीच तो पंथांत आला असेंही म्हणतां येत नाहीं. चक्रधराच्या प्रयाणानंतर भास्कर नक्की किती दिवसांनीं पंथांत प्रविष्ट झाला हें निश्चित सांगतां येत नसलें तरी त्या बाबतींत अनुमानाला थोडीफार जागा आहे. स्मृतिस्थळांतील आख्यायिकांचे क्रमांक कालक्रमवार रीतीनें लावलेले आहेत असें सामान्यतः दिसतें. म्हणजे चक्रधराच्या प्रयाणानंतर अगदींच लौकर घडलेल्या गोष्टी आरंभीं दिलेल्या असून नागदेवाच्या मृत्युप्रसंगींच्या गोष्टी अगदीं शेवटीं आलेल्या आहेत. मधल्या आख्यायिकांचाही क्रम असाच संगतवार असावा. भास्कराच्या अनुसरणाची आख्यायिका ६५ वी आहे. त्याच्या अगोदर म्हाइभटाचें अनुसरण, केसोबासाचा पंथप्रवेश–रत्नमाला स्तोत्रनिर्मिती वगैरे अनेक प्रसंग घडले होते. नुसता रत्नमाला स्तोत्राच्या निर्मितीचा इतिहास[१६] लक्षांत घेतला तरी त्यांतच पांच सहा महिन्यांपेक्षां अधिक काळ सहज निघून गेलेला दिसतो, त्यानंतर बऱ्याच दिवसांनीं भास्करभट्ट पंथांत आला. यावरून, कांहींही असलें तरी, चक्रधरानंतर पहिल्या चारपांच महिन्यांच्या आंत तरी तो पंथांत आला नव्हता हें स्पष्ट दिसतें. भास्करभट्टाला चक्रधरानें कारागारांतून मुक्त केल्याची प्रक्षिप्त आख्याइका खरी आहे असें जरी क्षणभर गृहीत धरलें तरी चक्रधराचें वऱ्हाडांतून उज्जयिनीपर्यंत जाणें, भास्कराला कैदेंतून सोडविणें, भास्कराचें उज्जयिनीहून वऱ्हाडांत येणें, पंथाच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणें व मग काव्य लिहून पूर्ण करणें या गोष्टी केवळ साडेतीन महिन्यांत घडणें अगदीं उघड उघड अशक्य असल्याचें कोणाच्याही लक्षांत येईल. अशा परिस्थितींत चक्रधराचा सांप्रदायिक प्रयाणकाल खरा आहे असें मानून चाललें तरी शके ११९५ मध्यें शिशुपालवध निर्माण होऊं शकत नाहीं हें सहज दिसून येतें.

---

१६. कलाविकास ( उमरावती ) सेप्टेंबर १९३४ मधील माझा ' मूर्तिप्रकाश कर्ता केशवव्यास ' हा लेख पहा.

आणि म्हणूनच, वरील ११९५ हा शक शिशुपाळाच्या माथ्यावर कोणीतरी चिकटवलेला असून शकनिर्देशक ओवी प्रक्षिप्त असावी असे मला वाटतें.

## वृद्धाचाराची साक्ष.

वरील विधानाच्या सिद्धयर्थ आणखीही बरेच पुरावे देतां येण्यासारखे आहेत. त्यांचा आतां क्रमाक्रमानें विचार करूं. त्यांपैकीं महत्त्वाचा पुरावा वृद्धाचाराचा आहे. चक्रधराच्या प्रयाणापासून तों नागदेवाच्या मृत्यूपर्यंत ज्या महत्त्वाच्या गोष्टी घडल्या त्या स्मृतिस्थळांत आलेल्या आहेत, तर नागदेवाच्या मृत्युपासून परशरामबासाच्या देहावसानापावेतों घडलेल्या प्रमुख प्रसंगांची जंत्री वृद्धाचारांत आढळते हें मागील प्रकरणांत निर्दिष्ट केलेंच आहे. सातीग्रंथांत स्थान मिळालेल्या शिशुपालवधाचें लेखन हा असाच एक महत्त्वाचा प्रसंग आहे.पण त्याचा उल्लेख स्मृतिस्थळांत येत नसून वृद्धाचारांत येतो ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट होय. त्यावरून हा ग्रंथ आचार्यांच्या निधनानंतर केव्हांतरी लिहिला गेला असावा हें स्पष्ट होतें. आचार्यांचा निधनशक (सांप्रदायिक) १२२४ आहे. त्यावरून अर्थातच शके १२२४ पूर्वी शिशुपालवध निर्माण झालें नव्हतें–शके ११९५ मध्यें तर खात्रीनेंच नव्हतें ही गोष्ट उघड दिसतें. ११९५ हा शक प्रक्षिप्त मानावयास हेंहीं एक महत्त्वाचें कारण आहे.

## शिशुपाळावरील अभिप्राय नागदेवाचा कीं बाइदेवबासाचा ?

या संबंधांत एक आक्षेप उत्पन्न होण्यासारखा आहे. तो असा. कित्येकांच्यौ मतें शिशुपालवध तयार झाल्यानंतर भास्करभट्टानें तो ग्रंथ आचार्यांना दाखविला. पण ' तो भटीं निराकरिला : कां पा : माझिया विरक्तां योग्य नव्हे '. ज्याअर्थी आचार्यांनीं त्या ग्रंथाचें निराकरण केलें त्याअर्थी त्यांच्या हयातींतच तो निर्माण झाला असावा असा युक्तिवाद कोणी केल्यास त्याचें निर-

१७. सातीग्रंथांवरील टीपांतील उद्धवगीतेची मूळपीठिका.

सन करणें कांहीं विशेष कठीण नाहीं. स्मृतिस्थळ व वृद्धाचारांतील आधारांकडे लक्ष दिलें असतां वरील आक्षेप अवास्तव आहे असें दिसून येईल. कारण एक तर स्मृतिस्थळांत नागदेवाचार्यांशीं संबद्ध अशी शिशुपालवधाविषयीं एकही आख्यायिका नाहीं. जी आहे ती वृद्धाचारांत आहे. शिवाय तींतसुद्धां भटाचें ( आचार्यांचें ) नांव नसून बाइदेवबासाचें आहे. अर्थात् शिशुपालवधावरील अभिप्राय नागदेवाचार्यांचा नसून तो बाइदेवबासाचाच[१८] आहे. यावरून व या अभिप्रायाचा उल्लेख स्मृतिस्थळांत न येतां वृद्धाचारांत आलेला आहे या वस्तुस्थितीवरून प्रस्तुत काव्य आचार्यांच्या हयातींत म्हणजे ( सांप्रदायिक दृष्ट्या ) शके १२२४ पूर्वी लिहिलें गेलें नव्हतें हें अगदीं उघड होतें.

प्रस्तुत काव्यावरील उपरिनिर्दिष्ट अभिप्राय ' आचार्या ' चाच आहे असें मानण्यास उत्तरकालीन ग्रंथांत कांहीं आधार सांपडतात. नाहीं असें नाहीं. सातीग्रंथांवरील तिसऱ्या शोधनीच्या टीपांत उद्धवगीतेची पूर्वपीठिका देतांना टीपकार लिहितो ' आधा कवीश्वरबासीं वोवीबंध शीशुपाल ग्रंथ केला तो भटीं नीराकरीला ' पण हाच टीपकार पुढें लिहितो कीं ' एक म्हणति : शीशुपाळ ग्रंथ विरक्तां योग्य नव्हे : ऐसें बायदेवबासीं म्हणितलें. ' तसेंच धाराशिवओंकार बासाचा शिष्य सोंगोबास यानें लिहिलेल्या अन्वयस्थळांत देखील ' कवीश्वर-व्यासीं प्रथमारंभीं महाराष्ट्र ओवी वृत्तें रसाळत्व ओडवने शिशुपाळवध नामे ग्रंथ केला तो ' आचार्या ' दाखविला : मग तेही म्हणितले—' वगैरे असा उल्लेख आढळतो. वरील दोन्ही ग्रंथ बरेच अलीकडील असल्यामुळें सत्याच्या दृष्टीनें श्रुतिस्मृतिवृद्धाचारांतील माहिती अधिक विश्वसनीय मानली पाहिजे. या

---

१८. हा अभिप्राय बाइदेवबासाचाच असल्याबद्दल कै. भावे ( म. स. भाग १ पृ. ८६ ) श्री. य. खु. देशपांडे ( म. म. वा. पृ. १८ ) व श्री. वा. ना. देशपांडे ( वि. ज्ञा. वि. ऑक्टो. १९२८ पृ. ३९८. ) यांचे एकमत दिसतें. श्री. य. खु. देशपांडे यांनीं आपलें मत कै. भास्कर महानुभाव पुणेकरांनीं प्रसिद्ध-केलेल्या एकादशस्कंधाच्या मुद्रित प्रतीवरून बनवलेलें आहे तर श्री. वा. ना. देशपांडे यांनी महाराष्ट्र सारस्वताचा आधार घेतलेला आहे.

दृष्टीनें वृद्धाचारांतील ‘बाइदेवबासा’ चाच उल्लेख खरा मानावा लागतो. टीपकारानें भटाबरोबर बाइदेवबासाचेंही नांव दिलें आहे हें विसरतां कामा नये. आणि सोंगोबासाच्या अन्वयस्थळांतील ‘आचार्या’ चा उल्लेख तर संदिग्ध मानावयास जागा आहे. नागदेवाचार्यांच्या निधनानंतर बाइदेवबास हे कांहीं काळपर्यंत ‘आचार्य’ पदावर अधिष्ठित झाले होते ही गोष्ट लक्षांत घेतां अन्वयस्थळांतील ‘आचार्य’ बाइदेवबासच असावेत असें मला वाटतें; तात्पर्य नागदेवाचार्यांच्या हयातींत प्रस्तुत ग्रंथ लिहिला गेला नव्हता असें वरील विवेचनावरून आनुमितां येण्यासारखें आहे. त्यावरून ११९५ हा शक असंभवनीय अतएव तो प्रक्षिप्त आहे हें दिसून येईलच.

## रामबाण पुरावा.

पण शिशुपालवध शके ११९५ मधें लिहिलें गेलें नाहीं हें दाखविणारा अधिक भरभक्कम पुरावा माझ्याजवळ आहे. तो केवळ रामबाण असल्यामुळेंच आतांपर्यंत मुद्दाम मागें राखून टेविला होता. तो असा ‘‘ शके शरांकरुद्रशत रोकडे ’ या मुद्रित प्रतींतील ओवीवर शके ११९५ हा काल आधारलेला आहे. पण माझ्या दृष्टोत्पत्तीस आलेल्या शिशुपालवधाच्या कोणत्याच पोथींत वरील शककालाच्या ओवीचा निर्देश आढळत नाहीं. महानुभावीय ग्रंथसंग्रहांतून उपलब्ध झालेल्या पोथ्यांत शिशुपालवधाच्या पोथ्या अगोदरच फार कमी आढळतात. ज्या आहेत त्यांपैकीं कित्येकांचें स्वरूप परमेश्वराप्रमाणेंच अनादि व अनंत असल्यामुळें—त्यांचीं आरंभीचीं व शेवटचीं पानें फाटून कालाच्या भक्ष्यस्थानीं पडल्यामुळें शकाची ओवी त्या त्या पोथींत होती किंवा नाहीं हें सांगणें कठिण झालें आहे आणि कित्येक पोथ्यांत तर शिशुपाळवधांतील शेवटच्या ओव्यांचींच तेवढीं पानें फाटलेलीं आढळतात! पण ज्या पोथ्या चांगल्या स्थितींत असून त्यांतील शिशुपालवध काव्याच्या अंतिम ओव्या व समाप्तिलेख आज पहावयास सांपडतो त्यांत वरील ओवीचा मात्र कोठेंच मागमूस सुद्धां लागत नाहीं. माझ्या या विधानाचा पाठपुरावा करण्यासाठीं दोन पोथ्यांतील समाप्तिलेखाचे फोटो या प्रकरणासहित मुद्दामहून दिले आहेत

ते पाहावे म्हणजे वाचकांची खात्री होईल. कै. भाव्यांच्या महाराष्ट्र-सारस्वतांत व मुद्रित शिशुपालवध काव्यांत ही ओवी दिलेली आढळते यांत शंका नाहीं. पण त्यांतील शद्वरचनेंत फार फरक आढळून येतो हें मी आरंभींच दाखवून दिलेलें आहे. त्यावरून या ओवीची बरींच संस्करणें झालीं असावींत असें मानावें लागतें. कै. भाव्यांना ही ओवी कोणत्या पोथींत आढळली कांहीं सांगतां येत नाहीं. त्यांना उपलब्ध झालेल्या प्रतींत कदाचित ही शककालाची ओवी असेलही; मला मात्र ती कोठेंच आढळली नाहीं हें पुन्हा सांगणें अवश्य आहे. अर्थात् आज उपलब्ध झालेल्या हस्तलिखितांमधें ज्याअर्थीं ही ओवी सांपडत नाहीं त्याअर्थीं ती प्रक्षिप्त असावी असे मानण्याकडे माझ्या मनाचा कल झुकतो. कै. भाव्यांची प्रत मूळ स्वरूपांत उपलब्ध होऊन तिचा समाप्तिलेख वाचावयास सांपडेपर्यंत तरी माझें मत प्रमाणभूत मानावयास कांहीं हरकत दिसत नाहीं. पुढें हें मत बदलावें लागलें तर त्यांत मला आनंदच वाटेल. पण असा सुदिन[१९] उगवेपर्यंत तरी शिशुपालवध काव्य शके ११९५ मधें लिहिलें गेलें असें मानावयास कांहींच आधार नाहीं; हें निश्चित समजणें भाग आहे.

## कालनिर्णय.

आतांपर्यंत पुढें मांडलेल्या पुराव्यांवरून प्रस्तुत काव्य ११९५ मधें लिहिलें गेलें नाहीं ही गोष्ट वाचकांच्या ध्यानांत आलीच असेल. मग, तें

---

१९. पण हा सुदिन उगवणें शक्य नाहीं असें मला वाटतें. कारण कै. भाव्यांनी छापलेल्या आवृत्तीची मुद्रणप्रत मूळावरून त्यांनी स्वत: नकलेली नसून इतर कोणीतरी ती त्यांना नकलून दिली होती असें समजतें. या नकलकारानेंच ही ओवी ‘ बनवून ’ ‘ दडपली ’ असेल असें मला शंभर टक्क्यांनी वाटतें. पुस्तक छापतांना भावे हयात असते व त्यांनीं मुद्रणप्रत मूळ पोथीशीं ताडून पाहिली असती तर वरील प्रकार त्यांच्या खात्रीनें लक्षांत आला असता; पण दुदैवानें तसें होऊं शकलें नाहीं व म्हणूनच ही दडपश्रमे आतांपर्यंत राजरोस वावरूं शकली ! असो.

कोणत्या सालीं लिहिलें गेलें? तो काल ठरविण्यास कांहीं निश्चित पुरावा आपल्या जवळ आहे काय ? असे प्रश्न सहजच उद्भवतात. त्याचीं यथाशक्ति उत्तरें देऊन शिशुपालवधाचा निश्चित काल उपलब्ध पुराव्यांवरून आपणांस ठरवितां येतो कीं नाहीं याचा आतां थोडक्यांत विचार करूं.

शिशुपालवधाच्या लेखनाचा उल्लेख स्मृतींत नसून वृद्धाचारांत आहे ही गोष्ट आपण मागें पाहिलीच. " बाइदेवबासीं ' शिशुपाळवध ' नीराकरणीं कवीस्वरीं ' एकादसु ' करणें " ही आख्यायिकीं ज्या अर्थी वृद्धाचारांत आहे त्या अर्थी शिशुपाळग्रंथ नागदेवाच्या मृत्युनंतर लिहिला गेला असावा ही गोष्ट स्पष्ट होय. आचार्यांचा निधनकाल शके १२२४ भाद्रपद वद्य ११ असल्याचा सांप्रदायिक उल्लेख स्मृतींत आढळतो. माझ्या मतें हा काळ आणखी चार वर्षांनीं पुढें ढकलला पाहिजे. तात्पर्य शिशुपालवधाच्या कालनिर्णयाची एक स्पष्ट मर्यादा शके १२२४ ( सांप्रदायिक ); किंवा शके १२२८ ( ऐतिहासिक दृष्ट्या ) ही होय. काव्यावर अभिप्राय बाइदेवबासांचा असल्याकारणानें त्यांच्या मृत्यूपूर्वी तें लिहिलें गेलें असावें. अर्थात् बाइदेवबासाच्या मृत्यूचा शक ही कालनिर्णयाची दुसरी स्पष्ट मर्यादा होय. ह्या दोन मर्यादांत केव्हांतरी शिशुपालवध निर्माण झालें असावें हें निश्चित. बाइदेवबासाच्या मृत्यूचा सांप्रदायिक शक १२२७ तर ऐतिहासिक दृष्ट्या १२३१ येत असल्याचें मागें नमूद[२१] केलेंच आहे. त्यावरून सांप्रदायिकदृष्ट्या शके १२२४ ते १२२७ च्या आंत, तर ऐतिहासिकदृष्ट्या शके १२२८ ते १२३१ च्या आंत केव्हांतरी शिशुपालवधाचें लेखन झालें असावें असें दिसतें. शिशुपालवध लिहिल्यानंतर उद्धवगीता समाप्तीच्या प्रसंगींसुद्धां बाइदेवबास हयातच होते. उद्धवगीता रचावयास साधारणतः एक वर्ष व तदनंतरची बाइदेवबासाची थोडीथोडकी हयात ( पांच सहा महिन्यांची ) सोडल्यास शके १२३० च्या सुमारास शिशुपालवध लिहून झालें असावें असें मला वाटतें. आज उपलब्ध झालेल्या पुराव्यांवरून तरी

२०. वृद्धाचार ९. ( प्रस्तुत पुस्तकांतील ५३ वें पृष्ठ पहा. )

२१. याच पुस्तकाचें प्र. २ रें पृष्ठ ४१. बाइदेवबासाचें चरित्र पहा.

शके ११९५ हा काळ खोटा ठरून १२३० हाच काल स्थूल मानानें प्रमाण मानावा लागतो.

## उद्धवगीतेचा काल.

शिशुपालवधाचा काल एकदां निश्चित केल्यावर उद्धवगीता ऊर्फ एकादशस्कंध या काव्याचा लेखनशक ठरविणें कांहीं विशेष कठीण नाहीं. आपलें शिशुपालवध ' प्रवृत्तांजोगें ' झालें असा बाइदेवबासाचा अभिप्राय पडल्यामुळें त्यानंतर भास्करभट्टानें निवृत्त मुनिजनांना उपयोगी पडेल असें उद्धवगीता काव्य लिहिलें. आणि या नवीन रचलेल्या ग्रंथानें मात्र बाइदेवबासास फार आनंद झाला अशा आशयाची आख्यायिका वृद्धाचारांत[२२] असल्याचें मागें नमूद केलेंच आहे. यावरून शिशुपालवधानंतर पण बाइदेवबासाच्या मृत्यूपूर्वी उद्धवगीता तयार झाली असावी हें स्पष्ट दिसतें. शिशुपाळवध-निर्मितीचा काल स्थूलमानानें शके १२३० असल्याचें आपण नुकतेंच ठरविलें. बाइदेवाचा मृत्युकाल १२३१ आहे. म्हणून शके १२३० च्या शेवटीं शेवटीं व १२३१च्या आरंभीं आरंभीं उद्धवगीतेचें लेखन झालें असावें असें मला वाटतें. म्हणजे सामान्यतः शके १२३१ चा प्रारंभ हाच उद्धवगीतेचा लेखनकाल मानावयास हरकत नाहीं. माझ्या या मताचें समर्थन शिशुपालवधाच्या कालनिर्णयावरील विवेचनांत पर्यायानें आलेलें असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. पण उद्धवगीतेच्या लेखनशकाविषयीं इतर विद्वानांचीं प्रचलित असलेलीं मतें कशीं चुकीचीं आहेत हें दाखवून देणें अत्यवश्य असल्यामुळें तिकडेच वळतों.

शिशुपालवधाप्रमाणें या काव्याच्या शेवटीं कालनिदर्शक ओवी नसल्यामुळें सांप्रदायिक शकाचा प्रश्नच जवळजवळ या ठिकाणीं उद्भवत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. तथापि प्रत्यक्ष नसली तरी अप्रत्यक्ष रीतीनें मात्र सांप्रदायिक शकाची पताका उभी राहिलेली आढळते. कशी ती लवकरच दिसेल. कै. भावे यांनीं या ग्रंथाचा शक ' ११९७।९८ असावा[२३] ' असें म्हटलें आहे

२२. वृद्धाचार ९. (प्रस्तुत पुस्तकांतील ५३ वें पृष्ठ पहा.)

२३. म. सा. भाग १. पृष्ठ. ९२.

तर रा. य. खु. देशपांडे, तो ग्रंथ ११९६ मधें पूर्ण झाल्याचें सांगतात[२४]. 'एकादशस्कंधा'च्या प्रथम मुद्रित प्रतीचे संपादक कै. भास्करबुवा महानुभाव पुणेकर यांनींही शके ११९६ चाच उल्लेख केलेला आहे[२५]–आणि त्यांच्या प्रतीवरूनच रा. आप्पासाहेब देशपांडे यांनीं आपला ११९६ शक उचलला असावा असें वाटतें. वरील तिन्ही ग्रंथकारांनीं आपल्या विधानांचे आधार स्वतंत्रपणें नमूद केलेले नसल्यामुळें त्यांनीं दिलेले शक एका अर्थानें 'निराधार' आहेत असें म्हणतां येतें. श्री. वामन नारायण देशपांडे यांनीं प्रस्तुत काव्याचा आरंभ 'शके ११९७ युवा नाम संवच्छरे कार्तिक शुद्ध पौर्णिमे'स झाल्याचें नमूद केलें आहे[२६]. त्यांचें म्हणणें थोडक्यांत येणेंप्रमाणें. आपल्यावर तोतयेगिरीचा आरोप करणाऱ्या विनायक दीक्षिताचा भास्करभट्टानें, राघवभट्टाच्या साह्यानें वादांत पराजय केल्यावर "समस्त ब्रह्मवृंदीं तथा सभामहाजनीं तथा पुरजनीं प्रसन्नतेया देवापुरस्थित मुख्य क्षेत्रराज श्रीदत्तात्रेयचरणांकित देवदेवेश्वरादि अष्टादशतीर्थस्थानाधिकारु यावश्चंद्रदिवाकरौ कवीश्वर भानुभट्ट भणिजे भास्करपंडित शिष्यवंशस्था लिखितेंनसी प्रमाणपत्र प्रतिज्ञेनसीं शके ११९७ युवानामसंवत्सरे कार्तीक शुद्ध पौर्णिमें सन्मानौनि दीन्हला असे' या दिवसाच्या स्मृतिनिमित्त भास्करभट्टानें अत्यंत आनंदानें "तैचि दीं 'उद्धवगीता' श्रीमद्भागवत एकादशस्कंद–कथा प्रधानत्वें कवित्व आरंभिलें' रा. य. खु. देशपांडे यांनींही उद्धवगीता......शके ११९६ मध्यें रचिल्याचें लिहिलें आहे. परंतु वरील सांप्रदायिक शक खरा असल्यास हा रचनाकाल आणखी एक वर्ष पुढें ढकलावा लागतो." वरील उताऱ्यावरून रा. वा. ना. देशपांडे यांनीं आपलें स्वतःचें निश्चित मत मुळींच दिलेलें नाहीं हें सूक्ष्म वाचनांतीं दिसून येईल. 'वरील सांप्रदायिक शक खरा असल्यास'— हें एक अत्यंत सावधगिरीचें वाक्य घालून शके ११९७ हा काल त्यांनीं सूचित केला आहे.

---

२४. म. म. वा. पृ. १८.

२५. मुद्रित आवृत्तीचें मुखपृष्ठ.

२६. वि. ज्ञा. वि. ऑक्टो १९२८. पृ. ३९७.

त्यांनीं नमूद केलेली आख्यायिका व सांप्रदायिक शक खरा आहे कीं नाहीं तें आपण थोडक्यांत पाहणें अवश्य आहे.

रा. वामनराव देशपांडे यांनीं जैतपत्रासंबंधीं उध्दृत केलेली आख्यायिका कोणत्या ग्रंथांतून घेतलेली आहे हें नमूद केलें नाहीं. आपल्या लेखाच्या आरंभीं ' भास्करभट्ट कवीश्वराच्या चरित्रपर माहितीचे कण श्रीनागदेवाचार्य-चरित्र, वृद्धाचार, कवीश्वर–वंश–वर्णन, कवीश्वर–जामोदेकर–वंश वर्णन वगैरे प्राचीन व दुर्मिळ ग्रंथांत विखुरले आहेत ' असें त्यांनीं म्हटलें आहे. अर्थात् वरील पैकीं कोणत्यातरी ग्रंथांतील हा उतारा असावा.त्यांतही पहिले दोनच ग्रंथ गद्य असल्यामुळें राहिलेल्या ग्रंथांतील हा उतारा असणें शक्य नाहीं.राहतां राहिले नागदेवाचार्यचरित्र व वृद्धाचार हे ग्रंथ. उताऱ्यांत नमूद केलेला प्रसंग ज्या-अर्थीं शके ११९७ चा आहे त्याअर्थीं तो नागदेवाचार्यचरित्रांतील असणें अधिक संभवनीय आहे. निदान तेथें तो असावयास पाहिजे. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं मला मिळालेल्या वरील ग्रंथांच्या पोथ्यांत हा उतारा बिलकूल सांपडत नाहीं. जैतपत्राच्या वृत्तांताची आख्यायिका वृद्धाचारांत मात्र सांपडते. पण त्या आख्यायिकेंत व रा. देशपांडे यांनीं नमूद केलेल्या आख्यायिकेंत[२७] बराच फरक आहे. श्री. देशपांडे यांच्या कथेंत भास्करभट्टाचा पूर्ववृत्तांत अत्यंत सविस्तर ग्रथित केलेला दिसतो तर वृद्धाचारांतील कथेंत त्या वृत्तांताचा मागमूसही नाहीं. कांहींही असलें तरी प्रस्तुत प्रसंग श्रीनागदेवाचार्यचरित्रांत मुळींच आढळत नसल्यामुळें तो शके १२२४ पूर्वी झाला असणें संभवनीय नाहीं. कारण आचार्यांच्या हयातींत घडून आलेले प्रसंग नागदेवाचार्यचरित्रांत व त्याच्या मृत्यूपासून तों परशरामबासाच्या अंतापर्यंतचे प्रसंग वृद्धाचारांत आलेले आहेत या गोष्टीची वाचकांस येथें पुन्हा आठवण करून देणें अवश्य वाटतें. अर्थात जैतपत्राचा वृत्तांत स्मृतींत नसल्यामुळें पर्यायानें उद्धवगीतेचा लेखनारंभही शके १२२४ पूर्वी होणें शक्य दिसत नाहीं. म्हणजे ११९७ हा शक चुकीचा ठरतो.

---

२७. ही आख्यायिका बनावट असल्यासंबंधीचें विवेचन याच पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणांत पहावें. ( पृष्ठें ७ ते ९ )

पण याहून मुद्याचा व महत्त्वाचा पुरावा असा कीं वृद्धाचारांतील आख्यायिकेंत देखील या शकाचा कुठेंच पत्ता लागत नाहीं. प्रस्तुत आख्यायिका मागें चरित्राच्या प्रकरणांत उध्दृत केलेली आहे. ती वाचकांनीं पुन्हा पहावी. मी पाहिलेल्या वृद्धाचाराच्या अनेक पोथ्यांत ही आख्यायिका त्या उताऱ्याप्रमाणेंच लिहिलेली आढळते. त्यावरून तींत

( १ ) जैतपत्राचा काळ मुळींच दिलेला नाहीं.

( २ ) जैतपत्र मिळालें त्याच दिवशीं उद्धवगीतेला आरंभ केला असेंही नमूद केलेलें नाहीं

( ३ ) भास्करभट्टाचा पूर्ववृत्तांतही मुळींच उल्लेखिलेला नाहीं

ह्या गोष्टी सहज नजरेस येतात. अर्थात रा. वा. ना. देशपांडे यांनीं दिलेला शककाल स्मृतींत व वृद्धाचारांत कोठेंच नसल्यामुळें तो प्रक्षिप्त असावा असें वाटतें. चौकशीअंतीं असें समजतें कीं रा. देशपांडे यांना तो उतारा कोणीतरी नकलून ( ? ) पाठविला होता. आणि शिशुपालवधाची नक्कल करतांना जसा शके ११९५ शक लेखनकाल म्हणून नकलकारानें दडपला तसाच येथेंही शकसंवत्सराचा भाग दडपून दिला असावा. मी पाहिलेल्या वृद्धाचाराच्या कोणत्याच पोथींत ह्या जैतपत्राचा काल लिहिलेला नसल्यामुळें रा. देशपांडे यांना मिळालेल्या उताऱ्यांतील शक प्रक्षिप्त आहे असेंच मानणें भाग पडतें.

अर्थात् रा. वामनराव देशपांडे लिहितात त्याप्रमाणें शके ११९७ मध्यें देखील या ग्रंथाच्या लेखनाला आरंभ झाला नाहीं. आतां ज्याअर्थी जैतपत्राचा वृत्तांत वृद्धाचारांत आहे व स्मृतींत नाहीं त्याअर्थी शके १२२४ नंतरच उद्धवगीता लिहिली जाणेंच अधिक संभवनीय आहे. आणि बाइदेवबासानें उद्धवगीतेवर आपल्या पसंतीचें शिक्कामोर्तब केलें असल्यामुळें त्याच्या मृत्यूपूर्वीच ती पूर्णसुद्धां झाली असली पाहिजे. यावरून मी पहिल्या परिच्छेदांत लिहिल्याप्रमाणें हा ग्रंथ शिशुपाळवधानंतर व बाइदेवबासाच्या मृत्युपूर्वी, म्हणजे सुमारें शके १२३१ मध्येंच लिहिला गेला असावा असें मानणेंच सयुक्तिक ठरतें.

---

१

## काव्याला आधारभूत ग्रंथ.

मागील चार प्रकरणांमध्ये अनुक्रमें, आपल्या कवीचें चरित्र, गुरुशिष्य-मित्रमंडळ, ग्रंथकर्तृत्व व त्याच्या ग्रंथांचा कालनिर्णय या विषयांविषयीं विशेष विस्तारानें विवेचन केलें. यापुढें आतां त्याच्या काव्यांचें विवेचन करावयाचें आहे. कालानुक्रमाच्या दृष्टीनें शिशुपाळवध अगोदर लिहिलें गेलें असल्यामुळें प्रथम याच काव्याचें पर्यालोचन प्रस्तुत प्रकरणांत करणें इष्ट होईल. हें समालोचन करतांना कै. भावे यांनीं संपादलेली शिशुपालवधाची आवृत्ति जरी समोर ठेवलेली असली तरी ओव्यांचीं अवतरणें देतांना मात्र मी एका प्राचीन हस्तलिखिताचा उपयोग केलेला आहे. त्यावरून किंचिदंशानें कां होईना पण या काव्याच्या भाषेचें खरें स्वरूप अभ्यासकांच्या नजरेस येऊं शकेल असें वाटतें. अनेक हस्तलिखितें तपासून शिशुपालवधाची अधिकृत संहिता कधीं तयार होईल ती होवो. पण तोंपर्यंत तरी कै. भाव्यांच्याच आवृत्तीचा उपयोग केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. त्यांतल्या त्यांत शक्य तेथें मूळ हस्तलिखितांतील पाठ पुढील प्रबंधांत देण्याचा प्रयत्न केला आहे येवढेंच. त्याच्या साह्यानें, मुद्रित प्रतींतील कांहीं ओव्यांचें ‘ शुद्धीकरण ’ अभ्यासकांनीं करावयास कांहीं हरकत नाहीं. असो.

शिशुपालवध हें नांव कानांवर पडतांच आपली स्मरणशक्ति जागृत होऊन संस्कृत पंचमहाकाव्यांत मोडलें जाणारें माघाचें शिशुपालवध तात्काळ आपल्या मनश्चक्षूंसमोर उभें राहतें; व ओघानेंच माघाच्या शिशुपालवधाचा भास्कराच्या शिशुपालवधाशीं कांहीं संबंध असेल का ? असा प्रश्न दत्त म्हणून उपस्थित होतो. अर्थात्, काव्याच्या अगदीं प्रारंभाला केवळ नामसादृश्यानें कार्यकारणभाव किंवा बिंबप्रतिबिंबत्व सूचित करणारी आपल्या प्राकृत कवीची ही कलाकृति स्वतंत्र आहे कीं संस्कृत काव्याची छाया आहे, हें पाहणें अत्यंत

आवश्यक होय. कारण त्यामुळें प्रस्तुत काव्याचें गुणदोषविवेचन करतांना टीकाकारानें कोणती दृष्टि आपणासमोर ठेवावी हें त्यांस नक्की ठरवितां येईल. स्वतंत्र कवि म्हणून भास्करभट्टाकडे नजर फेंकावयाची, कीं भाषान्तर वा रूपान्तरकार म्हणून त्याच्या मालाचें मोजमाप घ्यावयाचें हें निश्चितपणें ठरविल्याशिवाय इतर विवेचन करणें म्हणजे एकाच मापानें सर्व पदार्थ मोजणाऱ्या वाण्यासारखें अनुचित होईल आणि म्हणूनच प्रस्तुत काव्यकथेचें मूळ प्रथम शोधणें अवश्य आहे.

## माघ व भास्करभट्ट.

या दृष्टीनें माघाचें शिशुपालवध व भास्करभट्टाचें शिशुपालवध या दोन्ही काव्यांचा अभ्यास केला तर अगदीं आरंभाला तेवढी पहिल्या कृतीची पडछाया दुसरींत पडलेली दिसून येईल. अग्रपूजेच्या वेळीं श्रीकृष्णाचा अपमान करून आपल्या शंभर पातकांचा घडा कांठोकांठ भरणाऱ्या शिशुपालाचा, आतेला दिलेल्या वचनांतून मुक्त झालेल्या यदुवीरानें शिरच्छेद केला, ही साधी पौराणिक कथा अनेक कवींनीं आपल्या रसभरित वाणीनें निरनिराळ्या प्रकारांनीं वर्णन केली आहे. त्यांत, उपमा अर्थगौरव व पदलालित्य या त्रिगुणांनीं संपन्न असलेलें, कविश्रेष्ठ माघाचें शिशुपालवध हें महाकाव्य अत्यंत प्रसिद्ध आहे. पुराणांत वर्णन केलेली कथा सरळ रूपानेंच पुन्हा वर्णन करण्यांत कांहीं नावीन्य नव्हतें. म्हणून माघानें त्या साध्या कथेला ललितस्वरूप देऊन महाकाव्याच्या साच्यांत अत्यंत मनोहर रीतीनें बसविलें. प्रस्तुत लेखांत विवेचनास घेतलेली भास्करभट्टाची शिशुपालवधकथा देखील मूळ कथेप्रमाणें सरळ व साध्या रीतीनें वर्णन केलेली नाहीं. तर तिला अभिजात काव्याचें स्वरूप देऊन—रेशमापेक्षांही मृदु व गोगलगाईपेक्षांही मऊ अशा शद्बांनीं रेखाटलेली तिची मनोहर मूर्ति निरनिराळ्या प्रसंगानीं व नानाविध अलंकारांनीं नटवून, काव्योद्यानांत विहार करणाऱ्या रसिकांसमोर आपल्या प्राकृत कवीनें उभी केली आहे.) वरील दोन्ही काव्यांचा तुलनात्मक अभ्यास केल्यास भास्करभट्टानें आपल्या काव्यकन्येची वेषभूषा माघाच्या लाडक्या लेकीच्या नेपथ्यरचनेकडे पाहत पाहतच केली आहे हें तेव्हांच लक्षांत येतें. काव्याच्या शेवटीं असलेल्या 'भारतीकथा संपूर्णमगमत्'

या उल्लेखावरून प्रस्तुत कथा केवळ भारतांतर्गत गोष्टीच्या आधारानेच लिहिलेली असावी असें वाटण्याचा संभव आहे; व तो चुकीचा आहे असें नाहीं. कारण शिशुपालवधाची मूळ कथा ही भारतांत व त्याचाच एक भाग म्हणून प्रसिद्ध असलेल्या हरिवंशांत, त्याचप्रमाणें भागवतांतही आलेली आहे.

नाना पुरतिये प्रतिष्ठेलागि । सानीव धरूनि आंगीं
पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥
म्हणौनि भारतीं नाहीं । तें नव्हेचि लोकीं तिहीं
एणें कारणें म्हणिपे पाही । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ १–४७ ॥

या ज्ञानेश्वरमहाराजांच्या म्हणण्याप्रमाणें माघाचें शिशुपालवध काय किंवा भास्कराचें शिशुपालवध काय, हीं दोन्हीं काव्यें व्यासोच्छिष्टच असून त्यांचें कथानक महाभारतांतून घेतलेलें आहे असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. याच दृष्टीनें भास्करभट्टानें आपल्या कथेला भारतीकथा असें जें म्हटलें आहे तें खरें आहे. पण आपल्या काव्याला त्यानें जें स्वरूप दिलें आहे तें देण्याची स्फूर्ति त्याला माघाच्या शिशुपालवधावरूनच झाली यांत मात्र शंका नाहीं. कारण काव्याच्या प्रस्तावनेंत, अगदीं आरंभालाच

देखौनि **महा-कवीचा** पंथू : मज होतसे मनोरथू :
वाणावेयां यादव–नाथू : श्रीकृष्ण राओ ( ८ )

असें भास्करभट्टानें स्पष्टच म्हटलें आहे. यादवनाथाचें वर्णन करणारा महाकवि माघाशिवाय दुसरा कोणीच नाहीं. कारण महाकवि हें विशेषण संस्कृत साहित्यांत रूढार्थानें फक्त पंचमहाकाव्यांच्या कर्त्यांनाच लावलेलें आढळून येतें. या पंचमहाकाव्यांत श्रीकृष्णाचें वर्णन–पण केवळ वर्णनच नव्हे तर काव्यनायकत्वाचा मान–फक्त माघाच्या शिशुपालवधांतच आहे. अर्थात वरील ओवींत भास्करभट्टानें उल्लेखिलेला महाकवि माघाशिवाय दुसरा असणें शक्य नाहीं, असें वाटतें. यावरून आपली शिशुपालवधकथा लिहिण्याची स्फूर्ति भास्करभट्टाला माघापासूनच झाली असावी हें सिद्ध होतें. शिवाय माघाच्या आणि भास्करभट्टाच्या काव्यांतील कथेचें स्वरूप, तिला मिळालेल्या निरनिराळ्या मोडण्या, वर्णनें, प्रसंग इत्यादि इतके समसमान आहेत कीं, ते पाहिले म्हणजे

भास्करभट्टानें आपली कथा माघाच्या काव्यावरच आधारलेली आहे यांत तिळ-प्रायही शंका राहात नाहीं. विशेषतः दोन्ही काव्यांच्या जवळ जवळ प्रारंभींच असणारे नारदागमन, द्वारकावर्णन, ऋतुवर्णन, जलक्रीडाकथन व शेवटीं आलेलें युद्धवर्णन हे प्रसंग वाचकांनीं अवश्य ताडून पाहावे.

पण प्रसंग, मोडणी, वर्णनें इत्यादि प्रकारांशिवाय भास्करभट्टाचें शिशु-पालवध हें माघाच्या काव्यावरच कसें आधारलेलें आहे हें दाखविण्यासाठीं दोन्ही काव्यांतील समसमान वचनांचा भरभक्कम पुरावा आपणांस दाखवितां येण्यासारखा आहे. नारदाभिगमनप्रसंगीं दोन्ही काव्यांतील नारदाचीं वर्णनें ताडून पाहतां तीं अगदीं बिंबप्रतिबिंबरूप जरी दिसत नाहींत, तरी माघाच्या काव्याची छाया भास्करभट्टाच्या कथेवर किंचित् पडते न पडते तोंच पुढें ती लुप्तप्राय झालेली मात्र आढळून येईल. नारदमुनीनें श्रीकृष्णापाशीं शिशुपाळाचें जें पूर्ववृत्त कथन केलें आहे त्यांत शिशुपाळ हाच पूर्वीं हिरण्यकशिपु होता व नंतर

स रावणो नाम निकामभीषणं बभूव रक्षः क्षतरक्षणं दिवः ।। १।४८

तोच रावण नांवाच्या सुप्रसिद्ध राक्षसरूपानें जन्माला आला, हा माघानें वर्णि-लेला प्रसंग भास्करभट्टानेंही

तरि तेआंचा करावा प्रति-पाळुः मारावा दैत्य शिशु-पाळु
जो रावणरूपें होतां काळु : मागिला युगीं ( १५९ )

या शद्बांत वर्णिलेला आहे. या राक्षसराज रावणानें तिन्ही लोकांत मांडलेल्या धुमाकुळाच्या वर्णनांत माघानें उल्लेखिलेला

समुत्क्षिपन्यः पृथिवीभृतां वरम् ।। १।५०

हा कैलासोत्क्षेपणाचा वृत्तांत

जेणें कैलास दुर्गा पाडिलें : सत्यलोकीं ठाणें घातलें

या शद्बांत, व ‘ पुरीमवस्कन्द ’ ( १।५२ ) यांतील अमरावतीवरील स्वारीचें वर्णन

वायो वरुणाचीं गह्वानें मोडिलीं : अमरावतिअें धाडी घातली ( १६१ )

या ओवींत भास्करभट्टानें केलेलें आढळून येईल. वरील प्रकारें सर्वत्र हाहाकार माजविणारा रावणच आतां

अथोपपत्तिं छलनापरोऽपरामवाप्य शैलूष इवेष भूमिकाम् ।

तिरोहितात्मा शिशुपालसंज्ञया प्रतीयते संप्रति सोऽप्यसः परैः ॥ १।६९

शिशुपाळाच्या वेषानें जन्मल्याचा माघानें सांगितलेला हाच वृत्तान्त भास्करभट्टानेंही

आराधितां अनेकी परी : जो तिहीं लोकां विचंबित मारी

तो आतां दमघोषाचां घरीं : उपनलासे ( १६३ )

असा वर्णिलेला आहे. यावरून शिशुपालाच्या पूर्ववृत्तकथनाचा हा प्रसंग भास्करभट्टानें माघकाव्यावरूनच घेतला असावा हें तेव्हांच दिसून येतें.

पण या वर वर्णिलेल्या प्रसंगापेक्षां, कृष्ण, बलराम उद्धवादि यादवांचें खलबत ज्यांत वर्णिलेलें आहे तो प्रसंग अधिक ताडून पाहण्यासारखा आहे. सुधर्मासभेंत आपल्या परिवारासह यादवेंद्र श्रीकृष्ण बसला असतांना कलहप्रिय नारदमुनीनें तेथें येऊन शिशुपाळानें चालविलेल्या हाहाकाराचें वर्णन केलें व त्याचा निःपात करण्याविषयीं, दुष्टांना दंड देण्यासाठीं अवतरलेल्या भगवान् वासुदेवाला विनंती केली. पण नारदमुनि निघून गेल्यानंतर लगेच धर्मराजाकडून राजसूयज्ञासाठीं तत्काळ येण्याबद्दल श्रीकृष्णाला आग्रहाचें निमंत्रण आलें. दुष्ट संहारक व भक्तवत्सल प्रभूला या दोन्हीपैकीं प्रथम कोणतें कार्य हातीं घ्यावें हा मोठा प्रश्न पडला. प्रेमळ भक्ताच्या विनंतीला मान देऊन राजसूययागासाठीं हस्तिनापुरास जावें तर इकडे शिशुपाळाचा नंगा नाच सुरू राहतो; बरें, अगोदर शिशुपालवधाचें कार्य हातीं घ्यावें तर एकनिष्ठ भक्ताचें मन मोडण्याचा प्रसंग येतो. एकूण एकीकडे आड तर दुसरीकडे विहीर. या प्रसंगीं काय करावें व काय करूं नये याबद्दल इतरांचा विचार घेण्याच्या हेतूनें

मग देवो म्हणे बलिभद्रातें : दोनि कार्यें प्रस्तुतें

कवण कीजें तें निरुतें : सांगा तुम्हीं ( ४६६ )

असा श्रीकृष्णानें प्रश्न टाकला. याला उत्तर म्हणून बळराम, उद्धवादिकांची तेथें जी चर्चा झाली ती, माघ व भास्करभट्ट या दोन्ही कवींनीं फार बहारीनें वर्णन केलेली आहे. त्यांत माघानें जें मत अगदीं आरंभींच श्रीकृष्णाच्या तोंडीं घालून बळरामदादाकडून अधिक स्पष्ट केलें आहे तेंच भास्करभट्टानें प्रथम

बळिभद्राकडून वदवून त्याला श्रीकृष्णाची संमति मिळवून दिली, हा फरक लक्षांत ठेवून खालीं उध्दृत केलेले माघकाव्यांतर्गत श्लोक व भास्करभट्टाच्या ओव्या यांकडे तुलनात्मक दृष्टीनें वाचकांनीं लक्ष द्यावें.

( १ ) उत्तिष्ठमानस्तु परो नोपेक्ष्यः पथ्यमिच्छता ।
समौ हि शिष्टैराम्नातौ वर्त्स्यन्तावामयः स च ॥ —माघ २-१०
व्याधी आणि वैरी : इयें कोंवळीं जवंची वेऱ्ही
तंव तोडावीं सर्व प्रकारीं : जाणतेनी ( ४६९ )

( २ ) ध्रियते यावदेकोऽपि रिपुस्तावत्कुतः सुखम् ।
पुरः क्लिश्नाति सोमं हि सैंहिकेयोऽसुरद्रुहाम् ॥ —माघ २-३५.
वैरी सरिसा जीए : तरि निद्रा कैसेनि ए
लांबतिए सुरिए : केवि लाजिजे नु ( ४७० )

( ३ ) पादाहतं यदुत्थाय मूर्धानमधिरोहति ।
स्वस्थादेवापमानेऽपि देहिनस्तद्वरं रजः ॥ —माघ २-४६
पाए धूळि रगडे : तरि सळें माथेआं चढे
तेया ही वैर साधु न घडे : अचेतनासी ( ४७२ )

वर उल्लेखिलेल्या दोन प्रमुख प्रसंगांव्यतिरिक्त खालील त्रुटित कल्पनासाम्य देखील ताडून पाहण्यासारखें आहे. माघानें केलेले द्वारका-नगरीच्या वर्णनांतील श्लोक व भास्करभट्टाच्या त्यावरील ओव्या प्रथम पहा.

( ४ ) मध्येसमुद्रं ककुभः पिशङ्गीर्या कुर्वती काञ्चनवप्रभासा ।
तुरंगकान्तामुखहव्यवाहज्वालेव भित्वा जलमुल्ललास ॥-माघ३-३३.
कीं लाटाचेनि पैले : वडवानळाचें तेजु हेलावलें
कीं वैकुंठ प्रतिबिंबलें : समुद्रामाजी ( २४१ )

( ५ ) त्वष्टुः सदाभ्यासगृहीतशिल्पविज्ञानसंपत्प्रसरस्य सीमा ।-माघ३-३५
तें जेवी विश्वकर्मेयां आराधितां :
शिल्पविद्येची अधिष्ठात्री देवता ।
प्रत्यक्षु जाली वेळु न लागतां :
भूमण्डळीं ( २३७ )

पूर्वी सैन्याबरोबर बायकाही असत. इतकेंच नव्हे तर सैन्यामधील कांहीं चावट लोक त्यांची

( ६ ) पन्थानमाशु विजहीहि पुरः स्तनौ ते पश्यन्प्रतिद्विरदकुम्भविशंकिचेताः ।
स्तम्बेरमः परिणिनंसुरसावुपैति षिङ्गैरगद्यत ससंभ्रममेव काचित् ॥
—माघ ५।३४

अशा प्रकारची थट्टाही करीत. भास्करभट्टानेंही अगदीं हाच जरी नाहीं तरी याच धाटणीचा प्रसंग आपल्या सैन्यवर्णनांत खालीलप्रमाणें आणला आहे.

तवं हडपिनी वारिकी दुवाळिलीं : तिऔं पुढिलां वारिआं बुजालीं
चांपे-गोरटी आंगें उघडीं ठेली : पुन पडतीचि ना ( ५५८ )
श्रृंगारें जांभै दीन्हली : ना तरि मदनें बुंथी फेडिली
तेवीं वरौतीं पाखीं उचलिलीं : चोळियांचीं ( ५५९ )
तेह वेळीं कुचपर्वताचां घाटीं : ओळगतां डोळे जाले आयेतुटी
राऊनें जाले हिंपुटीं : वारू थापटती ना ( ५६० )
तवं दळवै कोपीनिलें : चाला गा राउते हो म्हणितलें
राउळ जवळिकें पातलें : मागिली भारीं ( ५६१ )

दोन्ही काव्यांतून आतांपर्यंत दिलेलीं उदाहरणें बस झालींत. वरील सर्व पुराव्यावरून भास्करभट्टानें आपलें काव्य लिहिण्यापूर्वी माघाच्या शिशुपाल-वधाचा कसून अभ्यास केला होता इतकेंच नव्हे, तर तेंच काव्य समोर ठेवून, त्यांतील प्रसंगाप्रमाणेंच आपल्या कथेसही मोडणी देऊन त्यानें प्रस्तुत काव्य रचलें, हें वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल. दोन्ही काव्यांचा अधिक सूक्ष्मपणें अभ्यास केल्यास समानार्थक व समकल्पनायुक्त श्लोकांचा व ओव्यांचा आणखीही भरभक्कम पुरावा दाखवून देतां येईल. पण भास्करभट्टानें आपलें काव्य लिहितांना माघाच्या पावलावर पाऊल टाकलें आहे, एवढें ध्यानांत येण्यास दिलीं इतकीं उदाहरणें पुरे होतील असें वाटतें.

## भास्करभट्टाचें स्वतंत्र ग्रंथकर्तृत्व

भास्करभट्टाची शिशुपालवधकथा माघाच्या महाकाव्यावरून प्रस्फूर्त

झालेली कृति आहे हें आतां वाचकांच्या चांगलेंच लक्षांत आलें असेल. पण यावरून भास्करभट्टाचें काव्य म्हणजे माघकाव्याची नुसती प्रतिकृति आहे, तींत स्वतंत्रता मुळींच नाहीं असा आपला गैरसमज मात्र कोणीही करून घेऊं नये. काव्यांतर्गत वरवरच्या प्रसंगांची रूपरेषा जरी भास्करानें माघकाव्यावरून आंखली असली तरी तींत निरनिराळे मनमोहक रंग भरतांना त्यानें अनेक ठिकाणीं स्वतंत्र बुद्धि खर्च केलेली आहे. माघाच्या शिशुपालवध महाकाव्याचा आराखाडा तेवढा त्यानें आपल्या डोळ्यांसमोर ठेवला. बाकी सर्व प्रसंग स्वतःच्या अनुपमेय कलाकुशलतेनें व स्वतंत्र प्रतिभाशक्तीनें रंगविलेले आहेत हें दोन्ही काव्यांच्या सूक्ष्म निरीक्षणानें तेव्हांच दिसून येईल. प्रसंगांच्याच नव्हे तर कल्पनांच्या साम्यादाखल वर दाखविलेले दोन्ही काव्यांतील उतारे काव्याच्या आरंभा-आरंभालाच आलेले असल्यामुळें प्रथम, आदर्श म्हणून पुढें ठेवलेल्या संस्कृत काव्याचें नंतर पुढें पुढें तर कवीला पूर्ण विस्मरण पडलें व तो स्वतंत्र रचनेंत अगदीं गढून गेला असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. भास्करभट्टाचीं वर्णनें, कल्पना, उपमाउत्प्रेक्षादिअलंकारयोजना इतकी स्वतंत्र आहे कीं, त्यावरून स्वतंत्र प्रतिभाशाली कवींचेंच स्थान त्याला सर्वांनीं दिलें पाहिजे. माघकाव्याचें प्रतिबिंब त्याच्या काव्यांत पडणें हें एका दृष्टीनें अपरिहार्य होतें. शिक्षणसमयीं पंचमहाकाव्यांचा अभ्यास केलेला असल्यामुळें त्यांतील श्रीकृष्णगुणवर्णनपर शिशुपालवधाचें चित्र, आपलें मराठी काव्य लिहितेसमयीं त्याच्या डोळ्यांसमोर असणें शक्य होतें. तसें तें नसतें तर मात्र आश्चर्याची गोष्ट झाली असती. पण एवढ्यावरून त्याला स्वतंत्र कवीचें सिंहासन देण्याचें नाकारणें अयोग्य होईल. तसें म्हटलें तर स्वयंसंपूर्ण परमेश्वराखेरीज अखिल ब्रह्मांडांत मौलिक कृति निर्माण करणारा दुसरा कोणीच नाहीं. पूर्वकवींच्या कृति डोळ्यांसमोर ठेविल्याशिवाय नवीन कृति निर्माण करण्याची अगदीं स्वतंत्र अशी स्फूर्ति कोणाला झाली आहे? कविकुलगुरु कालिदास यानें आपल्या रघुवंशाच्या प्रस्तावनेंत तर

अथवा कृतवाग्द्वारे वंशेऽस्मिन्पूर्वसूरिभिः ।
मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः ॥

असा स्पष्टच कबुलीजबाब दिला आहे. शेक्सिपयरच्या बहुतेक सर्व नाटकांची पार्श्वभूमि तत्पूर्वीच्या नाटककारांनीं किंवा कादंबरीकारांनीं निर्माण करून ठेविली होती हेंही सुप्रसिद्धच आहे.

फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तव हमाल भारवाही

हे तुकाराम महाराजांचे, किंवा

मार्गस्था तंतु एकु एकु । मिळूनि चिंध्या देवीचा रुखु
समर्थ म्हणवी तेवीं रंकु । कवि उच्छिष्टा पावलों ॥
एक एक अक्षराची भीक । जीर्ण कवीतें मागूनि देख
मी सर्वज्ञ कविनायक । ऐसे म्हणविलें लौकिकीं ॥

हे मुक्तेश्वराचे उद्गार काय सुचवितात ? आणि इतकें असूनही वरील सर्व कवि स्वतंत्र व प्रतिभाशाली कवींच्या मालिकेंत जाऊन बसले आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सारांश केवळ कथानकपद्धतीचें अनुकरण केल्यास किंवा एकसारखे प्रसंग वर्णिल्यास कवीचें स्वतंत्रप्रतिभाशालित्व लुप्त होत नाहीं. रघुनाथ पंडितानें ज्याप्रमाणें आपलें नलदमयंतीस्वयंवराख्यान श्रीहर्षाच्या नैषधीयचरित्रावरून हुबेहुब उतरविलें, तसें भास्करभट्टानें खास केलें नाहीं. त्यानें फक्त माघाच्या काव्यांतील प्रसंग आपल्या काव्यांत स्वतःच्या उज्ज्वल प्रतिभेची जोड देउन व स्वतंत्र कल्पनांनीं नटवून वर्णिलेले आहेत, हें वाचकांनीं अवश्य लक्षांत ठेवावें. पण याहीपेक्षां विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, तसें करतांना कित्येक ठिकाणीं तर आपल्या योजकतेमुळें भास्करभट्टानें माघावरही ताण केलेली आहे असें मला वाटतें. उदाहरणार्थ श्रीकृष्ण, बलराम व उद्धव यांच्या मसलतीचाच प्रसंग घ्या. शिशुपाळाच्या वधाचें कार्य अगोदर हातीं घ्यावें, कीं युधिष्ठिराच्या राजसूययज्ञासाठीं हस्तिनापुराला प्रथम जावें या प्रश्नावर इतरांचीं मतें घेण्यापूर्वीच माघाचा श्रीकृष्ण आपलें स्वतःचें मत अगोदर सांगून टाकतो. पण भास्करभट्टानें आपल्या श्रीकृष्णाला स्वमतनिवेदनाच्या बाबतींत प्रारंभीं मूक ठेवून एखाद्या धूर्त राजकारणपटु मनुष्याप्रमाणें प्रथम दुसऱ्यांचीं मतें ताडून पाहण्यासाठीं

मग देवो म्हणे बलिभद्रातें: दोनि कार्ये प्रस्तुतें
कवण कीजें तें निरुतें : सांगा तुम्ही ( ४६६ )

असा त्याजकडून प्रश्न करविला आहे. श्रीकृष्णाला स्तब्ध ठेवून त्याजकडून वरील प्रश्न करविण्यांत भास्करभट्टाचें स्वभावचित्रणकौशल्य व प्रयोजकत्व दिसून येत नाहींत काय ? तसेंच एक दुसरें उदाहरण पहा. श्रीकृष्णबलरामाच्या दंडुकेशाहीच्या मतावर आपला नकार व्यक्त करून, मनुष्यानें नेहमीं युक्तीनें वागलें पाहिजे हें उद्धवाकडून वदवतांना माघ राजकारणतत्त्वांच्या तात्त्विक विवरणाच्या भोंवऱ्यांत नुसता गटंगळ्या खात पडला आहे. पण त्यापेक्षां, ' एखाद्या निर्बल शत्रूवर एकदम चालून जाणें वीरास शोभत नाहीं, तुल्यबल शत्रूशींच सामना करणें त्यांना योग्य, ' किंवा मोरोपंताच्या शब्दांत सांगणें झाल्यास

भटासि भट संगरीं, परि न कातरा दापिती

हें राजकारणाचें सुंदर तत्त्व

हातीचिआं मोहडा : सिंहो करी रगडा
तो नुचली चवडा : कोल्हेया वरी ( ४८६ )
आंगिचेनि धुधुवाटें : वायो न मोडी तनकुटे
आडमोडें करी खरांटे : महातरूंचे ( ४८७ )
दिवाकराची धाडी : साइलियांतें न मोडी
कसकसां रगडी : अंधकारातें ( ४८८ )

या परिणामकारक व प्रत्यक्ष व्यवहारांतील दृष्टांतांनीं श्रीकृष्णादिकांच्या मनावर बिंबविण्यांत भास्कराच्या उद्धवाचें व पर्यायानें भास्करभट्टाचें निरुपम स्वतंत्र प्रतिभाशालित्व व राजकारणपटुत्व स्पष्टपणें दिसून येतें. माघाचा उद्धव राजनीतीचीं मूलभूत तत्त्वें एखाद्या पाठशाळेंतील शिक्षकाप्रमाणें अगदीं सविस्तर रीतीनें श्रीकृष्णादिकांना समजावून देतो. बळरामाचें चित्र रंगवतांनाही माघानें हाच घोळ घातला आहे. यापेक्षां आपल्या भास्करभट्टाचे श्रीकृष्ण, बलराम व उद्धव हे पाहा. माघाचे बलराम व उद्धव अभ्यासजड तत्त्ववेत्ते किंवा पुस्तकांतील किडे वाटतात. आणि त्याचा श्रीकृष्ण तर अगदींच पुळचट वाटतो. पण भास्करानें वर्णिलेलीं हीं तिन्ही पात्रें व्यवहारनिपुण व राजकारणी दिसतात. या

स्वभावचित्रणाच्या बाबतींत भास्करभट्टानें माघावरही ताण केलेली आहे, हें कोण नाकबूल करील ? वरील गोष्टींप्रमाणेंच दोन्ही काव्यांतील जलक्रीडादि प्रसंगाचीं वर्णनें ताडून पाहण्यासारखीं आहेत. संस्कृत साहित्यशास्त्रकारांनीं लिहून ठेवलेल्या ठराविक कविसंकेतानुसार एकाच सांच्याचीं वर्णनें, कल्पना वगैरे आपणांस माघांत आढळून येतील. याच्या उलट जरा भास्करभट्टाकडे नजर फेका, म्हणजे त्यानें ते प्रसंग किती उचिततेनें व स्वतंत्र रीतीनें वर्णिलेले आहेत हें तेव्हांच दिसून हेईल.

माघाच्या शिशुपालवधांतील प्रसंगांशिवाय इतर अनेक काव्यमय प्रसंग भास्करभट्टानें आपल्या स्वतंत्र बुद्धीनें कल्पून ते आपल्या काव्यांत वर्णिलेले आहेत. विशेषतः नारद व उद्धवाचा विनोद, श्रीकृष्णरुक्मिणीचा प्रेमकलह, विरहिणी गोपींचीं वर्णनें इत्यादि. हे सर्व प्रसंग भास्कभट्टाच्या स्वतंत्र कथानकग्रथनकौशल्याची पूर्णपणें साक्ष देतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे माघाच्या शिशुपालवध महाकाव्यावरून आपली काव्यकथा लिहिण्यास भास्करभट्टास जरी स्फूर्ति झाली असली तरी त्या काव्याचें त्यानें अंधानुकरण मात्र केलें नाहीं. श्रीकृष्णादिकांच्या स्वभावरेखाटनांत माघानें केलेल्या चुका त्यानें दुरुस्त केल्या व प्रसंगीं आपल्या अचाट कल्पनाशक्तीनें व उज्ज्वल प्रतिभेनें नवीन, काव्यमय व सुंदर प्रसंगांची त्या काव्यास जोड दिली, काव्य लिहिण्यास प्रारंभ करतांना त्यानें माघाला हाताशीं घेतलें यांत संशय नाहीं. पण पुढें एकदा काव्यवर्णनाला लागल्यानंतर कथेच्या ओघांत त्याची स्वतंत्र प्रतिभाशक्ति जागृत झाली व तिच्या साहाय्यानें एखाद्या कुशल कर्णधाराप्रमाणें आपल्या कथेचें तारूं मनाला येईल त्याप्रमाणें वळवून, सभोंवतालच्या मनोहर सृष्टिसौंदर्याचें निरीक्षण करीत असतांना प्रस्फूर्त झालेली सुललित व श्रवणसुभग कवनें आलापीत आलपीत त्यानें तें कथेच्या शेवटच्या विश्रांतिस्थळाला आणून पोंचविलें आहे, हें मुळींच विसरून चालणार नाहीं.

माघकाव्य व भास्करभट्टाचें काव्य या दोहोंचाही विषय एकच असल्यामुळें पहिल्याचा परिणाम दुसऱ्यावर झाला असल्यास नवल नाहीं. तसें होणें साहजिक किंबहुना अपरिहार्य होतें हें आपण पाहिलेंच. पण माघाच्यति-

रिक्त इतर महाकवींच्या काव्यांचा अभ्यास भास्करभट्टानें केला नव्हता किंवा इतर महाकवींच्या कृतींचा परिणाम शिशुपालवधकथेवर झाला नाहीं, असें मात्र आपणांस म्हणतां यावयाचें नाहीं. ध्रुवतारकेवर दृष्टि ठेवून आपलें तारूं हाकलणारा नावाडी आकाशांतील इतर तेजःपुंज ग्रहगोलांकडे डोळेझांक करतो असें थोडेंच आहे ? उलट आपली ध्येयतारका दृष्टीआड न होऊं देतां इतर चांदण्यांच्या व नक्षत्रांच्या सौंदर्याचें तृषित नेत्रांनीं पान करीत करीतच तो आपला मार्ग आक्रमण करीत असतो. भास्करभट्टाची स्थितिही अगदीं तशीच आहे. माघानें आंखून दिलेल्या सगरावर झपाझप पावलें टाकीत असतांच भारवि, श्रीहर्ष, जयदेव, कालिदास इत्यादिकांच्या कवनांचें गायन त्यानें चालविलेंच होतें व त्या श्रवणमनोहर गीतगायनाचे पडसाद प्रस्तुतच्या शिशुपालवधकथेंत अगदीं स्पष्टपणें उठलेले दिसून येतात.

## भास्करभट्ट, भारवि आणि श्रीहर्ष

माघाचें शिशुपाळवध व भारवीचें किरातार्जुनीयम् या दोन्ही महाकाव्यांची रचना इतकी सारखी आहे कीं, माघानें भारवीची नक्कल केली कीं भारवीनें माघाचं अनुकरण केलें हे सांगतां येणं कठीण आहे. संस्कृत वाङ्मयावरील ग्रंथांत हा एक वादाचा विषय होऊन बसला आहे. वरील प्रश्नाचें उत्तर दोन्ही कवींच्या कालनिर्णयावरून निश्चितपणें देतां येणें शक्य आहे व तशा रीतीनें हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केलाही जातो. परंतु त्या विवेचनाशीं प्रस्तुत स्थळीं आपणाला कांहींच कर्तव्य नाहीं. दोन्ही काव्यांची रचना अगदीं सारखी असल्यामुळें भास्करभट्टानें आपल्या कथेंतील निरनिराळ्या प्रसंगांची मांडणी करतांना कोणतें काव्य डोळ्यासमोर ठेवलें असावें असा प्रश्न कित्येकांच्या मनांत उभा राहाणें शक्य आहे. अर्थात्, भास्करभट्टानें दोन्ही काव्यें आपल्यासमोर ठेवलीं असावीं असें म्हणणारांचें मत एकदम नाकबूल करतां यावयाचें नाहीं. त्या दृष्टीनें पाहतां किरातार्जुनीयाचाही आपल्या कथारचनेंत भास्करभट्टाला उपयोग झाला असावा. पण त्यापेक्षां कथानकाच्या एकतेमुळें त्यानें माघाच्या काव्याचेंच अनुकरण केलें असें म्हणणेंच अधिक इष्ट

व सयुक्तिक होईल. याशिवाय भारवीच्या किरातार्जुनीयाचा परिणाम शिशुपालवधकथेंत कोठेंही दिसून येत नाहीं. जी गोष्ट भारवीविषयीं तीच श्रीहर्षाच्या नैषाधीयचरित्राविषयीं. हें काव्य संस्कृतवाङ्मयांतील श्लेषरचनेचें अत्युत्कृष्ट उदाहरण आहे. त्यांत कित्येक ठिकाणीं तर कवीनें एकेका श्लोकांत पांच पांच सात सात अर्थ कोंबून दिलेले आहेत. भास्करभट्टाच्या शिशुपालवधकथेंतील कांहीं ओव्या श्लेषयुक्त आहेत यांत संशय नाहीं. पण तेवढ्यावरून नैषधीयचरिताची त्याच्या काव्यावर छाया पाडलेली आहे, असें म्हणणें युक्त होणार नाहीं. सामान्य प्रतीचा जरी कवि असला तरी त्यालाही श्लेषपूर्ण रचना करणें कठीण जात नाहीं. त्यासाठीं त्यानें संस्कृत नैषधीयचरिताचा अभ्यास करावयासच पाहिजे असें नाहीं. भास्करभट्टानें जे श्लेष कित्येक ठिकाणीं साधले आहेत ते अगदीं साधे, सरळ व सोपे आहेत. शिवाय श्लेषरचनेच्या साम्याचें उदाहरण म्हणून आपणाला दोन्ही काव्यांतून एकही श्लोक किंवा ओवी काढून दाखवितां येत नाहीं. असें असतांना, प्रस्तुत काव्य वाचून श्रीहर्षाच्या नैषधीयचरिताची आठवण झाल्याखेरीज मात्र राहात नाहीं असें म्हणणें हा केवळ दुराग्रह होय असें आम्हांस वाटतें.

## भास्करभट्ट व जयदेव

पण भास्करभट्ट व जयदेव यांची स्थिति मात्र तशी नाहीं. भास्करभट्टाची जयदेवाशीं नुसतीच तोंडओळख नव्हती. हे दोघेही कवि जणुं एकाच घरांत राहिलेले, एकाच शाळेंत शिकलेले, एकाच बैठकींत वावरलेले व एकच रंग खेळलेले दिसतात. शिशुपालवधकथा हें एक श्रृंगाररसानें ओथंबलेलें काव्य आहे. जयदेवाचें गीतगोविंदही श्रृंगाराचें सरोवर आहे. आपल्या बालपणांत गोपिकांचीं वस्त्रें चोरून त्यांना नग्न स्थितींत पाण्यांत क्रीडा करतांना पाहण्यांत आनंद मानणारा श्रीकृष्णच दोन्ही काव्यांचा नायक आहे. तेव्हां जयदेवाच्या गीतगोविंदाची पडछाया शिशुपालवधकथेंत पडली असल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. युधिष्ठिरानें आरंभिलेल्या राजसूय यज्ञासाठीं श्रीकृष्ण आपल्या सर्व बायकांना बरोबर घेऊन इंद्रप्रस्थास गेला होता. पण

तेथून भीमार्जुनाबरोबर जरासंधाचा वध करण्यासाठीं त्याला मगध देशांत जावें लागलें.त्या वेळीं श्रीकृष्णाच्या पट्टराणीची-सुकुमार रुक्मिणीची विरहानें जी अवस्था झाली ती भास्करभट्टानें फारच बहारीनें वर्णिलेली आहे. भास्करभट्टाच्या शब्दशलाकेनें चित्रिलेली ही विरहपीडित रुक्मिणीची मूर्ति पाहतांच जयदेवानें वर्णिलेली, निस्तेज चंद्राप्रमाणें म्लान दिसणारी विरहव्याकुल राधिकेची मूर्ति आपल्या डोळ्यांसमोर तात्काळ उभी राहाते. शीतोपचारार्थ आपल्या अंगाला लावलेली चंदनाची उटी राधेला ज्याप्रमाणें

सरसमसृणमपि मलयजपंकम् पश्यति विषमिव वपुषि सशंकम् ॥

विषाप्रमाणें वाटत होती, त्याचप्रमाणें रुक्मिणीलाही

एणें मलयानीळें: मज श्रीखंडाचें विख सूदलें ( ८२३ )

असेंच वाटत होतें. आपल्यासाठीं अंथरलेली

नयनविषयमपि किसलयतल्पम् कलयति विहितहुताशविकल्पम् ॥

कोमल किसलयांची शय्या अग्निप्रमाणें जशी राधिकेला भासली तशीच

आंगीं लागतातीं कमळें : इंगळें जैसीं : ( ७५७ )

रुक्मिणीलाही कमळें इंगळाप्रमाणें लागत होतीं. जगांतील सर्व कोमल व तापहारक द्रव्यांची उटी करून अंगाला लावतांच

तें लाविजे कुचतटीं: तरी सर्वांगीं सुटे चुटपुटी
आंग घाली तळवटीं : वैदर्भी ते ( ७९४ )

जिच्या सर्वांगांना चुटपुटी सुटत असे ती

हें काळें पाखिरूं : मजसी सदा चिंती विरू
कीं यांतें उपच्यारू : पुसो जातुसा ( ८२१ )
कां भीमकाची आण : हे चंद्रकिरण
मज सूती आह्वान : अनेग वेळां ( ८२२ )
एणें मलयानिळें : मज श्रीखंडाचें विख सूदलें
तें सर्वांग जालें काळें नीळें : नखां सकट : ( ८२३ )

या तिन्ही ओव्यांत वर्णिल्याप्रमाणें चंद्राला, चंद्रकिरणाला व मलयानिलाला निंदणारी रुक्मिणी ही

निंदति **चंदनमिन्दुकिरण**मनुविंदति खेदमधीरम् ।
व्यालनिलयमिलनेन गरलमिव कलयति **मलयसमीरम्** ॥

या अष्टपदींत चंदन, चंद्रकिरण व मलयवायु यांची निंदा करणाऱ्या जयदेवाच्या राधिकेची हुबेहुब साउली नाहीं असें कोण म्हणेल ? याप्रमाणें या दोन्ही काव्यांच्या नायिकांच्या विरहव्यथेचें व त्यावर केलेल्या उपचारांचें साम्य दाखवून देणारे आणखी बरेच उतारे देतां येतील. पण स्थलाभावास्तव इतकेच पुरे. ७४३ ते ८५२ या ओव्यांत वर्णिलेला विरहावस्थेचा प्रसंग वाचल्यावर जिज्ञासूंनीं जयदेवाच्या गीतगोविंदांतील तिसरा व चौथा सर्ग, विशेषतः आठवी व नववी अष्टपदी जरूर वाचून पहावी.

## भास्करभट्ट व कालिदास

माघ व जयदेव यांच्या काव्यांप्रमाणें कविकुलगुरु महाकवि कालिदास याच्या काव्यांतील कल्पनांची व वर्णनांचीही पडछाया भास्करभट्टाच्या कथेंत पडलेली आढळते. या बाबतींत खालीं दिलेले समानार्थक श्लोक व ओव्या ताडून पाहण्यासारख्या आहेत.

( १ ) रघूणामन्वयं वक्ष्ये तनुवाग्विभवोऽपि सन्
तद्गुणैः कर्णमागत्य चापलाय प्रचोदितः ॥ —रघु. १-९.
मज नाहीं मतीचा वीकासु : केंवी वर्णु राणा परेशु
परी जीवां होतसें उल्हासु : स्तुतीलागी ( १३ )

( २ ) पत्तिः पदातीं रथिनं रथेशस्तुरंगसादी तुरगाधिरूढम् ।
यन्ता गजस्याभ्यपतद्गजस्थं तुल्यप्रतिद्वंद्वि बभूव युद्धम् ॥
—रघु. ७-३७.

रथें रथं दाटीः गजें गजां उपटी
घोडेयां राउतां दे मिठीः एकें वेळें ( ८८१ )

( ३ ) गोरोचनानिकषपिङ्गटाकलापः संलक्ष्यते शशिकलामलवीतसूत्रः ।
मुक्तागुणातिशयसंभूतमंडनश्रीर्हेमप्ररोह इव जङ्गमकल्पवृक्षः ॥
—विक्रमोर्वशीय ५-१९.

केळवत्तर निरी झळकली: जाणिवेयांची लुळी झळाळिली
पिंगटा जटाची कीळ फांकीली : दाहीं दीसां ( ४३ )

( ४ ) तालैःशिञ्जावलयसुभगैर्नर्तितः कांतया मे
यामध्यास्ते दिवसविगमे नीलकण्ठः सुहृद्वः । —मेघदूत.
चंद्रकांताचेया बाळानेयावरीः घोंसाळेयां कांकणांचा करीं
नाचवितातिं विद्याधरीः मयूरांतें ( ३४० )

( ५ ) अरण्यबीजाञ्जलिदानलालितास्तथा च तस्यां हरिणा विशश्वसुः ।
यथा तदीयैर्नयनैः कुतूहलात्पुरः सखीनाममिमीत लोचने ॥
—कुमार. ५-१५

आंगीचेनि सुगंधपणेंः कस्तुरीमृगेसीं करूनि साजणें
उमानिती डोळेयांची वडीलपणेंः कृष्णकुमरी ( ३४२ )

( ६ ) त्याचप्रमाणें, धर्मराजाच्या आमंत्रणावरून राजसूय यज्ञासाठीं श्रीकृष्णानें इंद्रप्रस्थ नगरांत प्रवेश केल्यानंतर, त्या मदनमनोहर मूर्तीला अत्यंत उत्कंठेनें पाहावयास आलेल्या राजरत्नींचें—

एकी प्रेमें उत्कंठिताः पाहावियां उठेति असासिता
तयाचे भाव वाणितांः कत्रीसी माथा तुकविणें ( ६०० )
ढाळाचे मोतीः मदनाचा पंथु सिंपती
तेवि हाराची विखरणी करीतीः कव्हणी एकी ( ६०१ )
भेटावेया लक्ष्मीपतीः मदनलिंगासी रत्नपूजा करती
तेवि कुचतटीं हार घालितीः आणिकी एकी ( ६०२ )
फुलाचिअे सेजेः विसांवला प्राणपती सांडिजेः
मग देओ पाहावेया धांविजेः तो वेध कैसा सांघों ( ६०४ )

हें वर्णन रघुवंशांतील अजइंदुमतीला, किंवा कुमारसंभवांतील शंकरपार्वतीला पहावयास आलेल्या पौरांगनांच्या शृंगारच्चेष्टांची तात्काळ आठवण करून देतें.

वर वर्णिलेल्या, माघ, जयदेव, कालिदास, इत्यादि कवींशिवाय इतर संस्कृत कवींच्या काव्यांचा परिणाम भास्करभट्टाच्या शिशुपालवधकथेवर झाला असण्याचा संभव आहे. त्यांत विशेषतः चाणक्याच्या ' कटकेनैव कंट-

कम्' या परभारें पाहुण्याकडून साप मारविण्याच्या राजनीतीचें

कांटिया काटी झाडावी : बाहिरी वाहिरी

या ओवींत भास्करानें केलेलें अनुकरण अभ्यासु वाचकांच्या नजरेंतून मुळींच सुटणार नाहीं. पण वरील नीतीचें मंडन करतांना भास्करभट्टानें एक मोठीच चूक केली आहे. आपल्या शत्रूंचा पांडवांकडून परभारें नाश करवावा (४९४) हें सांगतांना वरील उदाहरण उद्धवानें दिलें आहे तें बरोबर लागू पडत नाहीं; कारण 'काट्यानें काटा काढावा' याचा तात्पर्यार्थ आपल्या एका शत्रूचा दुसऱ्या शत्रूकडून नाश करावा असा आहे. प्रस्तुत स्थलीं पांडव हे यादवांचे कांहीं शत्रु नव्हते. उलट ते जवळचे आप्त होते. त्यांच्याकडून यादवांच्या शत्रूंचा परस्पर नाश करविण्याची युक्ति श्रीकृष्णाला सुचवितांना उद्धवानें दिलेलें वरील उदाहरण कसें चुकीचें आहे हें वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल.

## नरेंद्र व केसोबास.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून भास्करानें शिशुपालवधाच्या प्रसाधनांत संस्कृत कवींचें साह्य कसें घेतलें तें आपण पाहिलें. संस्कृत कवीं-प्रमाणेंच कांहीं मराठी कवींचेंही ऋण त्यानें घेतलेलें आढळून येतें. रुक्मिणी-स्वयंवरकर्ता नरेंद्रबास व मूर्तिप्रकाशकर्ता केसोबास या दोघांच्या कृतींची छाया भास्कराच्या शिशुपालवधांत फार पडलेली आहे. नरेंद्रबासाचा ग्रंथ शके १२१३ मधें तर केसोबासाचा ग्रंथ शके १२१० मधें लिहिला गेला असल्यामुळें भास्करानें या काव्यांचा खोल अभ्यास केला असणें शक्य आहे आणि म्हणूनच या दोन्ही काव्यांतील कल्पना कळत न कळत त्याच्या लेखणींतून बाहेर पडल्या असाव्यात. त्यांतही मूर्तिप्रकाशापेक्षां रुक्मिणीस्वयंवराचें प्रतिबिंब शिशुपालवधांत अधिक पडलें आहे. याची कारणमीमांसा उद्धवगीते-वरील निबंधांत केली आहे ती तेथें पहावी. याविषयीं अधिक विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. वरील दोन्ही ग्रंथ व शिशुपालवध यांतील साम्यस्थळें पुढें देत आहें.

| | शिशुपालवध. | रुक्मिणीस्वयंवर-नरेंद्र. |
|---|---|---|
| १ | लोकांचा सारवीला उंबरा देखती<br>तरी एका सिताची आस करीति<br>ते दैन्य काइ फेडीती<br>मागतयांची ॥ १५० ॥ | सारवीलेया दाराची पांती वास<br>उंबरेयावरीला सिताची करीती आस<br>जे तोंड सुनिसुनि घेती घास<br>आगी आंतुल ॥ १९९ ॥ |
| २ | तेथ डोळा लागे रती सीणल्या<br>राजकुमरीं ॥ २५७ ॥ | तया वेधें चांपेया तळिं वनीता<br>वीसंवती रती सीणलीया ॥८०९॥ |
| ३ | मदनमोगरेयाचा साबरां<br>पीउनि मकरंदाची मदिरा<br>धुमाडि करीति मधुकर<br>रूंझी घालीताती ॥ २८६ ॥ | तेथ गोंदळ खेळती मधुकरू<br>मधुकरींसी ॥ ८१२ ॥ |
| ४ | तेथ क्षीरपुरभ्रांती<br>राजहंस स्फटिकांगणें<br>चाटीती ॥ ३३९ ॥ | तेथ क्षीरपुर भ्रांती पडे नीरुती<br>राजहंस सीळ चाटिती ॥ १९९६ ॥ |
| ५ | चंद्रकांताचेया बाळाणेयावरी<br>घोंसाळेया कांकणांचां करीं<br>नाचविताती विद्याधरी<br>मयूरातें ॥ ३४० ॥ | बाळाणेयासि टेकौनि विद्याधरा<br>खेळविती मयूरातें ॥ १०११ ॥ |
| ६ | आंगणाचेनि चोखाळपणें<br>प्रतिबिंबलीं तारागणें<br>ति फुलें म्हणौनि सिहाणे<br>वेचों धांवती ॥ ३४३ ॥ | तें कांचनिबद्ध आंगणें<br>नीसीभरी बिंबती तारांगणें<br>कीं ते पुष्प म्हणौनि धांवती सत्राणें<br>वेचावया चतुर ॥ १०१९ ॥ |
| ७ | म्हणौनि मदनु सादेजे<br>लेकरूपणालागी ॥ ३७० ॥ | म्हणौनि मदन घेत आळी<br>पुत्रपणालागी ॥ १११० ॥ |
| ८ | महापापाचे डोंगर<br>भेदावया अति खडतर | महापापांचे डोंगर<br>भेदावया अति खडतर |

| | | |
|---|---|---|
| | तैसें दिसे वज्र सुंदर<br>सुलक्षणीक ॥ ३८२ ॥ | श्रीचरणातळीं उमटलें वज्र<br>तेया हेतु ॥ १०९७ ॥ |
| ९ | तरि एकावळी उपमीजति<br>कौस्तुभाजवळी ॥ ३९९ ॥ | म्हणौनि एकावळी उपमीजती<br>कौस्तुभाजवळी ॥ ११३६ ॥ |
| १० | दिग्गजाचिया मोहडा<br>जरि आनंदाचीया होती दोनी सोंडा<br>तऱ्ही श्रीकृष्णाचिया भुजादंडा<br>उपमा कीजेति ॥ ४०० ॥ | सौंदर्यवनीचीया दिग्गजाचीया मोहडा<br>जरि दीसती दोन्ही आनंदाचीया सोंडा<br>तरि उपमा दीजे भूजादंडा<br>श्रीकृष्णाचेया ॥ ११२३ ॥ |
| ११ | मुक्तिवनिते दोषें<br>ठेले इंद्रनीळाचे आरिसे<br>तेवि कपोलद्वय दिसे<br>झळफळीत ॥ ४१७ ॥ | जैसे तेजाचे आरसे सुहावे<br>तैसी दोन्ही कपोळद्वयें ॥ ११६९ ॥ |
| १२ | उद्धवदेवाचीए पालखती वरून<br>घेतला तोडराचा श्रीचरण<br>सीरावरी ठेविला धरून<br>घडी एकी ॥ ४२८ ॥ | तेह्वळीं तो द्वीज हरी<br>तोडराचा श्रीचरणु उद्धवदेवाचीये पाल-<br>खतीवरी : उचलौनि धरीला सीरीं<br>द्विजराजें ॥ ११८२ ॥ |
| १३ | मडौराचां बंबाळीं<br>योगिनी चक्राचां गोंधळी<br>काळरात्री उदो म्हणविली<br>रणामाजी ॥ ४४६ ॥ | ऐसा मांडीला अवसरू<br>चौसटी योगीनीचा गोंदळ थोरू<br>उदो म्हणती आपारू<br>अंबिकेचा रायांगणीं ॥ २३६८ ॥ |
| १४ | कांटिया काटी झाडावी<br>बाहिरी वाहिरी ॥ ४९४ ॥ | ऐसी काटीया काटी झडेल परबाहिरी<br>भीमकु शरण येईल जी श्रीहरी।१२५१॥ |
| १५ | तंव डौंडोची वीरघंटा<br>सनसनितीं जेंगटा<br>वाजताती एकदटा<br>एकें वेळें ॥ ५२२ ॥ | वाजती डौंडीचिया वीरघंटा<br>घुमघुमीती तांबकीया एकदटा<br>सनसनीती जेंगटा<br>मीती नाहीं ॥ १३०७ ॥ |

| | | |
|---|---|---|
| १६ | गजमदाचिया चिडनी<br>निसरताती कामिनी<br>सांवरतां नेसणी<br>हांसीं होताति ॥ ५३६ ॥ | तेणें उतली असे मेदिनी<br>नीसरौनि पडताति चीडणी<br>हातीं न सवरती सांवरीतां नेसणी<br>अतुरबळीयांसी ॥ ९२१ ॥ |
| १७ | आनंदाचीया खुलौरी<br>मेणें लपवीलिया त्रिपुरारी ।५५४। | ते अनंगाची खूलौरी मज पातां<br>कीं कदर्पकुळदेवता<br>नाना ते सौभाग्य व्यक्ता<br>जालें दिसें ॥ २६५० ॥ |
| १८ | चांपेगोरटीं आंगें उघडीली<br>पुन पडतीचि ना ॥ ५५८ ॥ | तेथ चांपेगोरटी आटीवें आंगें उघडी<br>पडीली धाकुटीयांची ॥ १४६२ ॥ |
| १९ | शृंघारें जांभै दीधली<br>ना तरि मदनें बुंथी फेडिली<br>तेवीं वरौतीं पाखीं उचलली<br>चोळियांची ॥ ५५९ ॥<br>तेहवेळीं कुचपर्वताचां घाटीं<br>वळघतां डोळे जाले आयतुटी<br>राऊत जाले हिंपुटी<br>वारू थापटती ना ॥ ५६० ॥ | तवं चोळीयाची पाची (खी) उचलीली वारेंनीं<br>जैसी मदनबुंथी फेडीली ततक्षेणी<br>नाना ते कुचपर्वताचां घाटीं बैसोनी<br>राहीली दृष्टी वीरांची ॥ १४६३ ॥ |
| २० | शृंघारें जांभै दीधली ॥ ५५९ ॥ | कीं अनंगें जांभै दीधली<br>तैसी उघडी स्त्रीरत्नें नीगाली ॥१८१२॥ |
| २१ | घोसाळा कांकणांचां हातीं<br>कीनरी सडे घालिताती ॥५९०॥ | एकी घोशाळां कांकणाचां हातीं<br>बटुकी कुंकुमकेशराचे सडे<br>घालिती ॥ १०१८ ॥ |
| २२ | तिए वनीं सूर्येकर न सिरती<br>तर प्रियांचीं गुप्तलिंगें केंवी दिसति<br>परि गौर मुखचंद्र बखलिती<br>अंधकारातें ॥ ६२० ॥ | वनीं सौरसु नाहीं सूर्येकरा<br>तरि सूरतरू केंवि दीसे आंधारा<br>परि उजियेड होय गोरा<br>आंग कांतीचा ॥ ८०६ ॥ |

| शिशुपालवध | मूर्तिप्रकाश |
|---|---|
| २३ एणें नाममृतें ओल्हावली<br>क्षेण एक सावध आली ॥८४७॥ | येणें नामामृतें नीवालीं<br>डोळे उघडौनि वास पाहिली ॥१६९१॥ |
| २४ उच्चैश्रवेयाचिअे जावळिके<br>कांतळें साम्राणीचे ॥ ९३६ ॥ | तो उचश्रवेयाचीये जावळीचा<br>तैसा श्वेतवर्ण कृष्णमेचूचा ॥ २७३८ ॥ |
| २५ वेल्हावती टापु घाली<br>चामके मागिलीचि दों पाउलीं<br>पुढिलें खरपुरें कुंभस्छळीं<br>दिग्गजाचां ॥ १००७ ॥ | जेव्हळीं वेल्हावत टाप घाली<br>तेव्हळीं चाले तीचि पाउली<br>मागील दोन्ही घडघडीली<br>तैसी दीसती ॥ २७४२ ॥ |
| २६ कीं दळावेया पृथ्वीचा जातां<br>काळरात्रीं वैरणें घातलें मज पातां<br>तेवि दोनि दळें भीडतां<br>वीरांचें पीठ जाले ॥ १०४४ ॥ | ना तरीं काळरात्री मज पाहातां<br>दळावेया पृथ्वीचां जातां<br>दोहीं दळाचें वोरण घातलें त्वरीता<br>पीठ करावेया ॥ २१५९ ॥ |

## शिशुपालवध. — मूर्तिप्रकाश.

| शिशुपालवध | मूर्तिप्रकाश |
|---|---|
| १ घेउनि चैतन्याची गवसणी<br>द्वारका माहातीर्थ केली चरणीं<br>तयां नमो श्रीचक्रपाणि<br>कैवल्यनाथा ॥ ३ ॥ | कृपावसें सूध चैतन्याची गवसणी<br>जीवां कारणें अंगीकरी<br>श्रीचक्रपाणी ॥ १६७९ ॥ |
| २ मज नाहीं मतीचा वीकासु<br>कैंवी वर्णु राणा परेशु<br>परी जीवां होतसें उल्हासु<br>स्तुतीलागी ॥ १३ ॥ | मज नाहीं मतीची प्रबळता<br>तुतें वर्णावेया चैतन्यनाथा<br>परि जीवा होत असे आर्ति<br>अस्तुति करावेया ॥ ८५ ॥<br>नाहीं ज्ञानाचें पुरतेपण<br>वर्णावेया श्रीमूर्तीचे गुण<br>पर अल्हाद होत असे मन<br>स्तवनालागी ॥ ८६ ॥ |

| | |
|---|---|
| ३ साहीत्याचेनि परीमळें<br>शृंगाराचेनि मेळें<br>प्रबंध होती मातावळे<br>कविजनाचे ॥ १५ ॥ | आतां साहित्याचेनि रसें<br>शृंघाराचेनि धुमूकुसें<br>प्रबंधु नाचवीन उल्हासें<br>कवीजनाचे ॥ १८४ ॥ |
| ४ मोतियांचे घोसें<br>रांविलें कुंकुमाचेनि रसें<br>तऱ्हीं करूं न एति सरिसें<br>प्रबंधेसीं ॥ १७ ॥ | सरिसी सुढाळें<br>वोविजति मुक्ताफळें<br>तऱ्हीं ग्रंथिचीं अक्षरें सोहजळें<br>तयां पासौनि ॥ १८५ ॥ |
| ५ वाणितां कान्हो चौहातु मल्लु<br>वोडउ होतसे नवलु<br>बोल रसें दोंदिलु<br>नाचतु दिसे ॥ २१ ॥ | वाणितां लावण्यनीधी लक्षुमीकांतु<br>बोल बोलाचा धरूनि हातु<br>आनंदें दोंदील चाले मलपुतु<br>सीधांतमार्गे ॥ ५१६ ॥ |
| ६ पुन वाचा रसाळा<br>गर्व सांडवीन कोकिळा<br>कळहंसा आवकळा<br>करीन मी ॥ २७ ॥ | तीए कवीतेची रसवृती<br>आइकौनि कोकिळा कुंजों लागती<br>देखौनि पारूखे गती<br>राजहंसांची ॥ १८९ ॥ |
| ७ तो सीण सांगो एताए हृषीकेशा<br>सूर्यो जेवी ॥ ३९ ॥ | कीं तया स्वर्गी करीतां अवस्थान<br>न फीटेचि कळंकपन<br>भणौनि टाकुनि आला श्रीचरण<br>देवरायाचें ॥ ५५७ ॥ |
| कीं राहोभेण चंद्रू<br>टाकौनि एताअे यादव नरेंद्रू<br>तैसा वितर्किला मुनींद्रू<br>सकळां जनीं ॥ ४० ॥ | कीं दीनकरू राहो भेण<br>श्रीचरणा रीगाला सरण<br>म्हणे नीवारी जी जन्ममरण<br>देवसीरोमणी ॥ ५५८ ॥<br>की ते उदोस्त करीतां श्रमले<br>सूर्यादीक खेदखीन जाले<br>ते फळ सांडौनि सीण सांघो आले<br>कर्णाजवळीं ॥ १९३१ ॥ |

| | |
|---|---|
| ८ मदनमोगरेयाचा साबरां<br>पीउनि मकरंदाची मदिरा<br>धुमाडि करीति मधुकर<br>रूंझी घालीताति ॥ २८६ ॥ | तेथ मुनीजन मधुकर<br>पीउनि मकरंदाची मदीरा<br>धुमाडि करिताति नीरंतर<br>रूंझि घालिताति ॥ १९१७ ॥ |
| ९ तया निरोपमां परब्रह्मा<br>जरि दीजैल उपमा<br>तरि कोपतील आम्हां<br>ब्रह्मवीद ॥ ३६४ ॥ | तया नीरूपमा नीराकारा<br>उपमा देइजैल श्रीचक्रधरा<br>तरि कोपतील अनुचर<br>ब्रह्मवीद ॥ १४६ ॥ |
| १० रूपाचिआं भूलो<br>जेआं लक्ष्मी वालभैली<br>वळीयां घरूं रीगाली<br>अव्हेरितां ॥ ३६९ ॥ | रूपाचा आकारू<br>देखोनि लक्षुमीए संचरला वीकारू<br>मग चाळिला घरचारू<br>प्रभुरायाचा ॥ ५१२ ॥ |
| | जया देवाची श्रीमूर्ति<br>देखौनि पाठीं धावे वेधवंती<br>ते अव्हेरितां कैवल्यपती<br>बाळिया घर रीगाली ॥५२९॥ |
| ११ श्रीकृष्णाचा जांघिवा होइजे<br>तरि लावण्याचें पडप लाहिजे<br>म्हणौनि मदनु सादैजे<br>लेकुरूंपणालागी ॥ ३७० ॥ | तया देवाचा जांघोवा<br>लाहावेया सादैजे अनंग बरवा<br>जयाचेया एकही अवेवा<br>उपमा नाहीं ॥ ५१५ ॥ |
| १२ देखौनि रूप सावळें<br>वैराग्य कामकळां पाल्हैले<br>पुरुषां उपजेति डोहळे<br>कामिनीपणाचे ॥ ३७१ ॥ | देखौनि मूर्ति चांपेगौर<br>वैराग्य जालें कामातुर<br>ब्रह्मवीद्या नीरंतर<br>जवळीचि असे ॥ ५१३ ॥ |
| देखौनि श्रीमूर्ति उघडी<br>ब्रह्मविद्या डोळे मोडी<br>मुक्ति धावे उघडी<br>पाठोवाठीं ॥ ३७२ ॥ | |

२

## काव्यांतील रस.

'शिशुपालवध' नांव कानांवर पडतांच हें काव्य वीररसपरिप्लुत असावें अशी साहजिकच आपली कल्पना होते. जिकडे दृष्टिक्षेप करूं तिकडे युद्धप्रसंग चाललेले दिसून येतील, रणवाद्यांचा झणझणाट व शस्त्रास्त्रांचा खणखणाट ऐकावयास सांपडेल, कबंधांचें नृत्य व रुधिराचे पाट अंतःकरण भयभीत करून सोडतील, असें वाटतें. निदान कांहीं नाहीं तरी काव्यांतील प्रधान रस वीररस असावा असा तर्क कोणी केल्यास तो चुकीचा आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. पण समग्र काव्याचें वाचन झाल्यानंतर ह्या आपल्या कल्पना केवळ कल्पनाच ठरतात. कारण वीररसाला प्रस्तुत काव्यांत फारच गौण स्थान मिळालेलें आहे. शिशुपालवधाचा मूळ प्रसंग कवीनें अवघ्या दोनशें–अडीचशें ओव्यांत आटोपला आहे. वीररस जो काय दिसतो तो याच मर्यादित क्षेत्रांत दिसतो. आपल्या अपेक्षेप्रमाणें जागजागीं त्याचे पाट धो धो वाहत असलेले आढळत नाहींत, तर त्याचें स्वरूप लहानशा ओहोळाप्रमाणें मर्यादित असून फक्त थोड्याच ठिकाणीं तो स्वच्छंद विहार करीत असलेला दिसून येतो. इतरत्र रसराज शृंगारानेंच आपलें राज्य प्रस्थापित केलें आहे. अपेक्षेप्रमाणें वीररस तर या काव्यांत फारसा नाहींच, उलट त्याचा प्रतिस्पर्धि जो शृंगार त्याचींच मंदिरें सर्वत्र अवलोकावयास सांपडतात. अठरा हजार गोपींपैकीं प्रत्येकीच्या मंदिरांत ज्याप्रमाणें नारदाला श्रीकृष्ण आढळावयाचाच, त्याचप्रमाणें या काव्याचें कोणतेंही पान उघडा, कुठेंही दृष्टिक्षेप करा, तुमचें स्वागत करण्यासाठीं रसराज शृंगार तेथें तयार असलेला अवश्य दिसून येईल. यादवसैन्याच्या शस्त्रास्त्रांचा खणखणाट, या काव्यांत मदनराजानें चालविलेल्या अनेक मधुर व कामोद्दीपक सुस्वर वाद्यांच्या आवाजापुढें अत्यंत कर्णकटु वाटेल. रणांगण आणि त्यावरील भीषण व आर्त शद्बांऐवजीं जेथें तेथें 'शृंगाराचा कड–वळियाः कीं मदनाचा जावळिया : कीं प्रमदाचा बळिया : अडलाऊं तो (२६४)' अशा वसंताचीं उद्यानें व त्या ठिकाणीं

जो आइकिलेयां होय हृदयस्फोटुः विरहियांसी

अशा ' कामकटकांचा गजबजाटः तैसा कोकिलांचा कलकलाटः ( २५८ ) मात्र वाचकांना ऐकावयास मिळेल. सारांश, प्रस्तुत काव्यांतील प्रधान रस शृंगार असून त्यांतही विप्रलंभ शृंगाराचेंच आधिक्य आहे. शृंगाराचा आणि त्यांतही विप्रलंभ शृंगाराचा इतका परिपोष या काव्यांतून होण्याचें कारण अगदीं उघड असावें. शृंगारसप्रधान अशा संस्कृत काव्यांचा अभ्यास, आणि सौंदर्यसंपन्न व गुणवान पत्नीशीं समागम भास्कराला आपल्या पूर्ववयांत लाभला असावा. त्याच्या आयुष्याच्या पहिल्या अंकांत आनंदाच्या फुलांनीं आच्छादिलेल्या भूमीवर त्यानें सदैव कालक्रमणा केली असावी. पण विरक्ती उत्पन्न होऊन महानुभावपंथ स्वीकारण्यापूर्वी या सर्व स्वर्गीय सुखांना तो आंचवला असावा. त्याची सहधर्मचारिणी त्याला सोडून स्वर्गाकडे चालती झाली असावी. जिच्या पुण्यमय व सुखद संगतींत आयुष्याचा गोड तारुण्य काळ त्यानें व्यतीत केला त्या प्रेमळ पत्नीचें विस्मरण भास्करास होणें अशक्य होतें. ती आतां केवळ स्मृतिशेष झाली होती असें दिसतें. पण तिच्या मधुर स्मृतीचे धागे मनांतल्या मनांत उकलून त्यांचा पुन्हा सुंदर पट विणण्याच्या कल्पनेतच त्याचा बराचसा काळ जात असावा. निदान शिशुपालवधाच्या लेखनकालीं तरी भास्कराच्या त्या पूर्वस्मृति ताज्या असल्या कारणानें त्यांचें प्रतिबिंब या काव्यांत पडणें अपरिहार्य होतें. माघाचें शिशुपालवध डोळ्यांसमोर ठेवल्यामुळें प्रस्तुत काव्य शृंगाररसप्रधान झालें, हें तर खरेंच. पण त्याबरोबर कवीच्या पूर्व आयुष्याची व तत्कालीन स्वानुभूत विरहाची पडछाया त्यांत पडलेली असावी हेंही खरें. किंबहुना या कारणामुळें काव्य अधिक हृदयांदोलक झालेलें आढळून येतें. शृंगाररसाच्या किंवा विरहावस्थेच्या वर्णनाचा कोणताही प्रसंग असो, त्याच्याशीं कवीचें पूर्णपणें तादात्म्य झाल्याचें दिसून येईल. त्याचें अंतःकरण त्यांतील ओळीओळींतून ओतलेलें आहे असा भास झाल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या वर्णनांनीं सर्व जगाला नवीन विरहावस्था प्राप्त होईल याची जाणीव खुद्द कवीला होती, हें त्याच्या

वैदर्भी प्रियालाप आठवीः हा भाओ न बोले भास्कर कवी
जगासी विरहाऽवस्था होईल नवीः तुझेनि रसाळपणें ॥ ८५१ ॥

या उद्गारांवरून दिसून येतें. सारांश काव्यांत वीररसाला गौण स्थान मिळालें असून शृंगारालाच प्राधान्य प्राप्त झालें आहे. त्यांतही विप्रलंभ शृंगाराचें प्राबल्य अधिक दिसून येतें; आणि या विप्रलंभ शृंगाराच्या वर्णनांत कवीच्या स्वानुभवानें तेज प्रतिबिंबित झालें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

## बाइदेवबासाचा अभिप्राय.

शिशुपालवध काव्य शृंगाररसपरिपूर्ण असून तें विरक्तांनीं वाचावयास योग्य नाहीं, असा अभिप्राय महानुभाव पंथाचे त्यावेळचे आचार्य व भास्कराचे गुरुबंधु बाइदेवबास यांनीं तेव्हांच दिला होता. तो अभिप्राय लक्षांत ठेवण्यासारखा असल्यामुळें येथें देत आहे. शिशुपालवध पूर्णपणें लिहून झाल्यानंतर अवलोकनासाठीं भास्करानें हा ग्रंथ बाइदेवबासासमोर ठेवला. त्याप्रमाणें त्यांनें तो समग्र वाचून काढला. भास्कराची अलौकिक बुद्धिमत्ता व कवित्वशक्ति पाहून त्यांस अत्यंत आनंद झाला. तथापि त्यांत शृंगाराचें वैपुल्य दिसून आल्यामुळें "भटो, हा ग्रंथु निका जाला परी निवृत्ताजोगा न्हेचिः हा शृंगारियां प्रवृत्तांजोगा जाला," असा आपला मार्मिक पण स्पष्ट अभिप्राय त्यानें दिला. ही आख्यायिका मूळ स्वरूपांत ३ ऱ्या प्रकरणांत ( पृ. ५३ ) आलेली आहे. ती वाचकांनीं पहावी.

## साती ग्रंथांत स्थान.

या ठिकाणीं एक प्रश्न मात्र विचार करण्यासारखा आहे. शिशुपालवध काव्य श्रीकृष्णगुणवर्णनपर आहे ही गोष्ट खरी, पण त्यांत इतर रसांपेक्षां शृंगाराचीच लयलूट अधिक असल्यामुळें विरक्त लोकांनीं तें वाचण्यालायक नाहीं. बाइदेवबासानें तर तसा आपला स्पष्ट अभिप्राय दिल्याचेंही आपण नुकतेंच पाहिलें. इतकें असूनही महानुभाव महंतांनीं या काव्याला आपल्या पवित्र साती ग्रंथांत स्थान दिलें आहे, हें कसें? सर्वसंगपरित्याग करून संसारापासून अलिप्त राहूं इच्छिणाऱ्या वीतरागी संन्याशी लोकांचा हा पंथ. त्यांना शृंगारमत्तमिलिंद श्रीकृष्णाच्या संभोगक्रीडादिकांच्या वर्णनाची बूज ज्यांत अधिक आहे असा हा

ग्रंथ आपल्या साधनमार्गांत कसा उपयोगी पडणार? स्वयंपाकगृहांत तयार होत असलेल्या स्वादिष्ट पक्वान्नांच्या सुवासानें कोणाच्या तोंडास पाणी सुटणार नाहीं? कामशास्त्रांतील चौऱ्यांशी आसनांची चिंतनिका करीत योगसाधन पाहणें शक्य आहे काय? अर्थात् नाहीं. निदान सामान्य लोकांना तरी या गोष्टी शक्य नाहींत. ज्या गोष्टींपासून अलिप्त राहण्याची मनाची इच्छा, त्या गोष्टींचें दर्शन तर काय, पण कल्पनाही त्याज्य असते. मनुष्य त्यांना नेहमीं टाळण्याचा प्रयत्न करीत असतो.–नव्हे आपल्या इष्ट ध्येयप्राप्त्यर्थ त्यानें तसें करणें अत्यंत आवश्यक होय. सामान्य लोकांना लागू पडणारा असा हा व्यवहारांतील नेहमीं अनुभवाला येणारा दंडक आहे. तो शिशुपालवधाला लावून पाहिला तर या काव्याला महानुभाव महंतांनीं आपल्या पवित्र साती ग्रंथांत स्थळ द्यायचाला नको होतें, असेंच कोणीही म्हणेल. निदान माझें तरी तसें प्रांजल मत आहे.

पण प्रस्तुत काव्याला साती ग्रंथांत स्थान देण्याच्या त्यांच्या या कृतीचें अगदींच समर्थन करतां येत नाहीं, असें मात्र नाहीं. पूर्णावतार म्हणून मानलेल्या आपल्या या देवतेचें–भगवान् श्रीकृष्णाचें गुणवर्णन ज्यांत असेल तो ग्रंथ तत्पंथीयांना आदरणीय वाटावा यांत कांहींच आश्चर्य नाहीं. त्यांतही शिशुपालाचा वध ही श्रीकृष्णचरित्रांतली महत्त्वाची कथा आहे. तिच्या सतत चिंतनानें मन भक्तिभावसमुल्लासानें नाचावयास लागतें. अंतःकरणांत भक्तिरसाच्या लाटा हेलावून, त्यांच्या मधुर संगीताच्या प्रत्येक सुरानें, ध्येयमूर्तीच्या स्मृतिपटाचे धागे उकलावयास लागतात. अशी तल्लीनावस्था प्राप्त करून देणाऱ्या कथेचें, श्रवण, मनन, निदिध्यसन, कोण करणार नाहीं? बासुन्दीहूनही गोड असणाऱ्या या मनोरंजक कथेचें, 'कुंकुमरसानें रांगविलेल्या मोत्यांच्या घोसाप्रमाणें दर्शनीय असलेल्या, सुधारसांत घोळलेल्या, चांदण्यांत चुभळलेल्या, चाफ्याच्या परिमलानें दोंदिल झालेल्या व अमृताविषयींही अनावड उत्पन्न करणाऱ्या' मधुरतम शद्बांनीं वर्णन करीत असतां, भास्करानें ठिकठिकाणीं वसंताचीं उद्यानें, कामदेवाचीं मंदिरें व शृंगाराचे पाट निर्माण केले ही गोष्ट खरी. पण हीं सर्व चित्रें भक्तीच्या पार्श्वभूमीवर त्यानें रेखाटलीं असल्यामुळें त्यांतील उत्तानता

मारली जाते असें म्हणावयास हरकत नाहीं. शांत रसांत नाहूनच ही शृंगार-रमणी पुढें आल्यामुळें पाहणाऱ्याच्या अंतःकरणांत ती निर्मळ सौंदर्यभाव जागृत करते. ती अत्यंत सौंदर्यसंपन्न आहे, रूपवती आहे, मोहक आहे; पण तिच्यांत छचोरपणा नाहीं. क्षणोक्षणीं पदर सांवरून आपल्या अंगोपांगांचें प्रदर्शन करणाऱ्या आधुनिक तरुणीचा उच्छृंखलपणा नाहीं. उलट मधून मधून भक्तीचे कारुण्यपूर्ण आर्त निनाद व अंतःकरणांतील परपुरुषमीलनाची तळमळ तिच्या मुखांतून बाहेर पडत असल्यामुळें तिची मूर्ति धीरगंभीर झाली आहे. तिच्या पवित्र प्रतिमेचें, गुणगांभीर्याचें व सौंदर्यसंपदेचें अवलोकन करीत असतां, द्रष्ट्यानें भक्तीच्या वेदीवर उभें राहिलें पाहिजे, एरव्हीं या कथेचा रसास्वाद त्याला पूर्णपणें घेतां येणार नाहीं. ‘ भोग भोगुनि ब्रह्मचारी ’ राहणाऱ्या नटधारी श्रीकृष्णाच्या लीलांचें रहस्य समजून घेण्याला श्रोत्यानें किंवा अभ्यासकान आपला दृष्टिकोण बदलला पाहिजे. आणि इतकें करूनही जर या भक्तिरसमिश्रित श्रृंगारानें अंतःकरणांतील क्षुद्र विकार चेवतील तर यमनियमांनीं त्यांचें दमन करणें हाच खरा साधनमार्ग होय. या दमनवृत्तीला धडे देण्यासाठीं शिशुपालवधांतील शृंगार साह्यभूत होतो असें म्हणण्यास काय हरकत आहे ? त्याज्य विषयांचें चिंतन करून त्यांना लाथाडण्यांतच खरा अभ्यास होईल. रानावनांत राहून ब्रह्मचर्यव्रताचें परिपालन केल्यानें विषय मारले जातात असें मुळींच नाहीं. त्यामुळें विषयाविषयीं अनावड उत्पन्न होत नाहीं. तसें असतें तर ऋष्यशृंगाला गलंडऋषि फसवूं शकले नसते. सारांश इंद्रियदमनाचा खरा मार्ग उद्दीपक वातावरणांत वावरूनच चोखाळतां येतो.

“ विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः ”

हें महाकवि कालिदासानें दीड हजार वर्षापूर्वी व्यक्त केलेलें विश्वव्यापी तत्त्व खरें आहे. या दृष्टीनें शिशुपालवधांतील शृंगार इष्ट ध्येयसिद्धीला साधनीभूत होत असल्यामुळेंच तत्कालीन दूरदृष्टि महंतांनीं या ग्रंथास आपल्या पवित्र साती ग्रंथांत स्थान दिलें असावें, असा तर्क करण्यास काय हरकत आहे ? एरव्हीं दुसऱ्या एखाद्या मार्गानें प्रस्तुत कृत्याची संगति लावणें शक्य दिसत नाहीं. शिशुपालवधांतील केवळ काव्यगुणांमुळें त्याला तें स्थान मिळालें असावें

अशी कल्पना सयुक्तिक होणार नाहीं. कारण कोणत्याही ग्रंथाचा धार्मिक ग्रंथ म्हणून पुरस्कार व्हावयास केवळ त्यांतील काव्यगुण पुरेसे होत नाहींत. परमेश्वरगुणवर्णनाची, ईश्वरोपासनेची, धार्मिक नीतिनियमांची यांपैकीं कशाची तरी पार्श्वभूमि त्या ग्रंथाला असावी लागते. अशा प्रकारची पार्श्वभूमी–पण भक्तिपूर्ण शृंगारछटांनीं अंकित झालेली–प्रस्तुत काव्याला आहे आणि म्हणूनच महानुभावांच्या प्रवित्र साती ग्रंथांत त्याला उच्च स्थान प्राप्त झालें आहे. खुद्द भास्करभट्टाला देखील

हा शिशुपाळ वधु : आईकतां **तुटे भवबंधु**
**जीवां होए प्रबोधु : परमतत्वांचा** ॥ १०८७ ॥

असेंच वाटत होतें, हेंही येथें लक्षांत घेतलें पाहिजे.

## इतर रस

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून प्रस्तुत काव्यांतील प्रधानरस शृंगार–विप्रलंभ शृंगार–असून तो भक्ति किंवा शांतरसानें मिश्रित अशा स्वरुपांत भास्करानें वर्णन केलेला आहे, ही गोष्ट वाचकांच्या ध्यानांत आली असेलच. किंबहुना कोणत्याही कवीच्या काव्यांत शृंगाररस असलाच पाहिजे, त्याशिवाय त्याला मनोहारित्व प्राप्त होत नाहीं असेंच कवीचें मत होतें, हें त्याच्या ‘ साहित्याचेनि परिमळें : **शृंगाराचेनि** मेळें : प्रबंध होती मातावळें : कवी–जनांचे ’ ( १५ ) या ओवीवरून सहज दिसून येईल. शिवाय इतरत्र त्यानें आपल्या या काव्याला

म्हणौनि शिशुपाळवधी कथा : जे **भक्तिरसाची था**

भक्तिरसाचें सरोवरच म्हटलें आहे. यावरून शृंगार व भक्ति हे दोन या काव्यांतील प्रमुख रस होत असें खुद्द कवीचेंही मत असल्याचें सुस्पष्ट होतें. पण या व्यतिरिक्त इतर रसांचाही यांत परिपोष झाला आहे हें विसरतां कामा नये. प्रस्तुत काव्यांतील रसचर्चेस आरंभ करतांना यांत वीररस आहे–पण तो जितक्या प्रमाणांत असावयास हवा होता तितक्या प्रमाणांत नाहीं, म्हणून लिहिलेंच आहे. पण यापेक्षांही विशेष उल्लेखनीय रस हास्यरस होय. सामान्यतः

आपल्या प्राचीन वाङ्मयांत हास्यरसाचा परिपोष फारसा झालेला आढळून येत नाहीं. क्वचित् असल्यास तो शद्बनिष्ठतेपेक्षां कृतिनिष्ठतेकडेच अधिक कल-लेला दिसतो. पेंद्याचें लंगडत लंगडत चालणें, चोरून खाल्लेल्या दहीं-दूध-लोण्यानें श्रीकृष्णाचें सर्वांग भरणें, गोकुळांतील दंपत्यांच्या दाढी-वेणीची गुंतागुंत करून ठेवणें इत्यादि प्रकारांनींच श्रीधरादि कवींनीं श्रोत्यांना हंसविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत उपहास किंवा मार्मिक कोट्या करून साधलेला विनोद जवळ जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. प्रस्तुत शिशुपालवधांत मात्र अशा प्रकारच्या विनोदाचें साम्राज्य सर्वत्र पसरलेलें आढळतें. आगलाव्या नारदाचा उद्धवानें केलेला उपहास, श्रीकृष्ण-रुक्मिणीच्या प्रेमकलहांतील कुटिल व छद्मी भाषणें, जलक्रीडेच्या वेळीं स्वतःच्या ब्रह्मचर्याचा टेंभा मिरविणाऱ्या श्रीकृष्णाची त्याच्या चतुरभाषी बायकांनीं उडवलेली टर, इत्यादि प्रसंग आमच्या विधानाचा पाठपुरावा करतीलच. कवीनें निर्माण केलेल्या हास्यरसाच्या या प्रसगांत उपहास आहे, गालाला खळी पाडणारा सौम्य नर्मालाप आहे, तर कोठें कोठें वाचकांना पोट धरधरून हंसविणारा कृतिनिष्ठ विनोदही पण आहे. कित्येक टीकाकारांनीं भास्करानें वर्णिलेल्या श्रीकृष्ण-रुक्मिणीच्या विनोदांत हलकेपणा वाटतो. उच्च संस्कृतीला तो विनोद शोभण्यासारखा नाहीं असें त्याचें मत आहे. या त्यांच्या विधानांचा प्रस्तुत स्थळीं विचार न करतां काव्यकथाभागांत जेथें त्याचा उल्लेख करूं त्या ठिकाणींच त्यांचा परामर्ष घेऊं एवढेंच येथें सुचवून ठेवितों.

३

## भास्कराचें शास्त्रज्ञान.

भास्कर बुद्धिमान् होता यांत संशय नाहीं. आपल्या विद्यार्थिदशेंत काव्य, साहित्य, व्याकरणादि शास्त्रांचा त्यानें कसून अभ्यास केला होता असें

१. मराठो वाङ्मयाचा इतिहास, खंड पहिला, पान ४३३, लेखक श्री. ल. रा. पांगारकर.

दिसतें. काव्यदेवीच्या मंदिरांत प्रवेश करण्यापूर्वी तिच्या देवडींत बसून त्यानें बरीच तपश्चर्यापूर्वक सश्रम उमेदवारी केली असावी हें त्याच्या ग्रंथांवरून सहज ताडतां येतें. शिशुपालवधकाव्यांतील, आकाशभेदी हिमालयाच्या उत्तुंग शिखरांबरोबर स्पर्धा करूं पाहणाऱ्या त्याच्या कल्पनांचा विलास पाहिला म्हणजे बुद्धि स्तिमित होते, व अंतःकरणाला अननुभूतपूर्व आनंदाचा उपभोग घ्यावयास सांपडतो. उपमा, उत्प्रेक्षा, रूपक दृष्टांतादि अलंकारांनीं भास्करानें आपल्या कविताकन्यकेला इतक्या अप्रतिम नैपुण्यानें शृंगारली आहे कीं, तिला पाहण्यास आलेल्या कोणत्याही उपवधू तरुणानें केवळ एकदोन कटाक्ष-क्षेपाच्या घायासरशींच विद्ध होऊन शृंगारसागरांत पोहण्यासाठीं तिच्या निरंतर संगतीची इच्छा करावी; आणि ती पुरवून घेण्यास काव्यांतील कठीण शद्बांचे अर्थ धुंडाळण्याच्या कष्टमय खटाटोपांतूनही वाट काढण्यास तयार व्हावें. वर्णनाच्या ओघांत वाहून जात असतां या सर्व अलंकारांची कवीनें नुसती गर्दी उडवून दिली आहे. साहित्यशास्त्राच्या आखाड्यांत कसरत करून आपल्या बुद्धीची अंगलट त्यानें बरीच पीळदार बनवली होती, हें त्याच्या काव्यावरून नुसती नजर फिरविल्यानें देखील लक्षांत येईल. परंतु

> आलेयां मुरारी : कैसा उच्छाओ जाला नगरीं
> तो सांगिजैल बोलीं **परिकरीं** : श्रोतेयांसी ( ५८५ )

हा ' परिकर ' अलंकाराचा विशेष उल्लेख साक्षीदार असल्यावर निवळ कल्पने-वर अवलंबून राहण्याचें काय प्रयोजन आहे ? या साहित्यशास्त्राबरोबर काम-शास्त्राचाही त्यानें अभ्यास केला होता, हें विसरून चालावयाचें नाहीं. किंबहुना हीं दोन्ही शास्त्रें परस्परानुबंधी आहेत. एकाची मदत दुसऱ्याला संवर्धित करण्यास बरीच उपयोगी पडते. भास्करभट्टाच्या काव्यांतच या गोष्टीचें आप-णांस प्रत्यक्ष उदाहरण पहावयास सांपडतें. एरव्हीं, साहित्यशास्त्राबरोबरच कामशास्त्राचें अध्ययन आपल्या पूर्व वयांत केलें असल्याशिवाय, रतिसुखाच्या मार्मिक भोक्त्यास साजणारें शृंगारवर्णन भास्करास साधलें नसतें. या तर्काला

> रंगातीए तूं घेई आधोटी : गाए सरीची पडमठीं
> रति-दूतिके तूं सांघ गोष्टी : **कामशास्त्रा**चिया ( ६९७ )

या ओवीनें दुजोरा मिळतो. कामशास्त्राचा हा उल्लेख केवळ वरवरचा आहे; त्यावरून त्या शास्त्राचा कवीचा गाढ व्यासंग असावा असें म्हणतां येत नाहीं, असा आक्षेप कोणी काढल्यास त्याला उत्तर देऊन गप्प बसविण्यासाठीं

ते कांई वाणुं वेधवंती : निर्जिवा पुतळीया पाठीं धांवती
**कामाची आवस्था दाहावी** नीरुती : स्त्रियां होत असे ( ६०९ )

ही कामावस्थेच्या एका सूक्ष्म भेदाचें वर्णन करणारी ओवी पुरेशी होणार नाहीं काय ? किंबहुना उत्कृष्ट काव्यनिर्मितीला साहित्यावरोबर श्रृंगारशास्त्राचेंही ज्ञान अत्यंत आवश्यक असतें, असेंच भास्करभट्टाचें स्पष्ट मत होतें हें

**साहित्या**चेनि परागें ऊटिजे : **श्रृंघारा**चेनि पाणीए न्हाणिजे
तें कवित्व कानीं आइकिजे : महाकवींचें ( ३५९ )

या ओवीवरून मार्मिक वाचकांच्या ध्यानांत येईल असें वाटतें.[२]

वरील वर्णनावरून प्रस्तुत काव्यग्रंथांत, साहित्याच्या परागानें उटलेला व शृंगाराच्या पाण्यानें न्हाऊं घातलेला आपला कल्पनावारु कवीनें सर्वत्र स्वच्छंद रीतीनें भरधांव सोडला आहे, अशी मात्र कोणी कल्पना करून घेऊं नये. प्रसंगविशेषीं राजनीतीच्या वागोऱ्यांनीं त्याला आवरून धरून भास्करानें आपलें समयोचितत्व व तारतम्यही प्रकट केलें आहे. साहित्य आणि कामशास्त्र यांबरोबर त्यानें राजनीतिशास्त्राचाही अभ्यास केला होता, हें

दिग्गजा पांडवा करवीं : रिपूंची अवधी तोडावी
कांटिया कांटी झाडावी : बाहिरी वाहिरी ( ४९४ )

या ओवीवरून स्पष्ट दिसून येतें. ओवीचा उत्तरार्ध आर्यचाणक्याच्या ‘ कंटकेनैव कंटकम् ’ या सुप्रसिद्ध नीतिसूत्राचें रूपांतर असून त्याचा येथें उपयोग करण्यांत भास्करानें कशी चूक केली हें मागें दाखवून दिलेंच आहे. श्रीकृष्ण, बलराम व उद्धव यांच्या खलबतांत प्रत्येकाच्या तोंडीं त्याच्या स्वभावानुसार भास्करानें जीं भाषणें घातलीं आहेत व जे व्यावहारिक दृष्टांत दिले आहेत

२. याच विधानाच्या पुष्ट्यर्थ मागें उल्लेखिलेली ‘ **साहित्या**चेनि परिमळें : **श्रृंघारा**चेनि मेळें : ’ ही ( १५ वी. ) ओवी वाचकांनीं अवश्य पहावी.

त्यावरून ' मंत्रियां दीक्षा-गुरू ' म्हणून कवीनें उद्धवाचें केलेलें वर्णन खुद्द कवीलाच किती यथार्थपणें लागू पडतें हें निराळें स्पष्ट करून सांगावयास नको. भास्करभट्टाच्या राजनीतिनैपुण्याचा विचार विस्तृतपणें दुसऱ्या लेखांकांत केलाच आहे. त्यावरूनही त्याच्या राजनीतिशास्त्राच्या अभ्यासाची ओळख वाचकांना पटेलच.

## भास्कराचा आत्मविश्वास.

प्रस्तुत काव्य लिहिण्यांत कवीचा कोणत्याही प्रकारें व्यावहारिक उद्देश नव्हता, या गोष्टीचा मागें एकदा उल्लेख केलाच आहे. केवळ अंतःकरणांत तुडुंब भरलेल्या श्रीकृष्णप्रेमाला पाट फोडण्यासाठीं, निर्हेतुक भक्तीनें मानसिक समाधान लाभावें म्हणूनच हा एवढा काव्यप्रपंच त्यानें विस्तारला आहे. मनाला वाटलें, म्हणून काव्य गाइलें. ' जीवां होतसे उल्हासुः स्तुतीलागी ' ( १३ ) असें कवि स्पष्टच म्हणतो. त्याच्या मानससरोवरांतून ही पवित्र काव्यगंगा आपोआप निर्माण झाली आणि म्हणूनच तिच्या अत्यंत पवित्र व शीतल जलाचा प्रवाह धीरगंभीर गतीनें पण अस्खलित वाहतांना आढळतो. कोठेंही तो अडखळल्याचा भास होत नाहीं, कीं मुद्दाम जाणुनबुजून पुढें ओढून नेलेला दिसत नाहीं. भास्कराच्या जिव्हाग्रावर वक्तृत्वकला नर्तन करीत होती. साहित्यदेवी व भाषारमणी ऋद्धिसिद्धींप्रमाणें सेवा करण्यासाठीं त्याच्यापुढें हात जोडून निरंतर उभ्या असत. काव्यमय अंतःकरण, श्रीकृष्णभक्तीचा जिव्हाळा, वक्तृत्वकलेची प्रसन्नता, साहित्यदेवीची कृपा व भाषारमणीचा वरदहस्त या गुणसमुच्चयाच्या जलवर्षावानें कवीच्या काव्यकल्पलतेस गोड आणि सुरस फळें आलीं असल्यास नवल नाहीं. आपल्याजवळील या सर्व सामुग्रीची जाणीव कवीला पूर्णपणें होती. त्याचा आत्मविश्वास दांडगा होता आणि म्हणूनच काव्यकथेला आरंभ करण्यापूर्वी

पुन वाचा रसाळा : गर्व सांडवीन कोकिळां
कल्हंसा आवकळा : करीन मी ( २७ )

आपल्या रसाळ वाणीनें कोकिळांचा व कलहंसांचा गर्वपरिहार करण्याची प्रति-

ज्ञाच त्यानें केली आहे! समग्र काव्य वाचल्यानंतर कवीची ही प्रौढी कशी यथार्थ आहे हें कोणालाही दिसून येईल. त्यानें आपल्या काव्यांत वापरलेल्या शद्वांची बरोबरी, कुंकुमाच्या रसानें रंगविलेले मुक्ताफळाचे घोंस देखील करूं शकणार नाहींत. ते सर्व जणुं काय सुधारसांत घोळलेले आहेत, चंद्रकिरणांत चुभळलेले आहेत, चाफ्याच्या परिमलानें सुगंधित झालेले आहेत. अशा सुंदर शद्वसामग्रीनें वर्णन केलेली कथा कशी असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. काव्याच्या प्रास्ताविक भागांत प्रस्तुत कथेचें खुद्द कवीनें केलेलें वर्णन फार बहारीचें आहे. तो म्हणतो 'शिशुपालवध कथा' ही भक्तिरसानें तुडुंब भरलेली तरंगिणी आहे, कैवल्यपथ दाखविण्यासाठीं पाजळलेली ती समई आहे, ती मुक्तिवनितेची दूतिका आहे, ज्ञानांजनाची शलाका आहे, वैकुंठमंदिरावर झळकणारी ती पताका आहे, शांत रसानें सिंचलेली ती ज्ञानलता आहे, विवेकाची सौभाग्यदेवताच मूर्तिमंत होऊन या कथेच्या रूपानें अवतरलेली आहे. किंवा

प्रबंध वसंतोची कोकिळा : जीव–चकोर–संजीवनी चंद्र–कळा
कीं निम्होळें संसार–वाटेची विश्रामशाळा : आर्त्तजनांलागी (३३)

या शद्वांत खुद्द कवीनेंच केलेलें त्याच्या काव्यांचे वर्णन कोणाला मोह पाडणार नाहीं? अशा सुंदर व गोड शद्वांनीं काव्याची प्रस्तावना करून नंतर कवीनें मूळ कथा सांगण्यास आरंभ केला आहे.

४

## काव्यपरिचय

नवरत्नांच्या ठेव्याप्रमाणें, विश्वकर्म्यानें कमाविलेल्या मेरूच्या गाभ्याप्रमाणें किंवा मुक्तिमंदिराच्या दारवंठ्याप्रमाणें शोभणाऱ्या सुधर्मासभेत आपल्या परिवारासह श्रीकृष्ण एकदां बसले होते. इतक्यांत, ज्यांच्या अंगांतील जानव्याची लुळी झळकत असून,ज्यांच्या पिंगट जटेची प्रभा चोहोंकडे फांकली आहे

३. निर्जल अरण्य. पहा– ऋद्धिपूरवर्णन ओवी ३७ (टीप) श्री. य. खु. देशपांडे यांनीं संपादिलेली प्रत.

असे नारदमुनि आपल्या हातांतील विपंचींतून गायत्री मंत्राचे आलाप काढीत काढीत अकस्मात् त्या ठिकाणीं आले. भक्तवत्सल भगवान् व भक्तशिरोमणि नारद यांच्या भेटीचा हा प्रसंग भास्करभट्टानें फार कौशल्यानें रेखाटला आहे. षोडशोपचारें पूजा केल्यानंतर 'माणुसपणाची बुंथी' घेतलेले श्रीकृष्ण म्हणतात, "संसाराच्या बंदिशाळेंत पडलेल्या आमच्यासारख्या सांसारिकांना आपल्यासारख्यांचें दर्शन, पुण्याच्या कोटी प्राप्त करून देणारें असतें आणि म्हणूनच आपला आजचा हा आगमनप्रसंग मोठा शुभसूचक आहे. आजपासून यादवांचे पुढील दिवस फार आनंदांत जातील. कारण

चंद्र निववी जगातें: मेहो वरुषे अमृतातें
तेवीं साधु आपणयांतें: दाखवीती स्वभावतांचि ( ७१ )
महानुभावांचेनि मेळें: लाहिजेति आनंदाचीं सोनकेळें
मग मनोरथवेलीचीं फळें: हातें तोडिजेती ( ७२ )

निजानंदांत नित्य तृप्त असणाऱ्या आपल्यासारख्या साधूंचा पाहुणचार आम्हीं काय करावा? पण एकदा यादवांना आपल्या पंक्तीचा लाभ देऊन पावन केलें पाहिजे." प्रत्यक्ष परमेश्वराच्या तोंडून असे शब्द ऐकतांक्षणींच नारदाचें प्रेमळ अंतःकरण गहिंवरलें आणि त्याच्या मुखांतून श्रीकृष्णस्तुतीची वाग्गंगा वाहूं लागली. आपला नम्रपणा प्रकट करून नारद म्हणतो, "देवाधिदेवा! तुझ्या या किंकराला एवढा मान कशाला? देवांच्या उष्ट्या पत्रावळी काढण्याचेंच– त्यांची सेवा करण्याचेंच माझें ब्रीद आहे. तें तूं दवडूं पाहतोस काय? परमेश्वरा!

अगा जी हृषीकेशी : आझुइं किती चाळवीसी ( ७८ )

असा आणखी किती दिवस तूं आम्हांस चाळविणार? तूं चैतन्यगिरिदुर्गीचा राजा आहेस. देवाचा देव असा तूं, ज्याचें सैन्य अत्यंत बलिष्ठ आहे अशा संसाराचा ठाव फेडावयास जगांत अवतरला आहेस. तुला प्रत्यक्षादि प्रमाणें ओळखूं शकत नाहींत, अठरा पुराणांचे डोळे पाहूं शकत नाहींत, आणि ज्या वेदांची आम्हाला मोठी आशा ते देखील तुला शोधतां शोधतां थकून गेले. तुझ्या चरणांची निरंतर सेवा करणारी प्रत्यक्ष लक्ष्मी, पण तिच्याशीं तूं चुकूनसुद्धां संभाषण केलें नाहींस. तिला पूर्णपणें विसरून गेलास. पण एका वेळेला

तुजची प्रवृत्ति उपनली : मग गर्भसंभूति जाली
महामाएसी ( ८९ )

तिच्या गर्भांत जीवतत्त्व मिळवून तूं तिचें[४] आठांगुळें संपादिलेंस. त्यामुळें ' उपनलें एकें वेळें : अवघेंची ' ( ९० ) सर्व जग एकदम निर्माण झालें. त्याची काळजी घेण्यासाठीं प्रकृतीला सृष्टिदेवीला–तूं दाई नेमलेंस. तिनें या बालकांचें मोठ्या वात्सल्यानें संवर्धन केलें. इंद्रियांचीं पांचपुडी आंगडीं लेवविलीं व विषयांचें बाळलेणें अंगावर घातलें. तीं बालकें मग कर्मफलाच्या अंगणांत रांगायला लागलीं. त्या वेळीं त्यांना राखण्यासाठीं, या मायाभूमीच्या पसाऱ्यावर, परमेश्वरा ! तूं लिंगदेहाचीं धवलारें उभारलीस. आंतबाहेर वावरावयास त्या धवळारांना इंद्रियाचीं द्वारें निर्माण केलींस. कोठें कोठें, पंचमहाभूतांच्या समुदायांत त्रिगुणांचें मिश्रण करून स्थूलदेहाचीं तण्हारें तूं बांधलींस, आणि अशा तऱ्हेची ही सृष्टि सकळ जीवजाताला अर्पण केलीस. पण देवा ! तुझ्याशिवाय या सृष्टीची आम्हांला काय किंमत आहे ? तूं स्वतः आमची कधीं विचारपूस, काळजी कांहींच करीत नाहींस; मग आम्हीं कोणाला शरण जावें बरें !

तुवां स्नेह सांडीलें : तरी जळो हें जियालें
आणीकें म्हणितलें आपलें : तें कांई करावें ? ( १०१ )

तूं आमचा पिता झालास; पण कधीं लाडवून तूं आम्हांस बोलवीत नाहींस. म्हणून मनाला जें दुःख होतें तें वर्णन करून सांगतां येत नाहीं. तुला शोधतां शोधतां

डोळे कुहिजले वाट पांतां : पुण तुज साम्य न दिसे अनंता
ऐसेंनि काळ गेले बहुतां : तुवांवीण " ( १०४ )

अशा रीतीनें जगदुत्पत्तीची कथा सांगून नारदानें किंवा पर्यायानें भास्करभट्टानें जो भक्तिरसाचा पाट वाहविला आहे त्याचें पावित्र्य काय वर्णन करावें ? रसिकांनीं एकदा त्यांत स्वतःच न्हावें म्हणजे ठीक होईल.

४. अष्टमांगल्य. गर्भाधानसमारंभ वेळेवर न झाल्यास हा समारंभ, स्त्री गर्भार राहिल्यावर तिच्या आठव्या महिन्यांत करितात.

## उद्धवनारदांचा हास्यविनोद

यानंतर उद्धवनारदाच्या विनोदाचा प्रसंग भास्करानें घातला आहे. उद्धव म्हणतो, " नारदा ! तुमचा भक्तिभाव निका आहे. देवांनीं आतांच तुमची आठवण काढली होती. ते म्हणाले कीं, आजकाल नारद इकडे येत नाहींत ! काय कोठें लावालाव्या उत्पन्नच होत नाहींत कीं काय ? तेव्हां मीं म्हटलें " छे हो ! नारदांनीं आतां हा आगलावेपणा सोडून दिला आहे. मी असें म्हणतों तोंच तुम्ही आलां. तुम्हाला येतांना पाहतांच माझी छाती धडधडूं लागली. तुम्ही आतां काय सांगणार आहां कांहीं कळत नाहीं. खरंच सांगा नारदा ! आज कोणत्या कामासाठीं आलांत ? यादवांच्या राज्यांत कोठें भांडणें वगैरे तर मुळींच होत नाहींत. त्यामुळें तुमचा काळ अगदीं शुष्क जात असेल नाहीं ? जेवण देखील रुचत नसेल ? अगदीं उपवास पडत असतील ? " उद्धवाच्या या प्रश्नाला नारद उत्तर देतात"उद्धवा ! आतां तुम्ही आम्हास कळीलावेच म्हणतां, मग बोलावें तरी कशाला ! आपल्या ठिकाणींच गप्प कां बसूं नये ? पण तुमच्यावर रागावून आम्ही उगे राहिलों तर आमचेंच पोट फुगतें. काय गंमत आहे पाहा. आपल्या रागिटपणानें जगांत भांडणें होतात आणि म्हणतात मात्र मला, कीं या नारदानें आगलावी केली म्हणून.

एक वेळ मी कैलासां गेलां : तवं म्हणती कळिलावा आला
टाटाउनि बांधा वहिला : एऱ्हवीं जाइल हा ( १३१ )

त्या दिवसापासून विरक्त होऊन ' मी जालां तापसी.' पण खरेंच सांगावयाचें तर ' चहाडाचाहाडीची गोडीः ब्रह्मविद्ये नाहीं फुडीः स्वर्ग न लाहे एकी कवडीः तें पाहुनी ' ( १३३ ) पण आतां शरीर म्हातारें झालें. म्हणून मणिकर्णिकेला ' हरि हरि ' करीत असतां एक दिवशीं असें झालें कीं—

अक्षे तृतीयेच्या दीवसीं : विश्वेश्वरापासीं
बहुतें मारीलें तापसी : एणें शीशुपाळें ( १३९ )

त्या वेळीं जीव वांचविण्यास मीही पळालों. मध्येंच निऱ्या सुटल्या होत्या. त्या एका हातानें धरून पळूं लागलों. आतां माझी फजिती मीच काय सांगूं !

‘ एऱ्हवीं तुझी आणः भला पळालां ( १४५ ) ’ नंतर हा सर्व फजितवाडा ज्यानें मांडला त्या शिशुपालाचा वध करण्याची श्रीकृष्णाला विनंती करून नारदानें त्याचा पाहुणचार घेतला. रात्रीं त्यानें गावयाला सुरवात केली. त्याचें गाणें इतकें गोड होतें कीं, तें ऐकण्यासाठीं ‘ चंद्रिचा हरिण मृत्युलोकांः एओ पातसें ’ ( १६८ ) मैफल अशी रंगली कीं, काळ कसा गेला कांहीं कळलें नाहीं. ‘ तवं जेंगट्ट पीटीनलेंः मध्यरात्रीचें ’ तें ऐकतांच श्रीकृष्ण रुक्मिणीच्या मंदिराकडे वळले.

## कृष्ण-रुक्मिणीचा प्रेमकलह.

यानंतर श्रीकृष्ण-रुक्मिणीच्या प्रेमकलहाचा विनोद व शृंगाररसपरिपूर्ण प्रसंग आहे. बऱ्याच दिवसांत देवाचें आगमन न झाल्यामुळें त्रिदर्भाची बाळी रुसली होती. इतक्यांत श्रीकृष्ण तेथें आले. त्यामुळें तर तिचा राग अधिकच वाढला. ती कृतककोपानें अधिकच फुगून बसली. लहानमोठ्या सर्व सख्यांनीं तिची समजूत घातली. पण तिची बुझावणी होईना. शेवटीं कृष्ण म्हणाले, “ यांनीं आतां आपलाच हेका चालवूं नये. पड न घेतल्यानें आम्हांस मात्र निष्कारण उशीर होईल. ” हे सूचक शद्ब ऐकतांच रुक्मिणी तावातावानें उठून बसली. तिच्या त्या अवस्थेचें ‘ जैसी शृंगाराची दाटी उठविलीः मदनमंत्रें ( १८६ ) लावण्याचा सरोवरींः जेवि कमलाचें पातें थरारींः तेवि अधरू कांपे भारीः प्राण कापांचा ’ ( १८७ ) हें वर्णन फार सुंदर आहे. रुक्मिणी रागावली होती. पण तिचा तो राग उसना होता. आपल्या अंतःकरणांत जागृत झालेला शृंगारभाव लपविण्याचा तिनें फार प्रयत्न केला, परंतु

चोळी ताणताए तेणेंगुणें : तो भाओ लपवे ना ( १८९ )

तरी तिनें नमतें मात्र घेतलें नाहीं. तेव्हां देव देखील विनोदानें म्हणाले, “ ही ब्याद पाठीमागें लावून घेतली हीच आम्हीं मोठी चूक केली. विषयाचा आम्हाला नेहमीं कंटाळा, म्हणून मागें ऊर्वशी आयती चालून आली होती, तिला परत लाविली. पण त्या सुदेव भटजीनें इची खूपच स्तुति केली. म्हणून हिला वरलें. पण इच्यांत असा एकही गुण नाहीं, कीं ज्याच्या लोभानें आम्ही

इचा उपभोग घ्यात्रा ‘ एरव्हीं ऐसीं माकडें: आम्हां कां लागतो ” ( २०४ )

श्रीकृष्णानें आपणाला माकड म्हटलेलें ऐकतांच रुक्मिणी म्हणाली, “ मला यांनीं माकड म्हटलें, पण यांना स्वतःची सय आहे का ?

वाढीनला गोकुळीं: म्हणौनि कव्हणी लेकी नेदीचि आपुली
तया उर्वशी स्वयंवरा आली: वदतां लाज नाहीं ( २०६ )

खरोखर विचार केला, तर दादा फार शहाणा होता. माझ्यावरील प्रेमामुळे त्यानें ‘ किती मोडा केला येयां देतां.’ रुक्मिणीच्या तोंडचे हे शद्ब कानीं पडतांच कृष्णाची चेष्टाबुद्धि पुन्हा जागृत झाली. ते म्हणतात, “ खरंच तुझ्या दादाचं तुझ्यावर फार प्रेम होतं, ‘ तरि थोर चुकलीसी : जें तोची वरावा ( २१३ ) ’ मग तूं त्यालाच ( रुक्मीलाच ) कां माळ घातली नाहींस ?

आम्ही कसोटेकार भीकारी: तो राजकुमरू तूं सुन्दरी
दोघे नांदतां सेजारीं : भलीं दीसतीं ते ( २१४ )

तुझा आणि त्याचा ( रुक्मीचा ) जोडा काय पण झकास दिसला असतों ! ” आपल्या पत्नीची कृष्णानें केलेली चेष्टा फार मार्मिक आहे. असो. यापुढें त्याचा कलह बराच वेळ टिकला. पण कुमुदहंसिनीच्या ‘ नाहीं तुझेनि पाडें सीहाणी : हे चोळी गेली उतटौनि: तैंचि मियां जाणीतलें ( २२५ ) ’ या भाषणानें वरमून जाऊन ती तात्काळ आपल्या प्राणेश्वराच्या पाया लागली आणि ‘ मम संभोगसुखें प्रकाळली: रात्रीं ते.’

## श्री. पांगारकरांचा आक्षेप.

मागें एका ठिकाणीं उल्लेखिल्याप्रमाणें, श्री. पांगारकरांना या शृंगारचेष्टेंत प्रौढी दिसत नाहीं. ‘ मराठी वाङ्मयाचा इतिहास ’ ( खंड १ ) या आपल्या पुस्तकाच्या ४३३ व्या पृष्ठावर वरील प्रसंगासंबंधीं ते लिहितात, “ नर्मभाषणाचा जो प्रकार वर वर्णिला आहे त्यांत मर्यादेचें उल्लंघन झालेलें आहे. या हास्यविनोदांत हल्केपणा दिसतो, उच्च संस्कृतीला हा विनोद शोभण्यासारखा

५. आपल्या पत्नीची अशी थट्टा करण्याची पद्धत वऱ्हाडांत अजून आहे. त्यामुळें कित्येकांना वाटला त्याप्रमाणें हा अनुचित विनोद आहे असें मानावयाचें कारण नाहीं.

नाहीं. हा दोष अर्थात् कृष्ण-रुक्मिणीचा नाहीं, भास्कर कवीचा आहे ! तशांत कृष्ण-रुक्मिणी म्हणजे उपास्य देव ! मायबापांचा शृंगारविनोद आधीं वर्णन करणें हा दोष, व असल्या हलक्या भाषेनें तो सांगणें हा तर महादोष आहे."

वरील आक्षेप **हरिभक्तपरायण** पांगारकरांनीं काढलेला आहे एवढी एकच गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्याला उत्तर देण्याचें कांहीं कारण आहे, असें रसिकांना खास वाटणार नाहीं. त्यांच्या अभिप्रायांत मार्मिक टीकेपेक्षां सोंवळेपणाची झांकच अधिक पडलेली दिसून येते. वरील हास्यविनोदांत हलकेपणा कसा आहे, उच्च संस्कृतीला तो विनोद शोभण्यासारखा कां नाहीं, आम्हांस कांहीं कळत नाहीं ! शृंगाररसतरंगिणींत पोहणाऱ्या, मोकळ्या मनाच्या तरुण-तरुणींचा, पति-पत्नींचा तो विनोदप्रसंग आहे. यांत मर्यादेचें उल्लंघन कोठें झालें ? युवावस्थेंतील नवरा-बायकोनीं, विशेषतः पत्नीनें पतीशीं खुल्या दिलानें बोलण्यांतच मर्यादातिक्रमण, त्यांच्या मोकळ्या विनोदांतच हलकेपणा किंवा अप्रौढी जर श्री. पांगारकरांना वाटत असेल तर गोष्ट निराळी. चार भिंतींच्या बंदिशाळेंत बायकोनें नवऱ्यासमोर अगदीं नमून वागण्यांत, त्याच्या लहरीप्रमाणें आपल्या भाषणाचा रोख ठेवण्यांतच सारी प्रौढी व उच्च संस्कृति सांठविलेली आहे, अशा मताच्या रसिकाला भास्करानें वर्णिलेला मोकळा हास्यविनोद कसा आवडणार ? हा दोष भास्कर कवीचा नाहीं, तो टीकाकाराच्या विशिष्ट मनोरचनेचा आहे. वास्तविक पाहतां 'फुन चोळी ताणताये जेणें : तो भाव लपवेना' ( १८९ ) 'हे चोळी गेली उतटौनि' ( २२५ ) इत्यादि वाक्यांनीं बुजून जाण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं. श्रीकृष्ण-रुक्मिणी उपास्य दैवतें असलीं तरी जगांत वावरणारीं माणसेंच होतीं. निदान सामान्य जनांसारखें आचरण ते करीत. त्यांचा शृंगार, भक्तिभावानें प्रेरित होऊन एखाद्या रसिक भक्तानें वर्णन केल्यास काय बिघडलें ? शिवाय हा प्रसंग भास्करानें केवळ वैषयिक पार्श्वभूमीवर चितारलेला नाहीं. उलट 'जीवा भेल्हवनें निमिखा एकाः देओ पांतुसें' ( १७२ )

उठीं वो उठीं वहीली : लागी देवाचां चरणकमलीं
एकी एकी घडी तुटली : तें कव्हणा मागसी ? ( २२३ )

इत्यादि ओव्यांवरून त्याच्या मनाच्या आध्यात्मिक उत्कटतेची चांगलीच साक्ष पटते. मोरोपंताच्या मंत्रभागवतांतील श्रीकृष्ण-गोपींच्या रासक्रीडेचें समर्थन करतांना " अर्वाचीन काळची मंडळी आपल्या पापमय चष्म्यानें या रासक्रीडे-कडे पाहतात. वामन दाजी ओकांसारख्या रसिक पंडितालासुद्धां रासक्रीडेच्या आर्यांवर टीपा देतांना संकोच वाटावा व इंग्रजांच्या बॉलचें स्मरण व्हावें हें कशाचें लक्षण आहे ? शुकाचार्य, एकनाथ, तुकाराम, शिवकल्याण, मोरोपंत असे संत ज्या रासलीलांचें वर्णन करितांना प्रेमानें विरघळून जातात, त्यांचें नांव निघाल्याबरोबर आमचीं सोंवळीं ( ? ) माणसें भयविव्हल होतात[६] ! ! ! " श्री. पांगारकरांनीं चोवीस वर्षांपूर्वी काढलेल्या या उद्गारांची त्यांना प्रस्तुत स्थळीं आठवण करून दिली म्हणजे त्यांच्या आक्षेपाला उत्तर देण्याचें अर्धें-अधिक काम अनायासेंच आटोपेल असें वाटतें. भास्कराचा शृंगार क्वचित् उत्तान कोटीला गेलेला आहे हें नाकबूल करतां येत नाहीं. पण एवढ्याचमुळें त्याच्या हास्यविनोदाला हलकेपणा आला आहे, असें म्हणणें सोंवळेपणाचें वाटतें. शिवाय या प्रसंगांतील भास्कराच्या भाषेला ' हलकी ' म्हणणें तर कोणाही रसिकाला मान्य होणार नाहीं. " पंतांच्या काव्यांत शृंगाराचा अतिरेक कोठेंही झालेला नाहीं, तथापि ' प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी ' ( केका ७ ) असे कांहीं चरण घेऊन त्यावर टीका चाललेली पाहण्यांत येते. संस्कृतांतलीं मालतीमाधवासारखीं नाटकें मुलांमुलींना कॉलेजां-तून शिकविण्यांत येतात, व बायरन्‌सारख्या भ्रष्ट इंग्रजी कवीच्या काव्यांतही गुरुशिष्य आनंदानें पोहतात, पण बिचाऱ्या मराठी कवीच्या काव्यांत ' कुच ' व ' रतिसुख ' हे शब्द दृष्टीस पडले कीं कित्येकांना हिंव भरतें ! [७] " असे उद्गार काढणाऱ्या पांगारकरांना ' चोळी ताणताये, ' ' मातें माकड केलें एणें ' ' चोळी गेली उतटौनि ' ' संभोगसुखें प्रकाळली ' या शब्दप्रयोगांत हलकेपणा वाटावा यांत आश्चर्य नाहीं काय ? सारांश भास्कराची भाषारमणी शृंगाररसांत

६. मोरोपंतांचें चरित्र व काव्यविवेचन ( ल. रा. पांगारकर ) पान ४२३

७. मोरोपंतांचें चरित्र आणि काव्यविवेचन, पान ५७३.

न्हालेली आहे, पण ती हलकी मात्र नाहीं. तिच्यावर ग्राम्यत्वाचा शिक्का मारल्यास शृंगार व बीभत्स रसांत मुळींच फरक राहणार नाहीं असें आम्हांस वाटतें. रासक्रीडेप्रमाणें या प्रसंगाकडेही श्री. पांगारकर रसिकाच्या दृष्टीनें पाहतील तर आपलीं विधानें चुकीचीं आहेत असें त्यांना खात्रीनें आढळून येईल.

## द्वारकावर्णन

आपण पुन्हा कथेचा धागा हातांत घेऊं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्रीकृष्णानें नारदाला पाठवणी दिली व बिदा केलें. तोंच धर्मराजाकडून राजसूययज्ञासाठीं श्रीकृष्णाला बोलावणें आलें. युधिष्ठिराचा निरोप घेऊन येणाऱ्या वीरचूडानें काय काय पाहिलें याचें वर्णन देतांनाच कवीनें द्वारकेचें, तदंतर्गत भागांचें व तेथील उपवनांचें वर्णन केलें आहे, तें फारच छान उतरलें आहे. साहित्याच्या पाण्यांत न्हालेला कवीचा कल्पनावारु येथें भरधांव धांवतांना आढळतो. जरासंधादिकांच्या भीतीमुळें समुद्रांत बसविलेल्या द्वारकेचें वीरचूडाला दुरून दिसलेलें

ना तरि दिव्य तेजाची मांदुस उघडली : कीं विश्व प्रकाशाची पेटी फुगली
कीं नव-रत्नांची खाणी लागली : समुद्रामाजी ( २३८ )
कीं रावणाचेनि भुजाबळें : कैलास तेज आंदोळलें
तें व्याहालेपणें महेशें लपविलें : समुद्रामाजीं ( २३९ )

हें दृश्य मनोहर आहे. द्वारकेभोंवतीं नाना प्रकारचीं वनें उपवनें होतीं. संभोग करून दमलेल्या राजकुमारींचा जेथें सहज डोळा लागावा अशा वृक्षलतादिकांमध्यें ‘ कामकटकाचा गजबजाटु : तैसा कोकिलांचा कलकलाटु ’ निरंतर सुरू असे. निर्जीवांमध्यें देखील कामकळा उपजविणारा उन्मत्त वसंत, विषयसुखाचा सोहळा झाडांना दाखवीत असलेला तेथें नेहमीं आढळायचा. त्या वेळीं तेथें आम्रपल्लवांच्या अंथरुणावरून विरहिणी कोकिला आपल्या प्राणेश्वरांना मधुर स्वरानें पाचारीत होत्या, अनंगलहरींनीं उन्मत झालेल्या मधुकरी, मकरंदाची मदिरा पिऊन, मदनमोगऱ्याच्या ताटव्यांत प्राणनाथाबरोबर धुमाळी खेळत होत्या व

परिमळें दोंदिल : हालौ न शके मळयानिळ
तऱ्ही विरहिणीसीं आदळ : घेऊ न संडी ( २८७ )

अशा त्या वनांत आम्र, चंपक, कुरबकादि सर्व वृक्ष डोलत होते. ते पाहत पाहत ‘ समुद्राचा अगड्ड ’ उतरौनी, जेथें फक्त कमलविकासापुरता सूर्य उगवून, एरव्हीं पूर्णचंद्राचे किरण नित्य अमृताचा वर्षाव करीत, अशा द्वारावतींत वीरचूडानें प्रवेश केला. तेथें ‘ क्षीरपुर भ्रांतीः राजहंस स्फटिकांगणें चाटती, ’ ‘ आंगणाचेनि चोखाळपणें : प्रतिबिंबिलीं तारांगणें : ति फुलें म्हणौनि सीहाणे : वेचों धांवती ( ३८३ ) ’ अशीं स्फटिकशुभ्र मंदिरें त्याला दिसलीं. तीं डोळ्यांखालून घालीत घालीत एकदाचा तो सुधर्मासभेंत येऊन दाखल झाला. श्रीकृष्ण आपल्या यादवांसह सिंहासनावर बसले होते. त्यांच्या सौंदर्याचें वर्णन कवीनें फारच बहारीचें केलें आहे. वाचकांनीं तें स्वतः वाचावें अशी मी शिफारस करतों. त्या सौंदर्याची कल्पना येण्यास

देखोनि रूप सांवळें : वैराग्य कामकळां पाल्हैलें
पुरुषां उपजति डोहाळे : कामिनीपणाचे ( ३७१ )

ही ओवी पुरेशी आहे. श्रीकृष्णाच्या अंगोपांगाचें भास्करानें जें वर्णन केलें आहे त्यांत त्याच्या तरल कल्पनाशक्तीची व अलंकारवैपुल्याची चांगलीच साक्ष पटते. “ रातोत्पलाच्या पाकळ्यांसारखे त्याचे सुंदर चरणकमल, इंद्रनील पाचासारखी त्याची दिव्य अंगकांति, केळीसारख्या त्याच्या मांड्या, कैवल्यसरोवरासारखें गंभीर वक्षस्थळ, रविमंडळाभंवतींच्या तारांगणांसारखे कौस्तुभाजवळचे ते एकवळीचे तेजःपुंज मोतीं, मुदियाचे हिरे व त्याचा चंद्रबिंबतुल्य प्रसन्न मुखचंद्रमा, पोवळ्यांच्या प्रभेनें शोभलेल्या चंद्रबिंबासारखें त्याचें मधुर स्मित, त्या विश्वजननयनमनोहर मूर्तीचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. त्याचे डोळे, त्याचे कटाक्ष, त्याच्या भिवया, त्याचा ललाटप्रदेश, त्याच्या कपाळावरील हरिचंदनाचा अर्धचंद्राकार टिळा, हें सर्व पाहून वीरचूड अत्यंत विस्मित झाला. ” पादाभिवंदन केल्यानंतर त्यानें त्या ‘ परब्रह्म परिपूर्णः निराकारू

८. श्री. ल. रा. पांगारकर—मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ ला, पृ. ४३६.

निर्गुण : सनातनु स्वयंप्रमाण ' देवरायाचें भक्तिभावपुरस्सर चरित्र स्तुतीच्या स्वरूपांत गाऊन

स्वस्ति श्रीचक्रधरा : माझी विनति आवधारा
एऱ्हवीं यावें दातारा : याग सीधी नेयावेया ( ४६२ )

ही धर्मराजाची विज्ञापना श्रीकृष्णास सांगितली. वीरचूडानें केलेल्या श्रीकृष्णाच्या स्तुतींत तत्कालीन भोजनप्रसंगाचें एक सुंदर रूपक साधलें आहे. त्याचें विवेचन पुढें करावयाचें असल्यामुळें येथें त्याचा ओझरता उल्लेख करणेंच पुरें होईल.

नारदानें सांगितलेलें शिशुपालवधाचें कार्य व धर्मराजाचें आमंत्रण, यांपैकीं कोणतें कार्य हातीं घ्यावे यावर विचार होऊन शेवटीं ' अग्र-पूजेचा वेळीं: शिशुपाल वदैल गाळी : तेव्हळीं देयाची तयाची बळी: महाकाळासीं ( ४९६ ) ' या उद्धवाच्या मताप्रमाणें राजसूययज्ञासाठींच जाण्याचें ठरलें. राऊळाच्या महाद्वारीं निशाणें वाजावयास लागलीं, चतुरंग सैन्य सिद्ध झालें, भाटांनीं ब्रीदावळी गावयास सुरवात केली. बलरामउद्धवअक्रूरादि यादवपरिवारासह श्रीकृष्ण घोड्यावर बसून निघाले. त्या वेळीं सर्व रणवाद्यें एकदम वाजायला लागलीं. ' ढवस पढहो भेरी: रायें गिडगिडियां रणमोहरीं: निशाणांचा गजरीं: आकाश फुटे ( ५२६ )' देव द्वारावतींतून निघून गेल्यामुळें ती

ना तरि रसेंवीण वाणी : चंद्रेवीण रजनी
जैसी एकली कामिनी : प्रियेंविना ( ५३९ )

रसहीन वाणीप्रमाणें, चंद्रहीन रजनीप्रमाणें, किंवा प्रोषितभर्तृका कामिनीप्रमाणें निस्तेज दिसावयास लागली. यादवांचें अपरंपार सैन्य ' सैन्यें पृथिवी दाटली: तें ब्रह्मयां गाऱ्हाणें सांगों निगालीं: तैसा धुरोळा अंतराळीं-( ५४२ ) ' उडवीत उडवीत मालतीपुराजवळ आलें. रात्रभर तेथें तळ देऊन सकाळीं पुन्हां चालूं लागलें व हस्तिनापुरास येऊन पोहोंचलें.

## नगरप्रवेश

युधिष्टिर आणि चक्रधर यांच्या भेटीचा सोहळा अपूर्व होता. ध्येय

आणि ध्याता, भाव्य आणि भक्त यांच्या मीलनाच्या सुखापुढें

स्वर्गसुख बापुडें : विषसुख निन्हा वेडें
मोक्षसुख सावडें : तें पाहुनीया ( ५८१ )

नगराच्या महाद्वाराशींच सर्व पांडवांची भेट झाल्यावर श्रीकृष्ण शहारांतून जाऊं लागले. त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ नागरिक वनितांनीं केशराच्या पाण्याचे सडे घातले होते, मोत्यांचा चूर करून त्यानें रांगोळ्या काढल्या होत्या, आणि हरिचंदनाच्या वेलींत कल्पतरूचीं पानें गुंफून घरोघरीं तोरणें लावलीं होतीं. अशा शृंगारलेल्या राजमार्गानें जाणाऱ्या श्रीकृष्णाला पाहण्यासाठीं

फुलांचि सेजें : विसांवला प्राणपती सांडीजे
मग देओ पहावया धावीजे : तो वेघ कैसा सांघों ? ( ६०४ )

जमलेल्या रमणींच्या शृंगारचेष्टांचें काय वर्णन करावें ! देवाला पाहतां पाहतांच कोणी ‘ प्रेमभरें वेडैली : मनें आलिंगावया धांवीनली ’ आणि माणसें ? ‘ तेह वेळीं माणसें चित्रीचीं जैसीं : तेवी ठकलीं ठेलीं ’ तीं चित्रलिखितांप्रमाणें स्तब्ध उभीं राहिलीं. भास्करानें केलेलें या प्रसंगाचें सर्वच वर्णन अत्यंत सुंदर आहे.

## श्रीकृष्णाची जलक्रीडा

त्या वेळीं ग्रीष्मऋतु सुरू झाला होता. त्यामुळें ‘ चंदनां दैव उदैलें : छाया--तरू पडप जोडिलें: पाणियां बीक चढलें: गोडिएचें ( ६२७ ) ’ पण उष्णतेमुळें तरुणींची अवस्था फार वाईट झाली. त्यांना ‘ आंगाचेनि सुकुमारपणें: घनें होतीं भूषणें ’ अशा वेळीं जलक्रीडेप्रमाणें सौख्यदायक दुसरी कोणती गोष्ट असणार ? श्रीकृष्णाच्या सोळा हजार बायका आपला केशकलाप सावरून व झिरझिरित रेशमी वस्त्रें नेसून ‘ चोळियांचेयां पाखेयां: गांठीं देओ लागलिया ’ पण ‘ कुच–तटाचिआं थोरियां: देओ न पुरती ’ म्हणून चोळ्यांच्या गांठी सैल करून ‘ कमळकळियांचें सेजारूं: कीं मकरंदाचें माहिरूं: ना तें वसुवारूं: अनंगरायाचें ’ अशा सरोवरांत उतरल्या. श्रीकृष्णही त्यांतच उतरले, व सर्व गोपींबरोबर जलक्रीडा करावयास लागले. कनककमळांच्या चिपुळ्या व कापुरकेळियेच्या चिरकांड्या घेऊन त्या श्रीकृष्णावर व श्रीकृष्ण त्यांच्यावर जलतुषार उडवूं लागले. त्यामुळें

डोळां चैतन्यें चोरिलीं : कामवाणीं आंगें विकळें गेलीं
आतां तंवकाची जळकेली : कवण खेळे ? ( ६६७ )

अशी सर्वांची स्थिति झाली. श्रीकृष्ण चिरकांडें फेंकून देऊन धोव्यानें जलकेली खेळूं लागले. हास्य, विनोद, चेष्टा, थट्टामस्करी सुरूं झाली. श्रीकृष्ण पुढें पळत व त्यांच्यामागें त्यांना धरण्यासाठीं त्या कामकिशोरी धांवत. पण छे ! ज्याचें रूप श्रुति देखील पाहूं शकल्या नाहींत तो या स्त्रियांच्या हातांत सांपडणार तरी कसा ?

जो अप्राप्यु योगीयां : तो धरूं पांति कामिनीया
बापु जीवींची हांव प्राणीया : कवण न करी ? ( ६८३ )

यावरून या सर्व शृंगारवर्णनांत भास्कराची अध्यात्मदृष्टि मधून मधून कशी डोकावून पाहते हें दिसून येईल. असो. त्या सुकुमार तरुणी श्रीकृष्णामागें धांवतांना तत्काळ दमल्या. तेव्हां चतुर मदनकामिनी सर्वांना म्हणाली, " कैसिया वो तुम्ही सीहाणियाः कां धांवतसां वाउगेयां ? " अशानें कां हा सांपडणार आहे ? आतां मी सांगतें तें करा, म्हणजे हा आपोआप आपल्यामागें धांवत येईल. असें म्हणून तिनें रंगावतीला विंचांतून सुस्वर आलाप काढावयास सांगितलें; रतिदूतिकेला कामशास्त्राच्या गोष्टी सांगण्यास आज्ञा केली; नृत्यनायिकेला नाचावयास लावून तिच्यामागें नाट्यचंद्रिकेला ताल धरावयास बजावलें. आपल्या स्त्रियांची ही चतुराई पाहून श्रीकृष्ण म्हणाले, ' तुम्हांला हें काय वेड लागलें ? अशानें कां मी तुमच्या मोहपाशांत सांपडणार आहें ?

माझें वैराग्य तिहीं लोकीं नांदलें : तें कांई तुम्ही नेणां ? ( ६९९ )

झालें. श्रीकृष्णानें आपल्या वैराग्याची बढाई मारतांच स्त्रियांना चांगलेंच फावलें. उपहासक शद्बबाणांनीं त्या देवाला टोंचूं लागल्या, आणि म्हणाल्या,

आम्ही कां नेणिजे : आधीं गौळणी भोगिजे
पाठीं व्रतबंध कीजे : हें कीं वैराग्य देवाचें ! ( ७०० )

मुंजीच्या अगोदर गौळणी उपभोगणाऱ्याचें वैराग्य काय सांगावें ! देवाला चांगली विरक्ति उपजली, आणि म्हणून त्यांनीं फक्त ' सोळा सहस्त्रें अंतःपुरें प्रणिलीं. ' नाहीं तर

एरव्हीं एकहो नुरती भूतळीं : कवतिका लागीं ( ७०२ )

असें खोंचदार उत्तर मिळतांच ‘ तेथ भारी जालें हांसे याचें ’ देवाची खूपच फजिती उडून सर्व हंसायला लागले, असें खुद्द कवीच सांगतो. या प्रसंगांतील उपहास खरोखरच फार मार्मिक आहे. विशालबुद्धि व कल्पनाशाली कवीशिवाय इतरांना विनोदाचा हा रंग साधला नसता. शिवाय येथें कृतिनिष्ठ विनोद नसून शब्दनिष्ठ आहे, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट होय. विनोदाचा हा प्रकार प्राचीन मराठी काव्यांत कोठेंही सांपडत नाहीं. भास्कराचें हें एक वैशिष्ट्य आहे असें मीं मागें म्हटलें, तें याचमुळें. असो. अशा रीतीनें हास्यविनोदानें जलकेली करून दुपारचा वेळ सर्वांनीं मोठ्या आनंदानें घालविला.

## रुक्मिणीचा विरहानल

भीम, अर्जुन, नकुळ आणि सहदेव हे चारही दिशांतील राजांवर—जरासंधाखेरीज—विजय मिळवून आल्यावर ‘ तेव्हळीं ब्राह्मणाचीं रूपें धरून निगाले देव भीमार्जुन. ’ पण चैतन्यनाथ श्रीकृष्ण दूरावल्यामुळें त्याच्या सोळा हजार लक्ष्म्या विरहानें व्याकुल झाल्या. त्यांच्या विरहानलाच्या ज्वालांनीं ‘ आकाश आहाळेलें : तें अद्यापि काजळेलें : दीसत असे ( ७४८ ) ’ त्यांतही रुक्मिणीची अवस्था तर कांहीं विचारूंच नका ! वियोगाग्नीमुळें तिच्या तळहातावर ठेवलेला कापूर प्रदीप्त होत असे; आणि अंगाला कमळें इंगळाप्रमाणें लागत. देवाच्या सहवासांत आनंद देणाऱ्या चंद्रचंदनकोकिलादिकांनीं एकदमच दावा साधला. तिच्या त्या विरहज्वरावर अनेक सख्या उपचार करूं लागल्या. तिला धारागृहांत नेलें, कर्पूरकदलीच्या हिंदोळ्यावर मृणालतंतूंचें वस्त्र घालून त्यावरील कोंवळ्या चंदनपल्लवांवर निजविलें, चंद्रकिरणांचा रस व कमळांचा मकरंद मिश्रित करून, ज्याला मलयानिलानें पालविलें, चंदनरसानें ओलावलें व पारिजातकानें सुगंधित केलें, अशा पाण्याच्या विलेपनानें देखील ‘ अधिका विरहानळ : उधावत दिसे. ’ कित्येक सख्यांना वाटलें कीं, रुक्मिणीला भूतबाधा झाली असावी, आपल्या हस्तसौकुमार्यानें पराजित केलेल्या अशोकपल्लवांनींच कांहीं कौटिल्य केलें असावें, किंवा

कामाचीए हिंदोळां एकली : हे मोकळां केसीं प्रीयासीं झोंबिनली
तेव्हेळीं इए बाधा जाली : वनदेवतेचो ( ८०८ )

या सर्व गोष्टी खऱ्या होत्या. पण या भूताला गाडून टाकण्यासाठीं श्रीकृष्ण नांवाचाच पंचाक्षरी समर्थ होता. त्याचें नांव कोण्या एका सखीनें सहज घेतांच 'एणें नामामृतें ओल्हावली : क्षिणैकु सावधु आली' आणि डोळ्यांतून अश्रु वहावयास लागले. तीन दिवसांनंतर 'जरासंदतरूचीं गर्वफळें' भीमाकडून दुफोडी करवून व सहदेवाला राज्यावर स्थापून श्रीकृष्ण परत आल्यानंतर अर्थातच सर्वांना मोठा आनंद झाला.

या विरहप्रसंगाचें वर्णन अस्थानीं तर आहेच, पण तें बरेंच पाल्हाळिकही आहे. श्रीकृष्ण पांडवांच्या घरीं राजसूययज्ञासाठीं गेला होता. त्या यज्ञाचें वर्णन विस्तारानें करण्याऐवजीं केवळ श्रीकृष्णपत्नींच्या विरहावस्थेचें वर्णन करण्यांत भास्करानें समयोचितपणा प्रकट केला नाहीं, हें खास. प्रियाविरहाची झळ त्याला नुकतीच उपभोगावी लागली असावी असें दिसतें. त्यामुळें तो तरी काय करणार बिचारा ? अंतःकरणांत दडून राहिलेले भाव जागृत होऊन ते शब्द-रूपानें वहावयास लागले, ते अडवतां कसे येणार ? त्यानें या वेळीं जरी संन्यास घेतला होता तरी पूर्वाश्रमींच्या शुद्ध प्रेमाचे संस्कार त्याच्या हृत्फलकावरून अजून पुसले मात्र गेले नव्हते, आणि म्हणूनच तो या ठिकाणीं इतका पाल्हाळ करीत बसलेला आढळतो. पण याचबरोबर हीही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, भास्कराचें हें वर्णन पाल्हाळिक असलें तरी तें कंटाळवाणें मात्र मुळींच नाहीं. त्यांत त्यानें भाषेचें जें वैभव विस्तारलेलें आहे तें पाहतांच मन आनंद-सागरांत पोहूं लागतें व हृदयांत नादब्रह्माच्या वीणेच्या तारा छेडल्या जाऊन आपण जणूं काय गोड संगीत ऐकत आहों असा भास व्हावयास लागतो. रुक्मिणीच्या विरहानलावर कवीनें आपल्या अचाट कल्पनाशक्तीची कमाल करून जे कोमल उपाय सुचविले आहेत ते ऐकतांच आपण कोणत्या मृदुल व मधुर वातावरणांत विहार करूं लागतों कांहीं कळत नाहीं. वियोगाच्या वर्णनांत अति-शयोक्ति झाली आहे, ही गोष्ट खरी. कवीला तिची जाणीवही होती. पण तीवर त्यानें दिलेलें

परी ते आवस्ता आइकतां : अत्योक्ती न म्हणावी जाणतां
तया विश्वात्मयांचा वीऱ्हो भोगितां: काए एक नव्हे ? ( ७४४ )

हें उत्तर वाचतांच त्याच्या भक्तिभावपरिपूरित अंतःकरणाची जाणीव होऊन वाचक कवीला क्षमा केल्याविना राहणार नाहींत, अशी माझी खात्री आहे. श्रीकृष्णरुक्मिणीचा विहरप्रसंग म्हणजे ईश्वराचा व भक्ताचाच विहरप्रसंग होय. जगांतील इतर कोणत्याही साधनांनीं या विरहज्वाला शमूं शकत नाहींत. ' एथ हाचि उपाओ : जे मिळे यादवराओ ' तेथें प्रत्यक्ष ईश्वराचीच भेट झाली पाहिजे. श्रीकृष्ण तर रुक्मिणीचा प्राणनाथच होता. तिला देवाचा विरह सहन झाला नाहीं यांत आश्चर्य नाहीं. पण ' पुन ऐसा नाहीं योगेश्वरू : जो श्रीकृष्णाचा विरहोज्वरू : साहों शके ( ८४७ ) ' जगांत असा एकही योगेश्वर नाहीं कीं, ज्याला देवाचा विरह सहन करतां येईल. महानुभाव संप्रदायाचा संस्थापक व भास्कराचा मोक्षगुरू श्रीचक्रधर याच्याच विरहाचें हें सर्व वर्णन आहे असें मानावयास हरकत नाहीं. भास्करानें श्रीकृष्णाला सर्वत्र चक्रधर या नांवानें संबोधिलें आहे त्यांतील इंगित तरी हेंच होय. सारांश, हीं सर्व वर्णनें कवीच्या सहृदय व अनुभवपूर्ण अंतःकरणांतून आलेलीं असल्यामुळें त्यांना एक प्रकारचें विशेष स्वारस्य प्राप्त झालें आहे यांत संशय नाहीं.

## शिशुपालवध.

यानंतरचा कथाभाग फार थोडा असून त्यांतच काव्यकथेचा मूलभाग आलेला आहे. राजसूय यज्ञांत श्रीकृष्णाला अग्रपूजेचा मान देतांच शिशुपाल क्रुद्ध झाला, व देवाची यथेष्ट निंदा करूं लागला. ' हा नोहेंचि कुळिपु : या नाहीं मायबापु : कांइ हा सुस्वरूपु : कव्हणी नेणे ' ' आचारां सकळां : हा साहाजेंचि वेगळा : वरि श्रुतिपंथ सांडिला : तो नेणों केवि ( ८६३ ) ' अशा गाळी द्यायला त्यानें सुरवात करतांच पांडवांचीं व यादवांचीं सैन्यें शत्रूवर चालून गेलीं. डेऱ्यांत शिशुपाल शल्याजवळ बडबडूं लागला. शल्यालाही वाचा फुटली. तो म्हणाला,

लांबलांब कासोटे : मीरवीत आंबुलियां पुढें
ते यादव वापुडें : काए जुझती ? ( ८९१ )

त्याच्या सैन्यांत अपशकुन व्हावयास लागले.‘ दिहां धवळेआंः भुकेति भालुआं ’ ‘ दक्षिणदिशे कुमरी : ते नागोवी रोदन करी : मोकळां केशी ’ अशीं अनेक दुश्चिन्हें होत होतीं; पण त्यांची पर्वा न करतां चैद्यादिक यादवपांडवांवर चालून आले. रणधुमाळी सुरू झाली. ‘ निशाण पटहो भेरीः राए गिडगिडिय रणमोहरी ’ अशा रणवाद्यांच्या गजरांत

> रणभूमीचा घाणा करुनि सरीसा : माहकाळ उस गाळिताए जैसा
> गरगरां आट भवताए तैसा : दोहीं दळांचा ( १०४३ )
> की दळावेया पृथिवीचां जातां : काळ रात्रीं वैरगें घातलें मज पाहातां
> तेवि दोन्ही दळें भीडतां : वीरांचो पीठी जाली ( १०४४ )

असा भयंकर प्राणसंहार होऊं लागला. ‘ रथांचां धडधडाटीं : भटांचा गजबजाटीं : पाए रीगताती पोटीं : वसुंधरेचा ( १०५५ ) ’ शेवटीं श्रीकृष्ण व शिशुपाळाचें युद्ध वर्णिलें आहे. श्रीकृष्ण ज्या घोड्यावर बसले होते त्याच्या भरधांव धांवण्याचें वर्णन

> वेल्हावती टाप घाली : चामकें मागिलीचि दो पाउलीं
> पुढिलें खरपुटें ठेवी कुंभस्तलीं : दिग्गजांचां ( १००७ )
> रागीं दाटीलीया उसळे : सूर्योमंडळा परौतां चौतळे
> वरीचावरी घे सवंफळें : दिग्गजघटासी ( १००८ )

अशा ऐटबाज शद्बांत केलेलें असून तें फार मनोवेधक आहे. बरीच बोलाचाल झाल्यावर देवानें आपलें सुदर्शनचक्र काढून शिशुपालाचा शिरच्छेद केला. त्याच्या शरीरांतून ज्योतिकळिका निघून श्रीकृष्णचरणीं विलीन झाली. देवांनीं पुष्पवर्षाव केला व ग्रंथ आटोपला.

५

## गुणदोषविवेचन

मूळ काव्याचा परिचय आतांपर्यंत करून देतांना कल्पनेपेक्षां जास्त

जागा अडली. तथापि प्रस्तुत विवेचन स्वयंसंपूर्ण असावें या दृष्टीनेंच एवढा विस्तार होऊं दिला. त्याला बांध घालण्याचा शक्य तोंवर प्रयत्न केला नाहीं. याबद्दल सहृदय वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. वर दिलेल्या ग्रंथपरिचयावरून शिशुपालवध काव्य पूर्णपणें वाचकांच्या समोर उभें राहील असें वाटतें. निदान त्या दृष्टीनें मी स्वतः प्रयत्न केला आहे. कोणताही महत्त्वाचा प्रसंग न गाळतां, ठिकठिकाणीं सुंदर ओव्या जशाच्या तशा उध्दृत करून मूळ कथा बहुतेक खुद्द कवीच्याच शब्दांत सांगितली. आतां शेवटीं प्रस्तुत काव्याचें गुणदोषविवेचन करून हें लांबविलेलें समीक्षण संपविण्याचा विचार आहे.

## कल्पनेची विशालता.

प्रस्तुत काव्यांत आढळून येणारा पहिला व अत्यंत महत्त्वाचा गुण म्हणजे कल्पनेची विशालता हा होय. भास्कराचें बुद्धिवैभव असामान्य होतें, पण तो अभ्यासजड नव्हता. त्यानें अनेक शास्त्रांत प्रावीण्य मिळविलें होतें, बहुतेक सर्व संस्कृत काव्यें अभ्यासिलीं होतीं, वेदवेदांगापासून तों व्याकरणविषयक ग्रंथांपर्यंत सर्वांचीं पारायणें केलीं होतीं, पण यामुळें त्याची बुद्धि निष्कारण गंभीर व जड मात्र बनली नव्हती. उलट तिला नवीन नवीन अंकुर जागोजागीं फुटलेले आढळून येतात. त्याच्या अंगच्या उपजत काव्यगुणांचा त्यामुळें उत्कर्षच झालेला दिसून येतो. आपल्या नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेच्या साह्यानें भास्करानें शिशुपालवधांत काव्यलतांचीं जीं मनोहर उद्यानें निर्माण केलीं आहेत त्यांत प्रवेश करतांच तेथें दरवळून राहिलेल्या कल्पनापरिमलानें अंतःकरण सुप्रसन्न होऊन कवीच्या बुद्धिवैभवाबद्दल अत्यंत आश्चर्य वाटवायला लागतें. अंगणांत असलेल्या पुष्पित पारिजातकाचें झाड हालविलें म्हणजे त्यावरून फुलांचा बहार नुसता निथळत असतो, तद्वतच या काव्याचा कोणताही भाग डोळ्यांखालीं घातला तरी कल्पनांचीं सुगंधी फुलें सर्वत्र विखुरलेलीं आढळून येतात. ग्रीष्म ऋतूंत दिवस फार मोठे असतात, पण असें कां व्हावें ? याची

कैसा ऋतु माताविता : नलनीचें आलिंगनु न सोडी सविता
म्हणौनि मज पांतां : दीस वडील होती ( ६३० )

या ओवींत कवीनें केलेली कारणमीमांसा किती मनोहर आहे! श्रीकृष्णाच्या जलक्रीडेच्या वेळेस सर्व रमणींनीं आपला आनितंब लांब असलेला केशकलाप मोकळा सोडला होता. पण जलक्रीडा संपल्यानंतर या देवांगनांनीं आंगासीं विरून गेलेल्या ओल्या वस्त्रासहित बाहेर येऊन त्याला जेव्हां बांधलें–केशपाश ज्या वेळेस आवळला, त्या वेळीं त्यांतून अर्थातच पाण्याचे थेंब टपकूं लागले. या प्रसंगासंबंधीं कवि म्हणतो,

नितंब आलिंगना सुखावलें : बांधतां आसुवें गाळो लागलें
तेवि केशकळाप मीरवले : उदकबिंदुस्तव ( ७२१ )

' आतांपर्यंत नितंबाच्या आलिंगनानें जे सुखी झाले होते तेच केंस, त्यांना बांधून टाकतांच, नितंबसंग दूरावल्यामुळें, त्यांतून निथळणाऱ्या उदकबिंदूंच्या रूपानें जणुं काय डोळ्यांतून अश्रु गाळायला लागले.' ही कल्पना प्रत्येक सहृदय रसिकाच्या अंतःकरणांत आनंदाच्या लहरी निर्माण केल्याशिवाय राहणार नाहीं. आकाशभेदी कल्पनांचीं अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. पण तीं येथें उध्दृत करून जागा अडवीत नाहीं. आणखी एक-दोनच उदाहरणें पहा:–

विरहानळाचिया ज्वाळा : लागति सूर्यमंडळा
म्हणौनि संताप आगळा : तेथचि दीसे ( ७४७ )
सरळें मुखानळें : आकाश आहाळैलें
तें आद्यापि काजळैलें : दिसतसें ( ७४६ )

## उपमाचातुर्य

भास्कर हा प्रतिभासंपन्न कवि असल्यामुळें आपल्या काव्यांत जागोजागीं कल्पनांचीं सुंदर मंदिरें तर त्यानें उभारलींच आहेत, पण त्यांतून शब्दालंकारांची व अर्थालंकाराची जी आरास त्यानें केली आहे ती पाहतांच आश्चर्यानें तोंडांत बोटें घालावीं लागतात! आपल्या प्राचीन कवींपैकीं ज्ञानेश्वराखेरीज इतर कोणाही कवीजवळ एवढें अफाट अलंकारवैभव असलेलें आढळत नाहीं. महाराष्ट्रशारदेचे हे दोघेही भांडारी आहेत, असें म्हटलें असतां चालेल. या दोघांजवळील अलंकारसम्पत्तीची तुलना केल्यास ज्ञानेश्वराचें पारडें जड

भरेल. आपल्या वयोमानाच्या दृष्टीनें त्यांनीं एकट्या ज्ञानेश्वरींतच जी अलौकिक कल्पनासृष्टि उभारली आहे ‘ ती पाहोनि हांसों आम्ही । विश्वामित्रातेंही ’ असें खुद्द कवीप्रमाणें आपणांसही वाटावयास लागतें. त्यांच्या कवितेला एखाद्या अथांग, गंभीर, शीतल, निर्मल व पवित्र अशा महानदीचीच उपमा साजेल, भास्कराच्या काव्यनिर्झरिणीचें पाणी स्वादिष्ट, निर्मल, पवित्र खरें, पण ते अथांग व गंभीर मात्र नाहीं. काव्यगुणांच्या दृष्टीनें दोघांनाही एकाच आसनावर बसु-वावें लागेल, पण ग्रंथविस्ताराच्या दृष्टीनें पाहतां, तात्याजी केळकराची उपमा उपयोजून सांगावयाचें म्हणजे ज्ञानदेवाच्या कोहिनूरासमोर भास्कराच्या हिरक-णीच्या गालावर लाजेची गुलाबी चमकलीच पाहिजे. ज्ञानदेवांप्रमाणें भास्करा-मध्येंही उपमाचातुर्य चांगलें दिसून येतें. त्याच्या उपमेंतीलच नव्हे, तर उत्प्रेक्षा—दृष्टांतादि अलंकारांतील उपमानें कविसमय, निसर्ग, पशुपक्षी, व्यवहार, शास्त्रीय ज्ञान इत्यादि सर्वांपासून गोळा केलेलीं आहेत. याचा प्रत्यय वाचकांना काव्य वाचतांना पदोपदीं येईल. श्रीकृष्णाच्या अंगप्रत्यंगाचें सविस्तर वर्णन करतांना कवीनें जणुं काय उपमेचें दुकान उघडलें आहे असें वाटतें! ‘ तया निरोपमा परब्रह्मा : जरि दीजैल उपमा : तरि कोपतील आम्हां : ब्रम्हवीद ’ (६६४) असा स्वतःचा विनम्रभाव प्रकट करून, पुरुषांना कामिनीपणाचे डोहळे उप-जवणाऱ्या सांवळ्या श्रीकृष्णाचें वर्णन आरंभिलें आहे. त्यांतील एकदोन समर्पक व बहारीच्या उपमा पहा:—

रवीमंडळा भंवती : जंरि तारांगणाची ओवणी दीसती
तरि एकावळी उपमीजती : कौस्तुभा जवळीं ( ३९९ )

हें कौस्तुभाचें व एकावळीचें वर्णन, किंवा

नीळेयांचा झळंबुका : घोळिला चंद्रीका
तऱ्ही मुऱ्हारीचेया मुखां : उपमा नव्हे ( ४०८ )

हें कृष्णाच्या श्याम मुखचंद्राचें वर्णन समर्पक उपमांनीं केलेलें आहे असें कोण म्हणणार नाहीं? याचप्रमाणें उत्प्रेक्षा, दृष्टांत रूपकादि अलंकारांचीही प्रस्तुत काव्यांत गर्दी उडालेली वाचकांना दिसून येईल. त्या सर्वांचीं उदाहरणें पुनः येथें देत नाहीं. काव्याचा परिचय करून देतांना व इतरत्रही याच प्रकरणांत तीं बरींच आलेलीं आहेत, तीं जिज्ञासूंनीं अवश्य पहावीं.

## शब्दालंकार.

वर उल्लेखिलेल्या अर्थालंकारांप्रमाणें भास्कराच्या काव्यांत शब्दालंकारांचें वैपुल्य मात्र आढळत नाहीं. याचें कारणही अगदीं उघड आहे. खरा कवि शब्दांच्या निरनिरनिराळ्या कसरती करून दाखवावयाच्या भानगडींत सहसा पडत नाहीं. शब्दालंकारांनीं काव्यांत नादमाधुर्य येतें. अशीं काव्यें रसहीन असलीं तरी तीं कानाला गोड लागत असल्यामुळें पुनःपुनः म्हणावींशीं वाटतात. स्वभावसुंदर रमणीला ज्याप्रमाणें अलंकार अधिक शोभा देतात त्याचप्रमाणें खऱ्या काव्याला शब्दालंकारामुळें अधिक गोडी प्राप्त होत असते. ह्या गोष्टी खऱ्या असल्या तरी रससिद्ध कवि त्यांच्याशिवायच आपलें काव्य रमणीय करूं शकतो. त्याला या बाह्य वेषभूषेची फारशी गरज वाटत नाहीं. भास्कराच्या बाबतींत या सर्व गोष्टी बरोबर लागू पडतात. निसर्गदत्त प्रतिभा त्याच्यापाशीं असल्यामुळें केवळ शब्दावडंबरानेंच आपलें काव्य शृंगारून वाचकांना चकविण्याची त्याला जरूरी नव्हतो. तत्रापि शब्दालंकारांकडे त्यानें दुर्लक्ष मात्र केलेलें नाहीं. त्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांचाही आदर त्यानें केलेला आहे. ओवीछंदांत आढळणारें यमक त्याच्याही काव्यांत आहे. पण याशिवाय अनुप्रासादि अलंकार जेथें अधिक खुलून दिसतील अशा युद्धवर्णनप्रसंगीं त्यानें त्यांचा उपयोग केला आहे. यादवांच्या आणि शिशुपालाच्या सैन्यांतील वीरांच्या हातांतील तल्वारी नृत्य करूं लागतांच आपल्याही शब्दरमणीला नाचवावयाची स्फूर्ति भास्कराला झाली व त्या स्फूर्तीच्या भरांत त्यानें

> **रण**–पिसे **रण**–राक्षस : **जग**–दळ **जग**–निवास
> खांडे थोवेकारू असमसास : एरां लेख नाहीं ( १०२२ )
> **गंडगर्व गंड**गोपाळ : **भ्या**ले **भ**यासुर **भार**शांखळ
> **रण**नोवरे **रण**बंबाळ : ल्हुडी पंचानन ( १०२३ )
> **जग**चवर **जग**मल्ल : **रण**सोयरे **रण**बागुल
> **तोडर**रास **तोडर**मल्ल : **खांडे भडाडा** ( १०२४ )

अशा प्रासयुक्त ओव्या लिहून टाकल्या आहेत. पण याशिवाय इतरत्र मात्र शब्दालंकार आपणांस विशेष सांपडत नाहींत.

## त द्रू प ता

या व्यतिरिक्त भास्कराचा एक विशेष उल्लेखनीय गुण म्हणजे त्याचें वर्णनचातुर्य. कोणत्याही प्रसंगाचें तो वर्णन करावयास लागला म्हणजे अनुरूप शब्द त्याच्या लेखणीमागें आपोआप धांवून येतात; आणि त्यांच्या साहाय्यानें तो इतकें हुबेहुब शब्दचित्र रेखाटतो कीं, वर्ण्यप्रसंग तत्काळ आपल्या डोळ्यांसमोर उभा रहावा. द्वारकेंतील वनोपवनांचीं किंवा श्रीकृष्णाच्या शरीरसौन्दर्याचीं त्यानें काढलेलीं चित्रें या दृष्टीनें फारच सुंदर आहेत. त्यांचें निरंतर स्मरण करावेंसें वाटतें—नव्हें तीं आपल्यासमोर नेहमीं उभीं राहातात. हीं सर्व चित्रें किंवा हे सर्व प्रसंग त्यानें वर्ण्यविषयाशीं तद्रूप होऊन रेखाटले असल्यामुळें त्यांना अप्रतिम माधुर्य प्राप्त झालें. भास्कराचें अंतःकरण अत्यंत कोमल, अत्यंत हळुवार, अत्यंत सहृदय असलें पाहिजे यांत संशय नाहीं. एरव्हीं प्रत्येक वर्ण्य प्रसंगाशीं तदाकार होऊन जाणें त्याला शक्य झालें नसतें. कोणतेंही वर्णन असो, त्यांत जणूं काय तो आपलें हृदयसर्वस्व ओतीत आहे, असा भास होतो. रसिकांच्या अंतःकरणांतील प्रसुप्त भाव त्यामुळें जागृत होऊन त्या त्या रसाची उत्पत्ति तेथें होते व त्याचा आपणांस अनुभव घ्यावयास सांपडतो. आपल्या काव्यांत रसांचा परिपाक चांगला झाला आहे असें भास्कर नेहमीं म्हणतो. ‘ फुन **वाचा रसाळा** : गर्व सांडवीन कोकिळां : ( २७ )’ ‘ पढतां श्रीकृष्ण पवाडे : ठिकसां बोलां घोस पडे : **रसरंगाचे पाहाळ उघडे** श्रोतेयांसी ( २० ) ’ **रसें** झेलिजे कवतिकें : हातांवरीं ( ३६६ ) ’ इत्यादि ओव्यांवरून वरील विधानाचें वाचकांना प्रत्यंतर येईल. त्याचीं विरहवर्णनें वाचतांना तर

हा भाओ सांघतां विरैती अंतःकरण : श्रोतेयांचीं ( ८५० )

या त्याच्या उक्तीची आपणांस चांगलीच साक्ष पटते.

## दोष

भास्कराच्या या काव्यांतील दोष हुडकणें म्हणजे पंचपक्वान्नाच्या

मेजवानीवर ताव मारीत असतां पानांतील कोणते पदार्थ वाईट झाले आहेत हें मुद्दाम शोधून काढण्यासारखेंच कठिण काम आहे. शिशुपालवधाच्या प्रास्ताविक भागांतच

नावडी घेउनी चंदनाचां रसीं : आंगामाजि खतें पाहे मासी
तेंवि गुण सांडौनि दोष गिवसी : क्षुद्र-जन ( २७ )

असा छिद्रान्वेषी टीकाकारांवर त्यानें वाग्वज्राचा प्रहार केला आहे. पण टीकाकाराच्या कर्तव्याला अनुसरून तेंही काम येथें करणें प्राप्त आहे. या काव्यांत आढळणारा पहिला दोष **पाल्हाळाचा** होय. एखाद्या गोष्टीचें वर्णन करावयास लागला कीं, तो स्वतःचें देहभान विसरून जाऊन बरींच लांबलचक वर्णनें करीत बसतो. द्वारकेतील वनांचीं, ऋतूंचीं, रुक्मिणीच्या विरहव्यथेचीं व त्यावरील उपचारांचीं वर्णनें, या दृष्टीनें पाहिल्यास बरींच पाल्हाळिक वाटतात. तीं त्यानें हात थोडासा आंखडता घेऊन व योग्य मर्यादा राखून केलीं असतीं तर अधिक सुंदर दिसलीं असतीं. **अस्थानीं शृंगाराचा** दोषही भास्कराकडून अनेकदा झाला आहे. याचें विवेचन मागें एकदां केलेलें असल्यामुळें त्याविषयीं येथें अधिक लिहिण्याची गरज नाहीं. क्वचित् भास्कराची लेखणी शृंगाराची मर्यादा ओलांडून अश्लीलतेकडे झुकलेली दिसून येते; पण आपल्या वर्णनांत अश्लीलता येऊं पाहात आहे अशी जाणीव होतांच तो रसिकांच्या भीतीनें हात आंखडता घेतो हें

लाजेचिया बुंथी भीतरी : गुप्तांगें लपवीती तीया सुन्दरी
हा भाओ वाणितां **जासी अतिच्यारीं** : तरी रसीक कोपती (७१९)

या ओवीवरून स्पष्ट दिसून येईल. तथापि उघड उघड अश्लीलतेचीं उदाहरणें आपणांस या काव्यांत दाखवून देतां येत नाहींत हें खास.

## कालविपर्यास

बहुतेक श्रेष्ठ कवींच्या काव्यांत आढळणारा कालविपर्यास शिशुपालवधांत देखील अधून मधून डोकावतांना दिसतो. कित्येकांच्या मतें हा एक उत्कृष्ट कवीच्या अंगचा गुणच होऊं पाहात आहे. परंतु हें ठीक नाहीं. वर्ण-

नाच्या ओघाबरोबर वाहवत जाऊन पूर्वी झालेल्या गोष्टी मागाहून वर्णन करणें किंवा मागाहून घडलेल्या गोष्टींचें अगोदर वर्णन देणें असे कालविपर्यास होणें साहजिक आहे. पण ते भूषणभूत मात्र नाहींत; फार झालें तर ते क्षम्य आहेत एवढेंच म्हणतां येईल. आधुनिक कवीच्या काव्यांत असा एखादा दोष झाल्यास त्याची टर उडवण्यास टपून असलेले कित्येक टीकाकार हाच दोष जुन्या काव्यांत आढळल्यास त्याचें मोठ्या सुंदर शद्बांनीं समर्थन करीत असलेले पाहून फार आश्चर्य वाटतें ! असो. भास्करानें देखील

कणैरीचीं लाखौली वाउनी : प्रतापाची दीपवती उजळुनी
कृतांतपा तपोवनीं : जेणें त्रीनेत्र तोखवीला ( ७३९ )

या ओवींत अर्जुनाचें वर्णन करतांना हा दोष केलेला आहे. तपोवनांत जाऊन, कण्हेर फुलांची लाखोली वाहून पार्थानें शंकराला प्रसन्न केल्याचा प्रसंग वनपर्वातील आहे. त्याचा उल्लेख राजसूययज्ञाच्या अगोदरच धर्माच्या भाषणांत आल्यानें वरील दोष येथें होतो हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. .

## उपसंहार

असो. एकंदरींत शिशुपालवध कथा अत्यंत रसाळ झाली आहे यांत तिळप्रायही संशय नाहीं. ही शांतरसानें सिंचिलेली काव्यलता साहित्याच्या परागानें उटलेल्या व शृंगाराच्या पाण्यानें न्हाणलेल्या शद्बांत भास्करभट्टानें आपणांसमोर विस्तारिली असल्यामुळें तिचीं सुरस व गोड फळें चाखतांना आपणांस अननुभूतपूर्व आनंदाचा उपभोग घ्यावयास सांपडतो. कामशास्त्र, साहित्यशास्त्र, नीतिशास्त्रादिकांच्या अभ्यसनानें प्रगल्भबुद्धि झालेल्या कविश्रेष्ठाच्या कल्पनेचें तिला पाणी मिळालेलें असल्यामुळें या लतेच्या फळांतील मधुरिमा विशेषच रुचकर लागतो. वर्णनचातुर्य भास्करांत पूर्णपणें होतें. त्यानें वर्णिलेल्या शृंगाररसप्रधान विरहव्यथेनें ‘ जगासी विरहोवस्था होईल नवी ’ हें जितकें खरें, तितकेंच त्याच्या सौंदर्यवर्णनप्रसंगीं ‘ पुरुषां उपजती डोहळे : कामिनीपणाचे ’ हेंही खरें आहे. त्याच्या शांतरसवर्णनानें तो एखादा विरक्त साधु असावा असें जितकें निश्चितपणें वाटतें, तितकेंच त्याच्या युद्धप्रसंगवर्णनावरून तो झुंझार वीर असावा

अशीही खात्री पटते. आणि हे प्रसंग वाचतांना मध्येंच त्याच्या विनोदानें जी गालाला खळी पडते तिची शोभा कांहीं निराळीच! हीं सर्व वर्णनें लिहितांना भास्करानें इतके समयोचित, रसानुकूल, मनोहर व हृदयाल्हादक शब्द योजले आहेत कीं, त्यामुळें अंतःकरण प्रसन्न होतें, बुद्धीला चमत्कार वाटतो व कान संतृप्त होऊन मान डोलावयास लागते. चित्तवेधक वर्णनशैलीनें विविधरसपरिपूर्ण काव्य इतक्या श्रवणसुखद शब्दांत रचणारा भास्कर हा अत्यंत थोर कवि होय. अर्थात् ग्रंथारंभीं केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्यानें आपल्या रसाळ वाणीनें कोकिळांना गर्व सांडावयास लावून कलहंसांना अवकळा आणली असा अभिप्राय देण्यास मुळींच हरकत नाहीं असें मला वाटतें.

६

## तत्कालीन परिस्थिति

कवि हा आपल्या कालाचा प्रतिनिधि असतो असें म्हणतात. ज्या काळांत तो होऊन गेला, ज्या परिस्थितींत तो वाढला, ज्या समाजांत तो वावरला, त्या काळाचें, त्या परिस्थितीचें व त्या समाजाचें प्रतिबिंब त्याच्या काव्यांत पूर्णपणें पडलेलें आढळतें. पण हें केव्हां? तर बाहेरच्या जगाशीं कवीचा संबंध असेल तेव्हांच. स्वकालीन परिस्थितीशीं कवि तद्रूप झाला असेल, धार्मिक, सामाजिक व राजकीय आंदोलनाशीं तो तादात्म्य पावला असेल, किंवा भोंवतालच्या वातावरणानें हृदय हलण्याइतका जर तो सहृदय असेल तरच त्याच्या काळाचें प्रतिबिंब त्याच्या काव्यग्रंथांत आपणांस आढळून येईल. एरव्हीं तिकडे पानपतच्या समरांगणावर सुरू असलेल्या घनघोर संग्रामाची गंधवार्ता देखोल नसणाऱ्या किंवा अशा राष्ट्रीय आपत्तीच्या वेळींही लोकांच्या भावनांशीं समरस होण्यास असमर्थ असलेल्या कविवर्य मोरोपंतांच्या काव्य-ग्रंथांत ही गोष्ट आढळणें शक्य नाहीं. त्यासाठीं कान व डोळे उघडे ठेवून साऱ्या भरतखंडभर प्रवास करणारा, राष्ट्रीय आंदोलनानें हृदय स्पंदन पावणारा, समकालीन नरवीरांच्या पराक्रमानें उत्तेजित होऊन अमोघ व वीर्यवती वाणी प्रसवणारा, गरीबांच्या दुःखानें कळवळून नेत्रांतून अश्रुधारा गाळणारा, मुक्तेश्वर

किंवा रामदास यांसारखा विलक्षण प्रतिभावान कवि पाहिजे. आपल्या वेळच्या धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीचें शब्दचित्र आपल्या काव्यांत मुक्तेश्वर–रामदासाप्रमाणें कोणत्याच मराठी कवीनें चितारलेलें नाहीं,–पण चितारलें नाहीं असें म्हणण्यापेक्षां कोणत्याच मराठी कवीच्या काव्यग्रंथांत तें स्पष्टपणें निघालें नाहीं, किंवा उतरलें नाहीं असें म्हणणें अधिक शोभेल. कारण खऱ्या प्रतिभासंपन्न कवीला आपल्या काळाचें प्रतिनिधित्व संपादण्यासाठीं ओढूनताणून चंद्रबळ आणून भोंवतालची परिस्थिति मुद्दाम चितारावी लागते असें नाहीं. तर परिस्थितीशीं पूर्णपणें समरस झालेल्या कवीच्या ग्रंथांतून ती आपोआपच उतरते, कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें आपलें अस्तित्व ती प्रगट करीतच असते. मोरोपंतांनीं स्वकालीन राजकीय परिस्थितीकडे डोळेझांक केली म्हणून त्याविषयीं त्यांच्या काव्यांत विशेष उल्लेख आढळत नाहीं, ही गोष्ट खरी आहे. पण ज्या कौटुंबिक सौख्यांत त्यांनीं आपलें आयुष्य घालविलें त्याचीं चित्रें त्यांच्या काव्यांत किती तरी स्पष्टपणें निघालेलीं दिसून येतात ! मोरोपंतांपेक्षां मुक्तेश्वर–रामदासादिकांचें अंतःकरण अधिक संस्कारक्षम, दृष्टि अधिक व्यापक व वृत्ति अधिक भावनाप्रधान असल्यामुळें ती केवळ कौटुंबिक पाशांत अडकून न राहतां सर्व राष्ट्राचें निरीक्षण करून त्याशीं तद्रूप होऊं शकली, इतकेंच काय तें. सारांश, कवीचें मन जितकें हळुवार,उदार व सर्वंकष असेल त्याप्रमाणांत कमीजास्त मानानें तो स्वकाळाचा प्रतिनिधि असतोच असें म्हणावयास हरकत नाहीं.

जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासें
थिल्लरीं थिल्लरा ऐसें । बिंबेचि पै

या ज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टांताप्रमाणें त्याचें अंतःकरण समुद्रासारखें विशाल, व्यापक व खोल असेल तर त्याप्रमाणें आकाशाचें–स्वकालीन परिस्थितीचें प्रतिबिंब त्यांत पडेल. पण तें जर डबक्याप्रमाणें आकुंचित व उथळ असेल तर प्रतिबिंबही तसेंच पडेल. कांहींही असलें तरी ' बिंबेचि पै ' प्रतिबिंब मात्र पडणारच. ती परिस्थिति चितारण्याचा जरी त्यानें प्रयत्न केलेला नसला तरी कधीं कथासंदर्भाच्या अनुरोधानें, कधीं उपमेच्या रूपानें तर कधीं दृष्टांताच्या वेषानें ती कवीच्या काव्यांत अविर्भूत होते एवढें मात्र खास.

## राजकीय वातावरण.

भास्करभट्टाच्या शिशुपालवधाकडे सूक्ष्म नजर फेंकली म्हणजे त्या वेळची विवाहसंस्था, भोजनपद्धति, नमस्काराची रीत, देवघेवीचें नाणें इत्यादि अनेक गोष्टीसंबंधीं आपणांस फार उपयुक्त माहिती मिळते. प्रस्तुत कथेचें सर्व-साधारण स्वरूप लक्षांत घेतां तींत सर्वत्र आनंदाचीं फुलें आढळून येतात. श्रीकृष्ण–रुक्मिणीचा प्रणयकोप, सोळा सहस्र युवतींशीं जलक्रीडा, सुकुमार रुक्मिणीचा विरहताप, त्यावरील नानाविध उपचार इत्यादि गोष्टींचीच सर्वत्र गर्दी उसळलेली दिसते. यावरून भास्कराच्या मनाची ठेवण चांगल्या रीतीनें लक्षांत येतें. पण त्यावेळच्या राजकीय वातावरणांत विहार करावयाचा असल्यास शिशुपालानें मांडलेल्या उच्छादाचें जें वर्णन नारदाच्या तोंडीं घातलें आहे त्याकडेच वळलें पाहिजे. त्यावेळीं महाराष्ट्राचा स्वातंत्र्यसूर्य नुकताच अस्तंगत होऊन देश अविंधांच्या तडाख्यांत सांपडला होता. मुसलमानांनीं तरवारीच्या जोरावर हिंदूंची विटंबना करून त्यांच्या धर्मकृत्यांवर घाला घालण्यास आरंभ केला होता. या अंदाधुंदीच्या परिस्थितींचें प्रतिबिंब भास्करानें वर्णिलेल्या पुढील प्रसंगांत पडलेलें दिसून येईल.

एक वेळ मणिकर्णिकेसी असें जात : तंव मानुषें देखिलीं पळत
उदेला आकांतुः एक वेळे ( १३८ )
अक्षय–तृतीएचां दीसीं: विश्वेश्वरा पासीं
बहुतें मारिलें तापसी: शिशुपाळें ( १३९ )
मैत्रा–वरुणा जवळां: भगवंत एक मारीला
तेव्हेळीं मीं पळालां: जीव घेउनी ( १४० )
आरेरे टाकौनि घोडा: म्हणती याचिया जटा उपडा
आतां कें जाइल साबडा: आम्हां पुढें ( १४१ )

हा जो शिशुपाळानें मांडलेला आकांत कवीनें नारदाच्या मुखानें वर्णिला आहे त्यावरून आमच्या मतें तत्कालीन मुसल्मानांच्या जुलुम–जबरदस्तीचाच बोध होतो. भास्कर एखाद्या गांवीं असतांना तेथें अविंधांची धाड आली असावी व

त्या प्रत्यक्ष पाहिलेल्या प्रसंगाचाच परिणाम काव्यांत उमटला असावा. एरव्हीं शिशुपाळ हा जरी फार दुष्ट वर्णिलेला आहे, तरी त्यानें तापसी लोकांना, ब्राह्मणांना वगैरे ठार मारल्याचें मात्र नमूद नाहीं. उलट श्रीकृष्णाला दिलेला अग्रपूजेचा मान एखाद्या ब्राह्मणाला द्यावयाचा होता असेंच त्याचें मत

आवेशौनि चैद्यें म्हणितिलें : या धर्मा कांई जालें
सांडौनि **द्विजकुळें**: एयां पूजा काइसी ( ८६० )

या ओवीवरून स्पष्ट दिसतें. मग ज्याच्या मनांत ब्राह्मणांविषयीं एवढा आदर, तो त्यांना मारील कसा ? शिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, शिशुपाल हा नर्मदा नदीच्या कांठच्या चेदी देशांचा राजा होता; त्यानें काशीविश्वेश्वराकडे उच्छाद मांडला हें म्हणणें तितकेंसें बरोबर दिसत नाहीं. सारांश, वरील सर्व ओव्यांत तत्कालीन परिस्थितीचें--मुसलमानांच्या दंडुकेशाहीचें प्रतिबिंब पडलें आहे असें जें आम्हीं म्हटलें तेंच अधिक सयुक्तिक व बरोबर होय.

## वेदप्रामाण्य.

वरील परिस्थितीप्रमाणेंच भास्कराच्या वेळच्या अनेक गोष्टींचीं चित्रें आपणांस प्रस्तुत काव्यांत पाहावयास सांपडतात. त्यांपैकीं पहिलें महत्त्वाचें चित्र म्हणजे महानुभावपंथांतील लोकांना वेदधर्माविषयीं वाटणारा आदर व जैनपंथासंबंधीं वाटणारा तिरस्कार यांसंबंधींचें होय. प्रस्तुत पंथांतील अनुयायांना आतांपर्यंत आपण अनादरानें दूर लोटीत होतों; कारण आपल्या सनातन वैदिक धर्माविरुद्ध त्यांचें आचरण असतें, अशी आपली चुकीची समजूत होती. पण

जेथ जैन--मार्गाचिया **आड-बिदीं**: वेद-पंथाचिया **राजबिदीं**
तेथ चाल्तसे मांदीः धर्मादिकांची ( ९७ )

या ओवीवरून या पंथांतील मंडळी जैन पंथाला तुच्छ लेखून वेदपंथाला मान देत होती हें स्पष्ट दिसून येतें. आणि हाच त्यांचा वैदिक धर्माविषयींचा आदर

आचारां सकळां: हा साहजेंचि वेगळा
वरि **श्रुति-पंथु सांडिला**: नेणों केवि ( ८६३ )

या उल्लेखावरून तर अधिक स्पष्ट होतो. तात्पर्य, महानुभावपंथ हा वेदधर्मा-विरुद्ध असलेला पंथ तर नाहींच नाहीं, उलट तो वेदांना मान्यता देणारा, श्रुतिमार्ग पूज्य मानणारा पंथ आहे, हें वाचकांना चांगल्या रीतीनें कळून येईल.

## विवाहपद्धति.

भास्कराच्या वेळीं आपली विवाहसंस्था कशी होती हें पाहण्यासारखें आहे. आतांप्रमाणें त्या काळींही बालविवाहाची चाल प्रचलित होती असें दिसतें. त्या वेळची विवाहाची वयोमर्यादा लक्षांत घेतली म्हणजे फार आश्चर्य वाटतें. मुलगा आठ वर्षांचा झाला म्हणजे डोक्यावरून पाणी गेलें, तो घोड किंवा निबर झाला, अशी तत्कालीन लोकांची समजूत होती. रुक्मिणीचें पाणीग्रहण करण्यांत आपण मोठी चूक केली असें कृतकपश्चात्तापानें म्हणणाऱ्या श्रीकृष्णाला उपहास-गर्भ उत्तर देतांना रुक्मिणी म्हणते कीं,

नुजवेची कव्हणें बोलें : आंगां **आठुवर–पण** आलें

' हा ( श्रीकृष्ण ) आठ वर्षांचा तर झाला, पण याच्या लग्नाचें तर कोठेंच कांहींही जुळेना–हा उजवला जाईना–' यावरून मुलगा आठ वर्षांचा झाला म्हणजे त्याचें लग्न झालेंच पाहिजे, त्याला त्यानंतर अविवाहित ठेवतां येत नाहीं, ही त्या वेळच्या लोकांची ठाम ससजूत होती असें दिसून येईल. आणि यदाकदाचित् दैवदुर्विलासानें मुलगा आठ वर्षांचा होईपर्यंत त्याच्या लग्नाचें कोठेंच जमलें नाहीं, त्याला अनुरूप अशी एकादी नोवरी मिळालीच नाहीं, तर

तेव्हेळीं नंदें लग्न लाविलें : तुळसीसी ( २०८ )

त्या मुलाचें तुळशीशींच लग्न लावीत असत, पण त्याला अविवाहित मात्र ठेवीत नव्हते. यावरून ही आठ वर्षांची वयोमर्यादा किती बंधनकारक होती हें दिसून येतें. ही मर्यादा मुलाच्या बाबतींतच नव्हे, तर मुलीच्याही बाबतींत होती. उपवधू वराप्रमाणें उपवर नोवरी देखील आठ वर्षांपेक्षां अधिक वयोवृद्ध ( ? ) असतां कामा नये हें

फुन भुतळी चेआं रायां **अठवरां:** माझेया खांडयाचा करौनि नोवरा
तुआं लग्न लावावें श्रीचक्रधराः उभे आं टाकौनि ( ७२७ )

या धर्मराजाच्या उक्तीवरून सुस्पष्ट होतें. सारांश, वराची किंवा वधूची विवाह-प्रसंगीं कमाल वयोमर्यादा आठ वर्षांपेक्षां अधिक असतां कामा नये अशी त्या वेळची दृढ समजूत होती, आणि तोंपर्यंत जर अनुरूप वर किंवा वधू न मिळाली तर तुळशीच्या झाडाशींच त्याचें लग्न लावणें भाग पडे. पण लग्ना-शिवाय मात्र मुलांना ठेवतां येत नसे.

लग्नापूर्वी, वधूवरांचा संबंध ठरल्याचें निदर्शक म्हणून मुलाच्या घरून मुलीकडे **नेसवणी** म्हणजे साखरचिरडी पाठविण्याचीही पद्धत त्या वेळीं होती असें

ताक–त्रीकतिया गौळणीः देजासि[१] वैकुंठ मनी
ऐसाही याची **नेसवणीः** कव्हणी ने घे ( २०७ )
न घडे चि कव्हणें बोलेंः तेव्हेळीं जुझांचें **देज** दीधलें
मग कन्यारत्न प्रणिलेंः भीमकाचें ( ४४१ )

या ओव्यांवरून समजतें. वराच्या अंगीं हवे असलेले गुण रुक्मिणीच्या

या **कुळ** ना **जातीः रूप** ना **संपत्ती**
गाइराखावेया परतीः आंगवण नाहीं ( २१० )
ऐसेयां आवघेयां जाणतांः गोतां कुटुंबां वारितां
कैसी कासोटेकारा भगवंताः वरिपडी जालिए ( २११ )

या उद्गारांत व्यक्त झालेले आहेत. त्यावरून वराचें कुळ, जात, रूप, संपत्ति व वृत्ति–चरितार्थाचा धंदा ह्या पांच गोष्टी पाहूनच संबंध निश्चित करीत अस-ल्याचे दिसतें. वरील सर्व गुण

कन्या वरयते **रूपं** माता **वित्तं** पिता **श्रुतम्**
बान्धवा**कुल**मिच्छन्ति मिष्टान्नमितरे जनाः ॥

या संस्कृत सुभाषितांतही उल्लेखिलेले आढळतात हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

१. देज—कन्याशुल्क, वराकडून वधूला दिली जाणारी किंमत.

## भोजनगृहांत—

भास्करभट्टाच्या वेळच्या विवाहसंस्थेला भेट देऊन तेथील रीतिरिवाज, नियम वगैरे पाहिल्यानंतर आतां घटकाभर वाचकांना त्या वेळच्या भोजन-गृहांत चला म्हटलें तर, मला वाटतें, ते फार उत्सुकतेनें तयार होतील. पण दुर्दैवानें या पाकशाळेंत षड्रसयुक्त सरस व सुगंधित पक्वान्नें नाहींतशीं पाहून बऱ्याच जणांचा विरस होईल. तरी पण तेथें तयार असलेल्या वरण, मांडे तूपभात, ताकभात इत्यादि अन्नावरच त्यांनीं आपली भूक भागवावी अशी त्यांना आमची विनंती आहे. वास्तविक पाहतां निरनिराळया पक्वान्नांचीं वर्णनें करण्याचा राजसूययज्ञाच्या वेळचा प्रसंग, इतर गोष्टींचा निष्कारण पाल्हाळ करणाऱ्या भास्करानें व्यर्थ घालविला असें आम्हांस वाटतें. त्या वेळच्या भोजनप्रकाराचें वर्णन प्रस्तुत काव्यांत स्वतंत्र रूपानें आढळत नाहीं; तर तें एका रूपकाच्या आश्रयानें केलें गेलेलें दिसून येतें. राजसूययज्ञासाठीं निमंत्रण द्यावयास आलेला धर्मराजाचा दूत ‘ वीरचूड ’ भगवान् श्रीकृष्णाची स्तुति करतांना तें रूपक वापरतो.

तुवां गोकुळीचां **भानवसीं**

या चरणावरून त्या वेळीं स्वयंपाकगृहाला ‘ **भानवस** ’ ही संज्ञा होती असें दिसतें. वीरचूड म्हणतो,

तुवां राया श्रीचक्रपाणी : मथुरे केली रीगवणी
तैं जेऊं सूदलें रणांगणीं : महाकाळांसी ( ४३६ )

भगवान् श्रीकृष्णा ! आपण ज्या वेळेला मथुरानगरींत प्रवेश केला त्या वेळेस सभामंडपांत महाकाळाला जेवावयास बोलावून त्याला

रजकाचें हातवणीं सूदलें : गजमांसाचें **वरण** रांधिलें
तोडौनि **मांडे** घातले : चाणौरमुष्टिकांचे ( ४३७ )

रक्ताच्या पाण्यांत टाकलेल्या ( शिजवलेल्या ) हत्तीच्या मांसाचें वरण व त्याबरोबर चाणूर-मुष्टिकांचे मांडे खावयास दिल्यावर

कंसाचा **तूपभातु**

पानावर वाढला. पण तो देखील

जेउनि ठेला खाखातु

गट्ट करून महाकाळ अर्धपोटी–उपाशीच राहिला; म्हणून सरते शेवटीं

मग तेविसां अक्षौणीचा **ताकभातु** : वरी वाढिला ( ४३८ )

पण तेवढ्यानेंही भूक शांत न झाल्यामुळें त्यानें पुढें आलेल्या काळयवनाचा एकच घांस केला. याप्रमाणें ‘ पुढारले देतसें ढेकरू ’ पुढें झालेल्या त्या महाकाळानें समाधानाचा ढेकर दिला आणि

मग म्हणे श्रीचक्रधरू : विजया हो ( ४४० )

मग ‘ हे श्रीकृष्णा, आतां तुझा विजय असो ’ असा त्यानें तुला आशीर्वाद दिला.’

वरील वर्णनावरून त्या वेळच्या कांहीं भोजनप्रकारांसंबंधीं आपणांस थोडीफार माहिती मिळत असल्याचें वाचकांना दिसून येईल. एक तर ‘ मांडे ’ त्या वेळीं फारच चांगलें पक्वान्न समजलें जात असावें किंवा भास्करभट्टाला तरी त्या पदार्थाची विशेष आवड असावी. एर्‍हीं मांड्यांना त्यानें एवढें महत्त्व दिलें नसतें व त्यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला नसता. दुसरें, आतांप्रमाणें त्या वेळींही मांडे वरणाशीं खाण्याचीच पद्धति होती. वरणमांड्यांच्या भोजनानंतर थोडा तूपभात व शेवटीं आतांप्रमाणें त्या वेळींही ताकभातावर ताव मारीत असत असें दिसतें. ताकभात खाण्याच्या बाबतींत आपण ब्राह्मणांना, विशेषतः कोंकणस्थ ब्राह्मणांना पटाइत समजतों. पण ही चाल कांहीं खास कोंकणची नव्हे, हें त्यांनीं आतां लक्षांत ठेवावें. कोंकणस्थ ब्राह्मण देशावर येऊन वसाहती करण्यापूर्वींच ती इकडे विदर्भांत–देशस्थ ब्राह्मणांत सर्रास प्रचलित होती हें स्पष्ट आहे. असो. भोजनानंतर पाहुण्यांनीं यजमानाला शुभाशीर्वाद देण्याची तत्कालीन पद्धतिही वरील उदाहरणावरून वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

## राजपरिवार

त्या वेळची राजसभा व तिजमधील परिवार पाहण्यासारखा आहे.

नवरत्नांनीं सुशोभित केलेल्या सुधर्मसभेंत ' यादवाची स्थानी ' बसलेली असून तींत कृष्णनाथ उच्च सिंहासनाधिष्ठित झाला आहे आणि त्याच्या भोंवतीं वक्ते **वार्त्तिक** : रसाळ **पुराणिक** विडंबिताती **तार्किक** : महाविद्यांतें (३५०)

साहित्याचेनि परागें ऊटिजे : श्रृंघाराचेनि पाणिए न्हाणिजे
तें कवित्व कानीं आइकिजे : **महाकवींचें** ( ३५१ )

यांचा समाज जमला आहे. त्यांजबरोबर

थापटें मळिवटें : वाहाणधरूं दिवटें
आळि बोलति धाकुटें : विद्यावंतासी ( ३५३ )
हडपी चवरधर : भांडारी खाजेकर
गुप्तिए जुआळिकार : मातुसांघतें
कऱ्हेऱ्ही श्रृंघारकरणी : फुलबडवे हानि–साहानी

हा सर्व राजपरिवार ' रायां श्रीचक्रपाणी : जवळिके असति ( ३५५ ) ' यावरून त्या वेळीं राजदरबारांतील लवाजम्यांत कोण कोण असत याची वाचकांना कल्पना येईलच.

## युद्धसंस्था

पूर्वी हिंदुस्थानांतील बहुतेक राजांना युद्धांत अपजय प्राप्त होण्याचें एक कारण इतिहासकार असें सांगतात कीं, राजा किंवा सेनापति मारला गेला म्हणजे युद्ध आटोपलें अशी हिंदी सैनिकांची समजूत असे. त्यामुळें सेनापति पडतांच आपला पराजय झाला असें समजून ते पळत सुटत. अर्थातच अशा स्थितींत शत्रूला त्यांचा पाठलाग करून शिरच्छेद करण्यास आयतीच संधि सांपडे. हें चित्र भास्करानें या काव्यांत फार चांगल्या रीतीनें वठविलें आहे.

धुर पडीलीया पळती : ऐसां ही नाइकवडी परतती
तरि खांडेन भडाड देती : पंडुपुत्र ( ४९७ )

या ओवीवरून सेनापति पडतांच सर्व सैनिक पळ काढीत व मग शत्रु त्यांना यथेच्छ बडवीत, ही तत्कालीन वस्तुस्थिति चांगली नजरेस येते. त्यावेळच्या युद्धसंस्थेकडे जर सूक्ष्म नजर फेकली, तर त्यांत ' राउत ' ( **घोडेस्वार** ),

' असिकार ' ( खड्गधारी पायदळ) यांच्याबरोबर धनुर्धारी, हत्तीवरील स्वार, रथी इत्यादिही भास्करानें वर्णिलेले दिसून येतात. अर्थात् हें उघड उघड महाभारतकालीन युद्धसंस्थेचें वर्णन होय. इ. स. १३ व्या शतकांत धनुष्यबाण, रथ, हत्ती वगैरेंचा उपयोग प्रत्यक्ष युद्धांत मुळींच करीत नसत. पण ह्या पौराणिक किंवा महाभारतकालीन कित्येक गोष्टी नजरेआड केल्या तर भास्कराच्या वेळीं सैन्यांत

उच्चैश्रवेयाचिए जावळिचे : कांतळे **साब्राणीचे**
**पंचकल्याण** कव्हाइतीचे : राजवाहान ( ९३६ )
सिंधुसागरीचे **बोर** : जालौरीचे **कॅकाण** थोर
ऐसे सांघतां **भेद** अपार : तेजियांचे ( ९३७ )

इत्यादि निरनिराळ्या घोड्यांच्या जातींचा समावेश होत असे हें स्पष्ट दिसून येतें. वीरांना स्फूर्ति यावी म्हणून आज ज्याप्रमाणें बिगुलांचा उपयोग करितात त्याप्रमाणें

तेथ वाजती **शंख काहाळा : तुररिया** डोंडी **खरटियाळा**
**डौंडीची ढवस ढोला : वीरधंटा तांबकिया** ( १०२६ )
**निशान पढोहो भेरी** : राए **गिडगिडीया रणमोहरीं**

इत्यादि रणवाद्यांचा त्या वेळीं उपयोग करीत असत. धर्मराजाच्या राजसूययज्ञासाठीं श्रीकृष्ण चालला असतां त्याच्यापुढें

तंव **डौंडी**ची **वीर-घंटाः** सनसनितीं **जेंगटां**
वाजताती एकदटाः एके वेळें ( ५२२ )
तरारिती **काहाळाः** धुरधुरितीं **टिवाळा**
रणभयासुरा **ढोला** : मेरू थरारी ( ५२३ )
दुमदुमिती **बोंबातिया** : घनघनितीं **तांबकिया**
खिनखिनिंती **तुररिया खरींसगेंसी** ( ५२४ )
डमडमिति **दुडुकाः** कडकडिति **शंखा**
वाजतां ब्रह्मगोळका : तळा पडतसे ( ५२५ )

**ढवस पटहो भेरी** : राए **गिडगिडिया** रणमोहरीं
**निशाणांचा** गजरीं : आकाश फाटे ( ५२६ )

हीं नाना प्रकारचीं वाद्यें वाजत असल्याचें वर्णन भास्करभट्टानें केलेलें आहे. वरील सर्व ओव्यांवरून त्या वेळच्या विविध वाद्यांचीं नांवें व त्यांचे आवाज आपणांस कळून येतात.

सैन्यासाठीं आतांप्रमाणें त्या वेळींही कापडाचे डेरे देत असत हें
सरिसे वेळ करित : **मौळीचिया** सोलां आसुडित
तनियां तनी लागत : दुसें[10] दीधलीं ( ५७१ )

या ओवीवरून सहज लक्षांत येईल. तंबू किंवा डेरे देतांना काय काय करीत असत याचें वर्णन कवीनें ५६९ ते ५७२ ओव्यांत फार चांगलें केलें आहे तें जिज्ञासूंनीं पाहावें.

## कवडे

रावणानें घातलेल्या धुडगुसाचें वर्णन करतांना रावण हा
खांडे धुआवन मागें अंतराळीं : **कवडे** उकळी भूतळीं
रोटी घे सातें पातळीं : दाटुगेपणें ( १६२ )

पृथ्वीवरील लोकांपासून कवडे उकळीत असल्याचें भास्करानें लिहिलें. ह्या व तसेंच ' कैलास वैकुठीं जयांचो सिराणी : तिए रत्नें विकिती **कवडेयानीः** (३३०) ' या उल्लेखांवरून कवीच्या वेळीं कवडे हें चलाऊ नाणें असावें असें वाटतें. ' रत्नें विकिति कवडेनि ' या चरणाचा अर्थ रत्नें कवडीमोलानें विकीत होते, रत्नांना कांहीं ज्यास्त किंमत पडत नसे, असा देखील संभवतो; पण त्यामुळे वाचकांनीं आपली दिशाभूल होऊं देऊं नये. कवडे घेऊन त्याबदला रत्नें देत असत असाच त्याचा स्पष्ट अर्थ आहे. शिवाय भूतलावरील लोकांपासून रावण **कवडे** उकळीत असे, असें म्हणण्याचें तरी भास्कराला कारण काय ?

१०. तंबू.

अर्थात यावरून हाच ध्वनि निघतो कीं, त्या वेळीं कवड्यांत देणेंघेणें होत असावें; कवडे हे त्या वेळचें नाणें असलें पाहिजे, म्हणूनच भास्करानें कवड्यांना इतकें महत्त्व १६२ व्या ओवींत दिलें आहे.

उद्धवदेवाचीए पालखती वरून : घेतला तोडराचा श्रीचरण
सीरावरी ठेविला धरून : घडी एकीं ( ४२८ )

या ओवीवरून त्या वेळची नमस्काराची पद्धत कशी असावी याविषयीं कल्पना येते. विवाहसंस्था, राजपरिवार, चलाऊ नाणें, वाद्यें, नमस्काराची पद्धत इत्यादि पेक्षां अधिक मनोरंजक पद्धति म्हणजे त्या वेळची हजामतीची होय. आजकाल खेड्यापाड्यांतून जर आपण फिरलों तर म्हाली बहुतेक गांवांच्या पाणवठ्यावर बसून लोकांची हजामत करितांना दिसून येतात. हीच पद्धति भास्करभट्टाच्या काळींही असावी. राजसूययज्ञाचें आवतण देण्यास धर्मानें पाठविलेला वीरचूड नांवाचा जासूद भगवान् श्रीकृष्णाची स्तुति करतांना म्हणतो,

कौवडन्यापुरीचा पाणिवथां : **रुक्मियाचा भाद्रैला माथा**
तुवां कापडी केला जगन्नाथा : धारातीर्थांचा

या ओवीवरून त्या वेळीं

## पाणवठ्यावर हजामत

करण्याची चाल होती हें दिसून येईल. असो.

आतांपर्यंत लिहिलेल्या परिच्छेदांवरून भास्कराच्या वेळची बरीचशी माहिती वाचकांच्या ध्यानांत आलीच असेल. हिंदुस्थानांत मुसल्मानांनीं घातलेला गोंधळ, महानुभावांचा वेदपंथाविषयीं आदर, तत्कालीन विवाहसंस्था, भोजनपद्धति, राजपरिवार, सैन्यव्यवस्था, घोड्यांच्या जाती, रणवाद्यें, नमस्काराची पद्धत, हजामत करावयाची जागा इत्यादि अनेक गोष्टी आपण पाहिल्या. यांशिवाय प्रस्तुत काव्यांत नाना ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून त्या वेळीं कारंजीं ( सिंचणारे ) व Shower-baths ( धाराग्रह ) असल्याचेंही दिसून येईल. शिशुपालवधकथेचा अधिक बारकाइनें

अभ्यास केल्यास कदाचित् यापेक्षां आणखीही त्या वेळच्या बऱ्याच गोष्टी निदर्शनाला येण्याचा संभव आहे. जिज्ञासूंनीं व अभ्यासकांनीं तो प्रयत्न अवश्य करावा. प्रस्तुत काव्याचा अभ्यास करितांना भास्करभट्टाच्या काळच्या म्हणून ज्या ज्या गोष्टी आमच्या दृष्टिपथांत आल्या त्यांचा आम्ही वर उल्लेख केलाच आहे. त्यापासून अभ्यासकाप्रमाणें इतर वाचकांचेंही बरेंच मनोरंजन होईल असें वाटतें.

१

# काव्याचें नांव

' उद्धवगीता ' हें भास्करभट्टाचें दुसरें व शिशुपालवधापेक्षां अधिक महत्त्वाचें काव्य होय.उद्धवगीतेलाच ' एकादशस्कंध ' म्हणूनही अनेकदां संबोधण्यांत येतें. किंबहुना उद्धवगीता या नांवापेक्षां एकादशस्कंध हेंच नांव महानुभावपंथीयांत विशेष प्रचलित असलेलें दिसतें. वृद्धाचारवृद्धान्वयादि ग्रंथांत ' एकादस स्कंदा 'चेच उल्लेख आढळतात. हस्तलिखित पोथ्यांच्या शेवटीं देखील ' एवं एकादस संपूर्ण ' असेच समाप्तिलेख आहेत. असें असून देखील प्रस्तुत काव्याला ' उद्धवगीता ' हें नांव देण्याचा आमचा अट्टाहास पाहून कित्येकांना आश्चर्य वाटेल. पण वस्तुतः तसें वाटण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं. मूळ भागवतांतील एकादशस्कंधाची व भास्करभट्टाच्या उद्धवगीतेची तुलना केल्यास मूळांतील फारच थोडे विषय प्रस्तुत ' टीकें ' त आले आहेत हें वरवर पाहणाराच्या देखील सहज लक्षांत येईल. मूळांतील कित्येक अध्यायांना तर त्यानें स्पर्श सुद्धां केलेला आढळत नाहीं. ' पुराण गगनिचा कुमुदबंधु : जो आईकिजे येकादश स्कंदु : तेथ कीजैल प्रबंधु : मुनीजनांलागि ' ( उद्ध. ३६ ) हें आम्हांस मान्य आहे. (मूळ एकादश स्कंधावरील टीकात्मक स्वरूपांतच प्रस्तुत काव्याची रचना भास्करानें केली आहे यांत शंका नाहीं. पण म्हणून आपल्या ग्रंथाला त्यानें नांवसुद्धां तेंच कायम ठेवलें असें मानण्याचें कांहींच कारण नाहीं वर उल्लेखिलेल्या ओवीमधें आपल्या काव्यग्रंथाच्या प्रमुख आधाराचाच काय तो कवीनें उल्लेख केलेला आहे असें मला वाटतें.) काव्य समाप्तीच्या वेळीं, अगदीं शेवटीं आपल्या ग्रंथाच्या नांवाचा निर्देश करण्याची बहुतेक मराठी कवींची पद्धति आहे. शिशुपालवधाचा नामनिर्देश भास्करानें काव्याच्या अखेरीलाच केलेला आहे ( शिशु. १०८७ ) तो लक्षांत घेऊन तदनुरोधानें उद्धवगीतेकडे पाहिलें तर

या आईकतां उद्धवगीता : प्रबोधु उपजे श्रोतेयांचिया चित्ता
परब्रह्मेसीं होय सायोज्यता : म्हणे कवी भास्करू ( ८२७ )

ही शेवटची ओवी अत्यंत महत्त्वाची वाटते. तींत, आपल्या काव्याचें नांव ' उद्धवगीता ' असल्याचें खुद्द कवीच सांगत आहे. इतरांनीं ' एकादशस्कंद ' हें नांव रूढ करण्याचा कितीही यशस्वी प्रयत्न केलेला असला तरी खुद्द भास्करभट्टानें आपल्या या द्वितीयापत्याचें नामकरण ' उद्धवगीता ' असेंच केलें होतें यांत शंका नाहीं. ग्रंथकर्त्याची तशी इच्छा स्पष्ट दिसत असल्यामुळें व इतर दृष्टींनींही एकादशस्कंधापेक्षां ' उद्धवगीता ' हेच नांव अधिक अन्वर्थक वाटल्यामुळें मी तेंच कायम ठेवलें हें सांगावयास नकोच.

२

## आधारभूत ग्रंथ.

शिशुपालवधाला एका दृष्टीनें जसें स्वतंत्र काव्य म्हणतां येतें तसें उद्धवगीतेला मात्र म्हणतां येत नाहीं, प्रस्तुत काव्याच्या ' एकादशस्कंध ' या दुसऱ्या नांवावरून ही गोष्ट स्पष्ट होते, महामुनि व्यासांनीं लिहिलेल्या श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधाच्या आधारें भास्करभट्टानें उद्धवगीतेची रचना केलेली आहे. खुद्द कवीला या बाबतींत सरळ प्रश्न टाकला तर त्याचें

एकादशेसीं सरिसीं : भाजुनी साहित्य देशी
मियां आवारू केलें जगासि : ज्ञान–अमृताचें ( ८२६ )

असेंच सरळ उत्तर तो हडसून खडखून देतो. ' पुराण गगनीचा कुमुदबंधुः जो आईकिजे येकादश स्कंदुः तेथ कीजैल प्रबंधुः मुनीजनांलागी ' ( ३६ ); ' हा संवादु श्रीकृष्णोद्धवाचाः मियां बोलिला प्राकृता वाचा : परि वोडौ सुकोक्तीचा : ठाको नेदी ' ( ८२४ ) इत्यादि ओव्या सुद्धां वरील विधानाचाच पाठपुरावा करितात. तात्पर्य, उद्धवगीतारूपी महावस्त्राची वीण, व्यासविरचित भागवताच्या एकादशस्कंधामधील श्लोकांवरून उचललेल्या कल्पनांच्या रेशमी तंतूंनीं झालेली आहे यांत शंका नाहीं. या महावस्त्राला महत्त्व व शोभा प्राप्त करून देण्यासाठीं

महानुभावीय तत्त्वज्ञानाचा मोहक रंग व स्वतःच्या प्रतिभेनें निर्माण केलेल्या उपमादृष्टांतादि अलंकारांचीं जरतारी फुलें त्यावर कवीनें काढलेलीं असलीं तरी त्यामुळें मूळ तंतूंचें महत्त्व यत्किंचितही कमी होत नाहीं. रंग चढविणाऱ्या केशरापेक्षां, बासुंदींत सत्त्व निर्माण करणाऱ्या दुधाला अधिक किंमत असते. उद्धवगीतेच्या बाबतींतही आपणांस असेंच म्हणावें लागतें. या काव्याचा मूळ मालमसाला भास्करानें भागवतावरून उचलेला असल्यामुळें तिकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यादृष्टीनें आपल्या विवेचनाचा व परीक्षणाचा दृष्टीकोण देखील आपणांस बदलविला पाहिजे. सर्वांगस्वतंत्र काव्यकृतीचें महत्त्वमापन करण्याचीं तंत्रें घटकाभर बाजूस ठेवून प्रस्तुत काव्याची मूळ काव्याशीं, कथासंगतीच्या दृष्टीनें, संक्षेपविस्ताराच्या दृष्टीनें व काव्यमयतेच्या दृष्टीनें तुलना करून पाहणें अधिक इष्ट व प्रस्तुत होईल असें मला वाटतें. श्रीमद्व्यासाव्यतिरिक्त ज्या इतर अनेक लेखकांचें व कवींचें सहाय्य आपल्या कवीनें घेतलें आहे त्यांचा उल्लेख व त्यासंबंधीं विस्तृत विवेचन यथाक्रम करण्यांत येईल. त्यापूर्वी मूळ भागवतांतील एकादशस्कंध व भास्करभट्टाची उद्धवगीता यांचें तुलनात्मक निरीक्षण व परीक्षण करणें अत्यंत आवश्यक आहे.

## उद्धवगीतेचें वैशिष्ट्य

एकादशस्कंधावरील प्राकृत टीका अथवा त्याचें मराठी रूपांतर म्हणून कालक्रमाच्या दृष्टीनें उद्धवगीतेकडे नजर फेकली तर तिचा एक विशेष तात्काळ डोळयांत भरतो. तो असा कीं या अकराव्या स्कंधावर निर्माण झालेल्या अनेक टीकात्मक ग्रंथांत, गुणाच्या दृष्टीनें जरी नाहीं तरी क्रमाच्या दृष्टीनें मात्र उद्धवगीतेचा क्रमांक अगदीं पहिला आहे. महानुभावीयेतर मराठी वाङ्मय जमेस धरून, भागवताच्या मराठी अवतारांचें प्रो. बनहट्टींनीं जें मार्मिक समालोचन केलें आहे त्यावरून एकनाथांचें भागवत हाच एकादशस्कंदाचा पहिला मराठी अवतार होय असें दिसतें (म.का.वि. पृ. १८). तत्पूर्वी बहिरंभट किंवा बहिरा पिसा ऊर्फ जातवेद नामक ब्राह्मणानें शके १३०० च्या सुमारास भागवताच्या दशमावर 'एक गोड टीका' लिहिल्याचा उल्लेखही त्यांनीं तेथें

केलेला आहे. भागवताच्या एका अंशाचा का होईना पण स्वतंत्र ग्रंथाच्या रूपानें झालेला भागवताचा तो पहिलाच अवतार होय असें त्यांच्या विवेचना-वरून वाटतें. महानुभाव वाङ्मयाच्या उपलब्धीनें हीं दोन्ही मतें आतां चुकीचीं ठरलीं आहेत. दशमस्कंधांतर्गत रुक्मिणी-स्वयंवर कथेच्या आधारानें लिहिलेल्या महदंबेच्या धवळयांनाच आतां भागवताच्या प्राकृत प्रथमावताराचें श्रेय देणें प्राप्त आहे. हे धवळे शके १२०८ पूर्वीच्या सुमारास लिहिलेले आहेत. त्यानंतर फारच थोड्या वर्षांनीं शके १२१३ मधें प्रसिद्ध महानुभाव कवी ' नरेंद्र ' याचा त्याच रुक्मिणीस्वयंवर कथेवरील बृहत्काव्यग्रंथनिर्माण झाला. ही गोष्ट दशमस्कंधाविषयीं झाली. पण एकादशस्कंधावर मात्र उद्धवगीतेखेरीज दुसरी कोणतीच मराठी टीका तत्पूर्वी निर्माण झाली नाहीं असें उपलब्ध पुराव्यावरून निश्चितपणें सांगतां येतें. म्हणून एकादशाला प्राकृत पेहेराव प्रथम चढविण्याचें श्रेय भास्करभट्टालाच दिलें पाहिजे यांत शंका नाहीं. मराठी वाङ्मयाच्या उद्या-नांत काव्यव्याकरणादि साहित्य-विभागांच्या फुलझाडांचीं जीं कित्येक कलमें अगदीं पहिल्यानें लावण्याचा मान महानुभाव महंतांनीं मिळविला आहे त्यांत भागवताचें मराठीकरण व विशेषतः एकादशाला देशी साहित्याचा शृंगारसाज चढविण्याच्या उपक्रमरूपी पुष्पवृक्षविशेषांचाही अंतर्भाव होतो हें लक्षांत ठेवा-वयास पाहिजे. नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवरामुळें पहिलें ललितकाव्य निर्माण कर-ण्याचें श्रेय जरी आपल्या या प्राकृत कवीकडून हिरावून घेतलें गेलें असलें तरी एकादशाच्या देशीकरणाला प्रथम प्रारंभ करण्याच्या मानाचें पान मात्र आपणाला भास्करभट्टालाच अर्पण करावें लागतें. त्यामुळें भास्करभट्टाच्या काव्य-कर्तृत्ववृक्षाला लागलेलें एक वैशिष्ट्यपरिपूर्ण फळ म्हणजे त्याची ही ' उद्धव-गीता ' असें म्हणावयास हरकत नाही.

या काव्यापूर्वी भागवताच्या एकादशस्कंधाचें मराठी रूपांतर झालेलें नव्हतें ही एक गोष्ट ध्यानांत ठेवली म्हणजे मूळ भागवताशिवाय दुसऱ्या एखाद्या देशी ग्रंथाचा उद्धवगीतेच्या रचनेला प्रत्यक्ष व प्रामुख्यानें उपयोग झाला असेल असें मानण्याचें कारणच राहत नाहीं. काव्यकल्पनांचा परिपोष करण्यासाठीं त्यानें आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या कवींच्या कृतींचा उपयोग

केलेला आहे यांत शंका नाहीं. त्यांचा आपण पुढें विचार करूंच. पण उद्धवगीतेच्या दृष्टीनें साहित्यशृंगार दुय्यम दर्जाचा असल्यामुळें मूळ अंतरंगाचें परीक्षण करतांना या बाह्य लेण्यालुगड्याचा विचारच करावयास नको. प्रमुख विषयाच्या दृष्टीनें उद्धवगीता भागवतमय आहे असेंच दिसून येतें. आपल्या ग्रंथाच्या शेवटीं तर कवीनें

> पाहुनि तें तें प्रकरण : जें बोलिलें भक्तिज्ञानवैराग्य लक्षण
> तें पांतु विचक्षण : ग्रंथवेत्ते ( ८२५ )

अशी स्पष्ट शब्दांत विचक्षण वाचकांना विनंतीच केलेली आहे. त्यावरून उद्धवगीतेची रचना करतांना भास्करानें भागवताचें मूळ समोर ठेवलें होतें हें सहज लक्षांत येतें. पण ' तें तें प्रकरण पाहून ' मी माझ्या काव्याची गुंफण केलेली आहे हें कवीचें म्हणणें अगदीं अक्षरशः खरें नाहीं. कित्येक ठिकाणीं त्यानें मूळांतील कांहीं अध्यायांना स्पर्श सुद्धां केलेला आढळत नाहीं तर कुठें कुठें मूळांत मुळींच नसलेल्या गोष्टी स्वतःच्या विवेचनाला अनुकूल होतील अशा रीतीनें वर्णन केलेल्या आहेत. बऱ्याच जागीं व्यासविरचित अध्यायांना संक्षेपाची कातर लावलेली दिसते, तर क्वचित संस्कृत कवीनें एकाच अनुष्टुपांत आटोपलेला कथाभाग विस्तारानें वर्णन करण्यांत त्यानें पन्नास पन्नास पाउणशें पाउणशें ओव्या खर्ची घातल्या आहेत असें दृष्टोत्पत्तीस येतें. सारांश एखाद्या संस्कृत ग्रंथाचें कांहीं एका विशेष हेतूनें रूपांतर करतांना टीकाकारास जे कित्येक फेरफार करणें आवश्यक वाटतें ते सर्व फेरफार भास्करानें केलेले आहेत. या संक्षेपविस्तारादि फेरफारांचें तुलनात्मक विवेचन करण्यापूर्वी उद्धवगीतेचीं प्रकरणें व त्यांना आधारभूत असलेले एकादशस्कंधांतर्गत अध्याय व श्लोक यांचें स्थूलमानानें तयार केलेलें एक कोष्टक अभ्यासकांच्या सोयीसाठीं खालीं देत आहे. त्याकडे त्यांनीं अवश्य लक्ष पुरवावें.

| उद्धवगीता | भागवत |
| --- | --- |
| प्र. १ ते १० प्रास्ताविक विभाग | मूळांत आधार नाहीं. ✓ |
| प्र. ११. ओवी ४१.<br>प्र. १२.<br>प्र. १३. ( ५४ व्या ओवीपर्यंत ) | अ. १. |

| उद्धवगीता | भागवत |
| --- | --- |
| प्र. १३. (५५ व पुढील ओव्या) व १४ ते १९. | अ. ६. श्लो. २१ ते ५० |
| प्र. २०–२२ | अ. ७ श्लो. ६–१३ |
| प्र. २३–२४ | अ. ७ श्लो. १४–२३ |
| प्र. २५–३८ | अ. ७ श्लो. २५–३८ |
| प्र. ३९–४८ | अ. ८ पूर्ण. |
| प्र. ४९–६३ | अ. ९ पूर्ण व अ. १२ श्लो. १–२ |
| प्र. ६४–८० | मूळांत आधार नाहीं. |
| प्र. ८१–८२ | अ. १३ श्लो. ८ ते ३ |
| प्र. ८३–८६ | अ. १४ पूर्ण. |
| प्र. ८७–९० | अ. १३ श्लोक १४ ते ४२ |
| प्र. ९१ | अ. १५ |
| प्र. ९२–९३ | अ. १६ |
| प्र. ९४–९५ | अ. १७ व १८ |
| प्र. ९६–९७ | अ. १९ |
| प्र. ९८–९९ | अ. २३ |
| प्र. १००–१०२ | अ. २५ व २६ |
| प्र. १०३–१०५ | मूळांत आधार नाहीं |
| प्र. १०६–१०७ | अ. २७ |
| प्र. १०८–११२ | अ. २९ श्लो. २९–३१ |

या कोष्टकाकडे जर बारकाईनें पाहिलें तर मूळांत जे फरक केल्याचें आम्ही वर दाखविलें आहे त्यांचें स्थूल स्वरूप वाचकांच्या सहज लक्षांत येऊं शकेल असें वाटतें. त्यांचेंच विशेष विवेचन पुढील भागांत करण्याचें योजिलें आहे. तरी त्यांजकडे आतां आपण क्रमशः वळूं.

## गाळीव खातें

पैकीं मूळांतील जो भाग भास्करभट्टानें समूळ गाळला आहे त्याकडे परीक्षकाचें लक्ष अगोदर वेधतें. उद्धवगीतेच्या प्रमुख विषयाचा प्रारंभ करतांना कवीनें एकादशांतील पहिल्या अध्यायाचा पूर्णपणें उपयोग करून घेतलेला आहे

पण पुढील दोन ते पांच, या चार अध्यायांचा या मराठी रूपांतरांत कुठें मागमूस सुद्धां आढळत नाहीं. या विभागांत कवि, हरि, अंतरीक्षादि नऊ ऋषभ-कुमारांनीं विदेहाजवळ विस्तृतपणें विवेचिलेल्या भागवतधर्माच्या स्वरूपाचा समावेश होतो. त्यावर आपल्या कवीनें केवळ संक्षेपाची कातरच नव्हे तर समूळ उच्छेदनाचा तीक्ष्ण व कठोर कुठारच चालविलेला आहे. आणि एका दृष्टीनें भास्कराचें हें कृत्य समर्थनीय वाटतें. एकादशांतील पहिल्या सहा अध्यायांच्या रचनेकडे व सूत्रबद्धतेकडे जर आपण सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर पहिल्या अध्यायांत तुटलेला कथेचा धागा व्यासांनीं बरोबर सहाव्या अध्यायांत पुन्हा उचललेला दिसून येईल. त्यामुळें मधले ऋषभकथानकाचे हे चार अध्याय मूळांतून अजिबात काढून टाकले तरी एकादशाच्या कथासंगतीला ढळ पोंचून त्याच्या रचनेंत शैथिल्य निर्माण होतें असें मुळींच वाटत नाहीं. किंबहुना, एकादशांतील श्रीकृष्णोद्धवाच्या प्रश्नोत्तर–स्वरूप–सूत्रांत गुंफिलेल्या तत्त्वसिद्धांताच्या मनोहर मौक्तिकमालेकडे लक्ष दिल्यास हे चारही अध्याय आगंतुक वाटतात असेंच कोणीही म्हणेल. यांतील कथाभाग नारदानें वसुदेवास सांगितलेला आहे, तर तदितर अध्यायांतील अनेक आख्यानांची उकल व आध्यात्मिक तत्त्वज्ञानाची फोड श्रीकृष्णानें उद्धवास करून दाखविली आहे हा फरक लक्षांत घेतला तर एकादशस्कंधाच्या सुसूत्रतेंत या ऋषभोपाख्यानानें निर्माण केलेली विसंगती बोचक वाटत नाहीं काय ? भागवत धर्माचें स्वरूप, माया व तिचा तरणोपाय, परब्रह्मस्वरूपाचें विवेचन इत्यादि दृष्टींनीं हें आख्यान अत्यंत महत्त्वाचें आहे यांत संशय नाहीं. परंतु रचनेच्या दृष्टीनें त्याचा प्रवाह मूळ स्वरूपांत विलीन झालेला नसल्यामुळें तो सहज फुटून दिसतो. आणि म्हणूनच मूळ ग्रंथाच्या सुसंबद्धतेंत असंबद्धता उत्पन्न करणाऱ्या या कथानकाला आपल्या कवीनें अर्धचंद्र दिला असावा असें वाटतें. श्रीकृष्णानें उद्धवास केलेल्या उपदेशाचाच एकादशांत समावेश होतो असें त्यास वाटलें असावें व त्यामुळेंच आपल्या या प्राकृत रूपांतरास ‘ एकादशस्कंध ’ असें नांव न देतां ‘ उद्धवगीता ’ हें नांव त्यानें दिलें असावें असा तर्क करणें चुकीचें होणार नाहीं. असो.

नारदानें वसुदेवास सांगितलेल्या या ऋषभोपाख्यानाच्या चार अध्यायां-

शिवाय १०, ११, १२ ( उत्तरार्ध ), २०, २१, २२, २४ व २८ या अध्यायांचाही भास्करानें गाळीव खात्यांत समावेश केल्याचें वरील कोष्टकावरून दिसून येतें. या संबंधांत एक गोष्ट मात्र स्पष्टपणें सांगावयास पाहिजे. ती अशी कीं या अध्यायांतील विवेचनाची छाया उद्धवगीतेवर पडलेली नाहीं असें आम्ही म्हणत नाहीं. रूपांतराच्या किंवा टीकेच्या दृष्टीनें त्यांचा जसा प्रत्यक्ष उपयोग ग्रंथकारानें करून घ्यावयास पाहिजे–किंवा इतर अध्यायांचा भास्करानें जसा स्पष्ट व प्रत्यक्ष उपयोग केलेला आहे तसा मात्र या अध्यायांचा केलेला नाहीं, इतकेंच आमचें म्हणणें. १० व्या अध्यायांत सद्गुरूच्या उपासनेचा विषय आलेला आहे. (पण महानुभावांत एका परमेश्वराशिवाय इतर कोणत्याही देवतेची किंवा जीवाची उपासना मोक्षप्रद मानलेली नसल्यामुळें सद्गुरुसेवेला विशेष महत्त्व नाहीं. याच कारणामुळें हा १० वा अध्याय भास्करानें गाळला असावा.) ११ व्या व १२ व्या अध्यायांत क्रमशः जिवाशिवाच्या द्वैताद्वैताचा व आत्म्याच्या कर्तृत्वाकर्तृत्वाचा प्रश्न मूळांत विवेचिलेला आढळतो. भास्करानें ह्या प्रश्नांचें विवेचन महानुभावतत्त्वज्ञानाला धरून केलेलें असल्यामुळें भागवतांतील मूळाचा प्रत्यक्ष आधार त्यानें घेतलेला नाहीं. तरी दोहोंतील विवेचनाचा विषय एकच असल्यामुळें मूळांत व प्रतिकृतींत बरेंच साम्य आहे यांत शंका नाहीं. ११ व्या व १२ व्या अध्यायाची जी स्थिति तीच २०; २१; २२; २४ व २८ या अध्यायांची आहे एवढेंच सांगणें या ठिकाणीं पुरेसें वाटत असल्यामुळें त्यांच्या विवेचनाच्या विस्तारांत न पडतां या गाळीव खात्याचा निरोप घेऊन आपण स्वतंत्र खात्याकडे वळूं या.

## स्वतंत्र प्रकरणें.

उद्धवगीतेंतील ज्या विभागांना मूळ भागवताचा आधार नाहीं त्यांचा उल्लेख वरील कोष्टकांत आलाच आहे. त्यावरून पहिलीं १ ते १० प्रकरणें, ६४ ते ८० व १०३ ते १०५ हीं प्रकरणें स्वतंत्र आहेत असें सामान्यतः म्हणावयास हरकत नाहीं. परंतु मूळ विषयाच्या दृष्टीनें विचार केला असतां या उपरिनिर्दिष्ट प्रकरणांत विशेष ‘ स्वातंत्र्य ’ आहे असें मात्र मानतां येत नाहीं.

पहिलीं १ ते १० प्रकरणें अगदीं प्रास्ताविक स्वरूपाचीं असल्यामुळें तीं स्वतंत्र असणें इष्ट– इतकेंच नव्हें तर अपरिहार्यही होतें. त्यांत महानुभावांच्या पंचकृष्णांपैकीं श्रीदत्तात्रेय, श्रीकृष्ण व श्रीचक्रधर हे तीन कृष्ण व श्रीनागदेवाचार्य यांच्या वंदनाच्या ओव्या, कवीची विनम्रता, त्याच्या कवितेचें सरसत्व, श्रोत्यांना सावधान राहण्याविषयीं प्रार्थना, कथामहत्त्व इत्यादि विषयांचा समावेश होतो. यांस मूळांत आधार असणें शक्य नव्हतें व तसा तो नाहींही. त्यामुळें हीं प्रकरणें भास्कराचीं स्वतःचीं अतएव स्वतंत्र आहेत यांत शंका नाहीं. आतां पूर्णपणें विषयापेक्ष दृष्टी ठेवून, आम्हीं स्वतःच स्वतंत्र म्हणून उल्लेखिलेल्या विभागांचा विचार केला तर काय दृष्टोत्पत्तीस येतें तें पाहूं. ६४ ते ८० या प्रकरणांत जीवदेवताव्यावृत्ति, जीवब्रह्माच्या अभेदाचे खंडन व भेदाचें समर्थन, जीवाकडून होणारी प्रपंचरचना व जीवाच्या चतुर्विध कर्मफळाचें निरूपण, इतके विषय आलेले आहेत व त्यांचे विवेचन महानुभावांच्या द्वैतवादास अनुसरून झालेलें आहे. या प्रकरणांत प्रतिपादलेल्या मतांच्या दृष्टीनें विचार केला तर त्यांना भागवतांत प्रत्यक्ष आधार सांपडत नाहीं ही गोष्ट खरी आहे. पण केवळ स्थूल विषयांच्या दृष्टीनें पाहिलें तर मात्र या प्रकरणांचें अधिष्ठान सामान्यतः एकादशाच्या अकराव्या अध्यायांतील पहिल्या दहा श्लोकांवर आहे असें म्हणतां येतें. भागवत व उद्धवगीता यांच्या या विभागांत बरेंच साम्य आहे. तत्रापि भास्कराच्या विवेचनाची दिशा व मतांचा भिन्नपणा लक्षांत घेतला पाहिजे. आणि तसें केलें म्हणजे उद्धवगीतेंतील हीं प्रकरणें स्वतंत्र मानावयास हरकत राहत नाहीं. वर दाखविलेल्या, भागवताच्या व उद्धवगीतेच्या विभागांतील विषयांत किंचित्साम्य असल्यामुळेंच भास्कराच्या या कांहीं प्रकरणांचें स्वतंत्रत्व काढून घेणें केव्हांही इष्ट होणार नाहीं असें मला वाटतें. यापुढील १०३ ते १०५ या प्रकरणांत संसारावर भुजंगाचें रूपक करून त्याचें विष उतरविणाऱ्या श्रीकृष्णरूपी पंचाक्षऱ्याचें सुंदर वर्णन आलें आहे. यालाही मूळांत आधार नसल्यामुळें तीं पूर्णपणें स्वतंत्र आहेत.

## संक्षेप

भास्करानें मूळ भागवतांतील कांहीं भाग ज्याप्रमाणें अजीबात गाळले

आहेत त्याप्रमाणें कित्येक ठिकाणीं संक्षेपाची कातरही त्यानें चालविली असल्याचा उल्लेख मागें केलाच आहे. हे संक्षेप करण्यांत कवीनें कमालीचें व कल्पनातीत कौशल्य प्रगट केलें आहे यांत शंका नाहीं. केवळ श्लोकसंख्येच्या दृष्टीनें विचार केला तर व्यासाचा बृहद्ग्रंथ कोठें व भास्कराची ही लहानशी उद्धवगीता कोठें!! पहिल्याची श्लोकसंख्या १३६७ आहे तर दुसऱ्यांत फक्त ८२७ च ओव्या आढळतात. भास्करानें आपल्या गीतेच्या आरंभीं लिहिलेल्या प्रास्ताविक विभागाच्या ओव्या लक्षांत न घेतल्या तर मूळ एकादशाचें सार त्यानें जवळ जवळ निम्म्या ओव्यांतच आणलें आहे असें सामान्यतः म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. आणि त्यांतही त्यानें मधून मधून उपमादृष्टांतादि अलंकाराच्या ज्या चंद्रज्योति स्वतंत्रपणें उडवित्या आहेत त्या वगळल्या म्हणजे मूळाची ही प्राकृत पण संक्षिप्त व रूपांतरित आवृत्ति तयार करतांना कवीला किती संक्षेप करावा लागला असेल याची कल्पना येते. मूळ व रूपान्तर समोर टेवून वर दिलेल्या कोष्टकाच्या साह्यानें जर प्रत्येक अध्यायाचें निरीक्षण केलें तर, चोवीस गुरूंचीं प्रकरणें ज्यांत आलेलीं आहेत ते (७, ८ व ९) अध्याय सोडून इतर बहुतेक अध्यायांचें तात्पर्य भास्करानें फार थोडथोडक्यांत आणल्याचें दिसून येईल. हें चांगलें लक्षांत येण्यासाठीं मूळांतील कांहीं अध्यायांचें व उद्धवगीतेचें श्लोकसंख्येच्या दृष्टीनें तुलनात्मक निरीक्षण खालीं थोडक्यात देत आहे.

| मूळ | उद्धवगीता |
|---|---|
| अ. १५ एकंदर श्लो. ३६ | प्र. ९१. एकंदर ओ. ६ |
| अ. १६ श्लो. ४४ | प्र. ९२-९३. ओ. ८ |
| अ. १७ व १८. श्लो. १०६ | प्र. ९४-९५. ओ ४ |
| अ. १९ श्लो. ४६ | प्र. ९६-९७ ओ. १२ |
| अ. २३ श्लो. ६२ | प्र. ९८-९९. ओ. १७ |

या तत्त्यावरून आपल्या कवीनें मूळांतील विषय अगदीं थोडक्यांत आणल्याचें सहज दिसून येतें. असें करतांना कित्येक ठिकाणीं अध्यायचा अध्याय एखाद्या दुसऱ्या ओवींत रूपांतरित करण्याचा प्रयत्न त्याला करावा लागला. उदाहरणार्थ

पहिलाच अध्याय पहा. ऐश्वर्य--मदानें उन्मत्त झालेल्या यादवांचा नाश करण्या-साठीं श्रीकृष्णानें ब्रह्मशापाचें निमित्त घडवून आणलें. हा शाप यादवांना कोणीं, केव्हां व कां दिला ? असा प्रश्न परीक्षितीनें केल्यावरून श्रीशुकाचार्य तो वृत्तांत साद्यंत स्वरूपांत या अध्यायांतील ८ ते २४ श्लोकांत वर्णन करितात. उद्धव-गीतेंतील प्रतिपाद्य विषयाच्या दृष्टीनें भास्कराला हा इतिहास विस्तारानें वर्णन करण्याची आवश्यकता वाटली नाहीं म्हणून

तेह्वळि ब्राह्मणाचेनि शापानळें : यादव-वन वनविलें

या एक चरणांतच तो सगळा कथाभाग त्यानें ध्वनित केला व एकदम

मग नेणतयाचेया ऐसें बोलिलें : सभेमाजि ( ५४ )
यथ उपाओ नाहीं ऐसा
जेणें चुके ब्राह्मणाचा शापु धारसा
म्हणौनि जाइजैल प्रभासा : आवघां जनीं ( ५५ )

या सहाव्या अध्यायांतील कथानुसंधानावर झेप घातली ( पहाः शापश्च नः कुल-स्यासीद्ब्राह्मणेभ्यो दुरत्ययः ॥ न वस्तव्यमिहास्माभिर्जिजीविषुभिरार्यकाः । प्रभासं सुमहत्पुण्यं यास्यामोऽद्यैव माचिरम् ॥ भाग. ६-३४, ३५ ) तसेंच १५ व्या अध्यायांत आलेल्या अनंतसिद्धींच्या वर्णनाचा ग्रंथ त्यानें ' आणिमा गीरिमा : प्रकाया-प्रवेशि लघिमा : या आदिकरूनि आत्मारामा : विघ्नरूपा जाण ॥ या सिद्धींचा फळभारू न भोगी तो योगीश्वरू : ' ( ६८८, ६८९ ) या दीड ओवींत आटोपून पुढें ' जैसा चारा नेघे चकोरु : कमळनळांचा ' इत्यादि उपमा त्यानें पदरच्या घातल्या आहेत. १७ व १८ या अध्यायांनाही भास्करानें फार संक्षेप दिलेला आहे. या दोन्ही अध्यायांतील १०६ श्लोकांत विशेष विस्तारानें आलेलें आश्रमधर्माचें सर्व वर्णन त्यानें ७०२, ७०३ व ७०४ या तीनच ओव्यांत आटोपलेलें आढळतें. सारांश, मूळ एकादशांतील अध्यायचे अध्याय भास्करानें दोनदोन चारचार ओव्यांत आणल्याचें जें विधान आम्हीं केलें आहे त्याची सत्यता वरील विवेचनावरून वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. हे सर्व संक्षेप करतांना कवीनें आपल्या ओव्यांत अर्थ अगदीं खेंचून भरला आहे हें सांगावयास नकोच. यावरून आणखीही एक गोष्ट

स्पष्ट होते कीं उद्धवगीतेला एकादशाचें भाषांतर मुळींच म्हणतां येत नाहीं. म्हणूनच आम्हीं प्रत्येक ठिकाणीं ' रूपांतर ' हा शब्द वापरण्याची काळजी घेतली आहे. नेहमीं प्रमाणें ' भाषांतर कीं रूपांतर ' या वादाच्या भानगडींत न पडतां, भास्करभट्ट हा केवळ भाषांतऱ्या कवि नाहीं एवढेंच विधान या ठिकाणीं नमूद केलें तर त्यांतील भावार्थ वरील विवेचनावरून रसिक व सूज्ञ वाचकांच्या लक्षांत येईल असें वाटतें.

## विस्तार

संक्षेपाच्या दृष्टीने, अळीचे रूप घेऊन लहानशा बोरांत लपून बसलेल्या तक्षक नागराजाप्रमाणे कित्येक अध्यायचे अध्याय उद्धवगीतेंत एकेक दोनदोन ओव्यांच्या रूपानें जसें सामावून बसलेले आढळतात तसें एकेक श्लोकबीजसुद्धां प्रचंड वृक्षाच्या स्वरूपांत कांहीं ठिकाणीं विस्तारलेलें आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें. आपल्या अंतःकरणांत उचंबळलेल्या भावनांच्या सरितेला महामूर पूर आणण्यासारखा विषय हाताशीं सांपडल्याबरोबर कवीच्या काव्यसागराला ताबडतोब भरती येते. पदलालित्याच्या नयनमनोहर नर्तनानें रसिकांचें हृदय उल्लोलित करणाऱ्या कल्पनालहरींनीं तो एकसारखा हेलावत राहतो. अशा या काव्यसागराच्या धीरगंभीर व सुरेल संगीतानें कोणत्या सहृदय काव्यमर्मज्ञाच्या अंतःकरणास अननुभूत आनंदाचा अनुभव येणार नाहीं ? भास्करानें विस्तारलेल्या या काव्य-विभागांत कवीच्या दुर्दम्य मनोभावनांचे यथातथ्य प्रतिबिंब पडलेलें असल्यामुळें त्यांना एक प्रकारचें अभिनव सौंदर्य प्राप्त झालें आहे. विशेष विस्ताराचें असें एक ठळक उदाहरण ऋष्यशृंगाच्या कथानकाचें होय. ' शृंघारिया ' म्हणून गुरूनें गौरविलेला हा कलावंत कवि रसराजाच्या विविध वर्णनप्रसंगांत आपलें अंतःकरण ओतून त्यांत तो कसा रंगून जातो हें शिशुपाळवधावरून फार चांगलें दिसून येतें. पण उद्धवगीता ही निवृत्त ' मुनीजनांलागि ' रचावयाची असल्यामुळें व तिचा विषय केवळ तत्त्वज्ञानप्रधान असल्यामुळें आपल्या प्रतिभेचा हा विशेष गुण प्रगट करावयास त्यास या काव्यांत फारशी जागा सांपडणें शक्य नव्हतें. पिंगळा व ऊर्वशी यांच्या कथा एकादशांत

असल्या तरी त्यांचें पर्यवसान थोड्या निराळ्या स्वरूपाचें असल्यामुळें भास्कराला त्यांत स्वारस्य वाटलें नसावें. पण 'पात्रकलिका नायिकेनें ऋष्यशृंगासारखा तपोधन ऋषी क्रीडाकुरंग कसा केला' ही कथा दृष्टीस पडतांच मात्र त्याची प्रतिभा पल्लवित झाली आणि तिनें एका झपाट्यासरशीं पन्नास सुंदर ओव्या निर्माण केल्या. या ओव्यांना मूळांतील आधार पाहिला तर केवळ

नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम्
आसां क्रीडनको वश्यः ऋष्यशृंगो मृगीसुतः ॥ ८–१८.

हा एकादशांतील एकच एक श्लोक आढळून येतो. हा वर्णनविस्तार कवीनें दुसऱ्या एखाद्या ग्रंथाच्या साह्यानें केला असणें संभवनीय आहे. परंतु मूळ भागवतांतील अकराव्या स्कंधांतील अनुष्टुपाच्या तुलनेनें पाहिलें असतां विस्ताराचें एक सुंदर उदाहरण म्हणून या कथाभागाचा उल्लेख करावयास कांहींच हरकत नाहीं.

ऋष्यशृंगाच्या कथेप्रमाणें, विस्ताराचें दुसरें एक उदाहरण उद्धवाच्या शोकाचें देतां येईल. पृथ्वीतलावरील आपलें अवतारकार्य संपवून निजधामास जाण्याच्या तयारीस लागलेल्या श्रीकृष्णचक्रवर्तीच्या भावी विरहकल्पनेनें व्यथित झालेल्या उद्धवाचे उद्गार मुळांत अ. ६, ४३ ते ४९ या सात श्लोकांतच काय ते आलेले आहेत. पण त्यांच्याच पायावर ७१ ते १५३ (प्र. १६-१७) या उण्यापुऱ्या ८० ओव्यांची कवीनें उठवलेली इमारत पाहून त्याच्या रचनाचातुर्याबद्दल आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. मूळांतील श्लोकांत करुणापेक्षां शांतरसाची छाया अधिक आहे. पण भास्करानें प्रसंगोचित अशा करुणरसालाच या ठिकाणीं विशेष उत्कटत्वानें उठाव दिल्यामुळें त्याचें वर्णन अधिक हृद्य व काव्यमय वाटतें. वियोगाच्या नुसत्या कल्पनेनें मूर्च्छित झालेल्या भक्तचूडामणि उद्धवाला सावध केल्यानंतर हळूच 'उघडोनि डोळे' त्यानें जें करुणरसपरिप्लुत उद्गार काढले आहेत ते व परमेश्वराशिवाय जगांत

तुवां विण श्रीरंगा : विजयश्री गेली भंगा
सत्त्वाची गगनगंगा : आजि आटली (९५)
सौंदर्य शिळावलें : औदार्य स्तवलें
पडप गेलें : वीरश्रियेचें (९८)

इत्यादि ओव्यांत जगाच्या भावी परिस्थितीचें जें चित्तवेधक चित्र चितारलेलें आहे तें वाचकांनीं मुळांतच वाचावें. या सर्वच ओव्या इतक्या सरस आहेत कीं नुसत्या उदाहरणांदाखल देखील त्यांची निवड करतांना मनाला मोह पडल्याशिवाय राहत नाहीं. आणि म्हणूनच केवळ अंगुलिनिर्देशावरच याठिकाणीं समाधान मानणें भाग आहे.

गाळलेला भाग, स्वतंत्र प्रकरणें, संक्षेप व विस्तार या दृष्टींनीं मूळ एकादशाचें व रूपांतरित उद्धवगीतेचें आतांपर्यंत आपण जे विस्तृत विवेचन वर केलें त्यावरून भास्कराच्या रूपांतर–नैपुण्याची कल्पना अभ्यासकास येईलच. मूळांतील कथाभाग जसाचा तसा सांगणें हें केवळ भाषांतरकाराचें काम होय. त्यासाठीं कवीचीच कांहीं जरूरी नाहीं. पण भास्कर हा असा भाषांतकार नव्हता. निसर्गानें त्याला उज्ज्वल प्रतिभेचें देणें दिलें होतें व अभ्यासानें त्यानें त्याची वाढही केली होती. 'स्वतःचे' असें त्याजजवळ बरेंच असल्यामुळें नुसत्या शाब्दिक भाषांतरानें त्याच्या मनाचे समाधान होणें शक्य नव्हतें. म्हणून स्वतःच्या मतमतांतरांना व काव्यकल्पनांना अनुकूल व अनुरूप असा मूळांत बदल करून त्यानें आपल्या उद्धवगीतेची रचना केली. रूक्ष तत्त्वज्ञान वाचकांच्या गळीं उतरवितांना त्याला सरस साहित्याचें तिखटमीठ लावल्याशिवाय भागत नाहीं हें त्यानें पूर्णपणें ओळखलें होतें. आणि म्हणूनच काव्यरचनेला प्रारंभ करतांना ' प्रमेयाच्या वोडवनाला साहित्याचे वोल्हावन ' ( १२ ) देण्याचें ध्येय त्यानें आपल्यासमोर ठेवलें होतें. नवरसांनीं रसरसलेल्या कवितालतेवर ब्रह्मविद्येचीं फुलें फुलविलीं तरच सामान्यजनता पसरलेल्या हातांनीं तीं फुलें तोडावयास तयार होईल ( ३१ ) एरवीं सुवर्णकमळाप्रमाणें अध्यात्मज्ञान मूलतः कितीही सुंदर व संग्राह्य असलें तरि त्यांत साहित्याचा सुगंध असल्यावांचून रसिक जनता तिकडे आकर्षिली जात नाहीं याची जाणीव कवीस असल्याचें नवव्या प्रकरणांतील उत्तरार्धावरून स्पष्ट दिसतें. त्याच दृष्टीनें, रूपांतर करतांना मूळांतील अर्थाला मुळींच ढळ न पोंचवितां तो यथातथ्य स्वरूपांत आपल्या ओव्यांत आणून शिवाय त्याजबरोबर स्वतःच्या अर्थालंकारांचीं लेणींही त्यानें त्यांच्या अंगावर मोठ्या कौशल्यानें घातलीं आहेत. उदाहरणार्थ

एवं पृष्टो महादेवः स्वयम्भूर्भूतभावनः
ध्यायमानः प्रश्नबीजं नाभ्यपद्यत कर्मधी ( १३-१८ )

सनकादिकांनीं विचारलेल्या प्रश्नास ब्रह्मा उत्तर देऊं शकला नाहीं, कारण त्याची बुद्धी कर्मजड झालेली होती ( आणि कर्मजड बुद्धीला तर सारासार विचार करतां येत नाहीं-- ) हा मूळांतील अर्थ

तवं कर्म-मार्गाचिया धुवाठी : आंधारली ब्रह्मेयाची दीठि
तो पुढां न देखे कसवटी : प्रस्नोत्तराची ( ६७१ )

या एकाच ओवींत ओतून त्यांतील गर्भितार्थाचें स्पष्टीकरण अर्थालंकारांच्या साह्यानें

जैसा कस्तुरियेचा निकरा : नोळखवे पामरां
त्या जाणति कुमर : चक्रवर्त्तीचे
नां तरि केतकीचेया परिमळा : नेणे कर्कसु काउळा
तेथ भुंजकु येकला : भ्रमरूचि होए
गावाराचां हातीं : दीजे कलंज-तुकतें मोतीं
तो नेणे तिये रत्नजाती : जाणे ठीकवणिया
तैसा सारासार-वस्तु-वीवेकु : नेणे कर्मजड्ड लोकु
तया जगीं जाणे एकु : योगिश्वरू ( ६७२--६७५ )

या ओव्यांत कवीनें कसें कुशलतेनें केलें आहे तें पाहावें. किंवा, ध्यानधारणादिकांनीं योग्यास प्राप्त झालेल्या अनंत सिद्धी

अन्तरायान्वदन्त्येता युञ्जतो योगमुत्तमम्
मया संपद्यमानस्य कालक्षपणहेतवः ॥ भा. १३-२५

परमेश्वरप्राप्तीला अडथळा आणणाऱ्या व व्यर्थ कालापहरणास कारणीभूत होणाऱ्या असल्यामुळें ईश्वरप्राप्तीची खरी तळमळ ज्याला लागलेली आहे तो त्यांच्या मोहांत कधींच सांपडत नाहीं हा अर्थ

आणिमा गीरिमा : प्रकाया-प्रवेशि लघिमा
या आदिकरूनि आत्मारामा : विघ्नरूपा जाण
य सीद्धींचा फळभारू : न भोगी तो योगीश्वरू

जैसा चारा नेघे चकोरू : कमळ--नळांचा
नां तरि नळनी जाति तन्वंगी : जो अहर्नीसीं भोगी
तो कांतु न रमे मृभंगीं : ग्रामवधुचां
मंदाकीनीचेनि तरंगे : झेंपावति हंस--तलगें
ते न खेळति डागे : चीखले--वाहाळचिये
तैसा ब्रह्मानंदें ढुले : आत्मारामु होउनि खेळे
तो विषयाचेनि मृगजळें : कहीं चुळु न भरी (६८८-६९२)

या ओव्यांतून किति सुंदर व अलंकारिक रीतीनें व्यक्त झाला आहे हें पाहावें. अभ्यासकांना अशीं अनेक उदाहरणें उद्धवगीतेंत आढळतील. त्यांवरून मूळांतील भावार्थ यथार्थतेनें प्रगट करून शिवाय त्यास साहित्यालंकारांचा शृंगारसाज कवीनें कसा चढविला आहे हें सहज लक्षांत येऊं शकेल. मूळ प्रमेय जिज्ञासूंना समजावून सांगण्यासाठीं उपमादृष्टांतांचें साह्य ज्ञानेश्वरांनीं आपल्या भावार्थदीपिकेंत जसें घेतलेलें आहे तसेच तें भास्करानेंही प्रस्तुत ग्रंथांत घेतलेलें आहे. त्यामुळें जसे मूळ सिद्धांत कवीला वाचकांस पटवून देतां आले तसें आपल्या कविता–कामिनीच्या कमनीय कलेवरावर कल्पनांचे मौक्तिक हारही घालतां आले. त्यांत त्याला बोध साधला व कलाही निर्माण करतां आली. आपल्या एकादशाचा हा सालंकृत भावार्थ इतक्या चित्तवेधक स्वरूपांत प्राकृतजनाप्रीत्यर्थ अवतीर्ण झालेला पाहून खुद्द व्यासमहर्षींनाही स्वर्गांत मोठा आनंद झाला असेल. यांत शंका नाहीं.

## इतर ग्रंथकारांचें ऋण

व्यासांच्या एकादशस्कंधाप्रमाणेंच इतर लेखकांच्या कृतींचाही कवीनें आपल्या काव्यरचनेकडे बराच उपयोग केलेला आढळतो. ग्रंथांतील तत्त्वज्ञानात्मक भाग लिहितांना भास्करानें भागवताचें प्रत्यक्ष साह्य न घेतल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. पण भागवताचें नसलें तरी श्रीचक्रधरसिद्धांतसूत्रांचें साह्य मात्र कवीला हा तात्त्विक भाग लिहितांना झालें आहे यांत शंका नाहीं. महानुभावांचें तत्त्वज्ञान संक्षेपानें या सूत्रपाठांत गोंवलेलें असल्यामुळें त्याची पडछाया

भास्कराच्या उद्धवगीतेंत न पडणें अशक्य होतें. पाठपोथींतील सूत्रें व उद्धवगीतेंतील ओव्या यांत बिंबप्रतिबिंब भाव कसा दिसून येतो हें ' तत्त्वज्ञाना ' च्या विभागांत दाखविणार असल्यामुळें त्याचा येथें विस्तार करण्याची कांहीं गरज नाहीं. शिवाय, भास्कर हा महानुभाव पंथांतील कवि असल्यामुळें व आपल्या काव्यांत त्यानें त्या पंथाचेंच तत्त्वज्ञान वर्णिलें असल्यामुळें, त्याच्या ग्रंथांत महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचा प्रमुख ग्रंथ जो सिद्धांतसूत्रपाठ त्याचें प्रतिबिंब पडणें अपरिहार्य आहे हो गोष्ट अगदीं उघड उघड तर्कगम्य असल्यामुळेंही या दोन ग्रंथांची तुलना येथें करण्याचें कारण दिसत नाहीं. हा भाग सोडून दिल्यास उद्धवगीतेच्या प्रसाधनांत कवीनें नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवराचा व केसोबासाच्या मूर्तिप्रकाशाचा मनमुराद उपयोग करून घेतला या गोष्टीचा प्रामुख्यानें उल्लेख करणें अत्यवश्य आहे. शिशुपालवध काव्याच्या रचनेंत वरील दोन्ही काव्यांचा भास्करानें किति उपयोग केला हें आपण मागें पाहिलेंच. मूर्तिप्रकाशापेक्षां रुक्मिणीस्वयंवराची छाया शिशुपालवधावर अधिक पडली आहे. पण या काव्यांत मात्र उलट प्रकार आढळतो. उद्धवगीतेंत रुक्मिणीस्वयंवरापेक्षां मूर्तिप्रकाशाचाच प्रकाश विशेष पडलेला दिसतो. असें कां व्हावें हा एक विचार करण्यासारखा व महत्त्वाचा प्रश्न आहे. पण आमच्या मतें त्याचें उत्तरही अगदीं उघड आहे. रुक्मिणीस्वयंवर व शिशुपालवध तसेंच मूर्तिप्रकाश व उद्धवगीता या ग्रंथांमध्यें विषयाच्या दृष्टीनें विलक्षण साम्य असल्यामुळेंच हा प्रकार घडला असावा असें वाटतें. पहिलीं दोन्ही काव्यें कथानकात्मक आहेत. दोन्हीकडे त्या त्या कथानकाचा नायक भगवान श्रीकृष्ण असून शृंगाररसनिर्मितीला अवसर व उठाव देणारी रुक्मिणी हीच दोन्ही काव्यांची नायिका आहे. श्रीकृष्णाच्या मूर्तीचीं, रुक्मिणीदेवीच्या विरहाचीं, द्वारकेचीं, तिच्यांतील वनोपवनांचीं आणि रुक्मी–शिशुपाळजरासंधादिकांशीं झालेल्या युद्धप्रसंगांचीं वर्णनें रुक्मिणीहरण व शिशुपालवध या दोन्ही काव्यांत असल्यामुळें मूर्तिप्रकाशापेक्षां पहिल्याचीच छाया दुसऱ्यावर अधिक कां पडावी हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. उलट मूर्तिप्रकाश व उद्धवगीता हीं दोन्ही प्रामुख्यानें तत्त्वज्ञानप्रधान काव्यें असल्यामुळें त्यांच्यांत इतर काव्यापेक्षां अधिक साम्य व बिंब

प्रतिबिंब भाव आढळला तर आश्चर्य वाटावयास नको. मूर्तिप्रकाशांत श्रीचक्रधर व नागदेवाचार्य या देवभक्तांची जोडी आहे तर उद्धवगीतेंत ती श्रीकृष्णोद्धवाची आहे. नागदेवाला झालेलें श्रीचक्रधराच्या भावी वियोगाचें दुःख व उद्धवाला झालेलें श्रीकृष्णाच्या भावी वियोगाचें दुःख दोन्ही काव्यांत वर्णिलें आहे. शिवाय तत्त्वज्ञान व आचारात्मक भागांत दोन्हीकडे आढळणारें साम्य वेगळेंच. असें असल्यामुळेंच रुक्मिणीस्वयंवरापेक्षां मूर्तिप्रकाशाची छाया उद्धवगीतेवरः अधिक पडलेली आहे हें उघड दिसतें. असो. आतां प्रथम रु. स्व. व उद्धवगीता व नंतर मूर्तिप्रकाश व उद्धवगीता यांतील कल्पनासाम्याचीं व शब्दसाम्याचीं स्थळें वाचकांपुढें सादर करतों. त्यावरून भास्करानें नरेंद्राचें व केसोबासाचें केवढें ऋण उचललें आहे याची स्पष्ट कल्पना होईल.

| उद्धवगीता | रुक्मिणी स्वयंवर |
|---|---|
| १ पुराणगगनिचा कुमुदबंधु<br>जो आईकिजे येकादशस्कंदु ॥३६॥ | ते पुराणांत आनंदसमुद्र<br>तेथ दशमस्कंद तोचि चंद्र॥४९॥ |
| २ पदांचा मेळवा<br>रत्नाकरा करी चढावा ॥२८॥ | भीमाचेया गुणांचा मेळावा<br>क्षीरसमुद्रासि करी चढावा॥५१॥ |
| ३ कामक्रिडा रसाळें<br>खेळति पक्षिकुळें<br>झाडां उपजति डोहळे<br>कामिणियांचे ॥ ४२९ ॥ | तेया रीतुरायाचेनि रजें<br>कामीनियाचा वेधु कवणा नुपजे<br>झाडें डोहोळैजताति माजे<br>स्त्रीसुख भोगावेयालागि॥७६८॥ |

| उद्धवगीता. | मूर्तिप्रकाश |
|---|---|
| १ पडिलेया संसाराची अडणी<br>जो पुरवी ब्रह्मविद्येची तवनी॥४॥ | ब्रह्मविद्येची पुरवी तवनी<br>आर्तजनासी ॥ १०९७ ॥ |
| २ वाणितां वेंचिजति फळें<br>मुक्तिलतेचीं ॥ ८ ॥ | बोल नव्हति रसें आगळें<br>परि वानितां परब्रह्म गोरें सावळें<br>हातें झेलिजति फळें<br>सुखरसाची ॥ १८३ ॥ |

| | |
|---|---|
| ३ आतां श्रीकृष्णाचिया कीर्तिचंद्रिका<br>विकासली उन्मेष-कलिका<br>तर जानाची मनोनासिका<br>सुपरिमळ करीन ॥१०॥ | तिए श्रीकंठीं कंठमाळ<br>वर्णितां लंपट होती कर्णयुगळ<br>जानाचीया मनोनासिका सुपरिमळ<br>करीन मी ॥ ७०५ ॥ |
| ४ वर्णितां यदुपती<br>बोलीं सहज वेधवती<br>म्हणौनि श्रोतेयां विनती<br>सुआवी न लगे ॥ १३ ॥ | वाणितां देवो लावण्यसागरू<br>नाभी वेधबोधाचा पडिभरू<br>भणौनि श्रौतेया अति आदरू<br>करावा न लगे ॥ १४८ ॥ |
| ५ काइ भवरांसि कमळीं<br>कांहीं मानिलें असे हातातळीं<br>किं कोकिळां रसाळीं<br>नेसों दीधलें ? ॥ १४ ॥ | नां तरि सूगंधीं सुपरिमळीं<br>सतपत्र पर्यातके पाडळी<br>काइ अळिउळांसि केतकीदळीं<br>मुळ पाठवीलें ? ॥ १५० ॥ |
| नां तरि मेघमंडळें<br>काई चातक लांचाविलें<br>किं चंद्रें मुळ पाठविलें<br>चकोरासिं ? ॥ १५ ॥ | कीं कुरंगा नाभिकमळीं कस्तुरी<br>ते काइ चक्रवर्तीतें पाचारी<br>कीं चकोरवर्गासी चंदकरीं<br>कांहीं मानू दीधला ? ॥ १५१ ॥ |
| | कीं मेघीं आपलेनि कवतीकें<br>काइ बापए केले अति बोलिके<br>कीं नवरसीं रसाळांसि भातुकें<br>देऊनि लांचाविलें ? ॥ १५४ ॥ |
| ६. म्हणौनि प्रबंधु होईल रसिकु<br>तरि आइकैल श्रोतेयांचा<br>देशकु ॥२५॥ | आतां सांघेन ग्रंथीचा वीसेखु<br>जया नांव मूर्तिप्रकासु<br>तो आइकैल श्रोतेयाचा देसकु<br>आदरू करुनि ॥९४॥ |
| ७ भेटति द्रावक गोटे<br>तरि लोहासि झरा फुटे<br>सोमकांता गळति थेंबटें<br>चंद्रकरांतव ॥१७॥ | जैसे चंद्राचा चंद्रकीर्णीं<br>सोमकांता द्रवे पाणी<br>तेवि वक्तयाचां मीळणीं<br>श्रोतेयां सुख होए ॥१७८३॥ |

नांतरि देखौनि रविमंडळ
विकाशे कमळांचें बांबळ
कौंभैजे केतकी-जौळ
मेघीं करूनि ॥१८॥

ना तरि द्रावकाचीया संगती
लोखंडा पाझर सुटती
तैसे वगतेयाचे बोल नीववीति
श्रोतेयांतें ॥१७८४॥

तैसा सुवर्म जोडे श्रोता
तरि रसभावीं फुले कविता
तोवरु ये सारस्वता
नवरसांचे ॥१९॥

सुर्यकरांचेनि प्रकासें
कमळांचें बांबळ त्रिकासे
तेवि श्रोतेयाचें मन उल्हासे
वगतेयाचीए भेटी ॥१७८५॥

८ तैसे पदांचेया पदरां
भीतरि भाव डोळां दीसति ॥२९॥

तैसे चातुर्य सामर्थ्यातव
सकळ ग्रंथ भोगिती गर्व
जंव मूर्तिप्रकासाचे भाव
डोळां न देखती ॥१९३॥

९ ऐसिये कविता-लते
ब्रह्मवियेचीं फुलें दिसति फांकते
तरि पसरतेनि हातें
कवण न तोडी ? ॥३१॥

ऐसीए कवीतालते असाळे
लागतीं दीसती ब्रह्मवीयेचीं फळें
तरी कव्हणासि नव्हती डोहळे
मुखीं घालावेयाचे ? ॥१५८॥

१० तैसें साहित्याचां राहाणी
शांतिरसा अवतरण आणी
तरि माझी पवित्र वाणि
कवण नाईके ? ॥३५॥

ना तरि चींतिलें दे चींतामणी
कामध्येनु खडुरसीं पुरवी आणी
तैसी माझी पवीत्र वाणी
कवण नाइके ? ॥१७६॥

११ जो कैवल्य कुसुमाचा
अमोदु ॥ ३७ ॥

जो कैवल्य कुसुमाचा परिमळ ॥१४१२॥

१२ विवेका त्तराय जाली
प्रबोधा दशा उदैली
नवल जिनि जाली
वैराग्यासि ॥ ४४ ॥

राज्य करीतां कैवल्यपाळा
तराया आली सकळकळां
संगीत भोगी सोहळा
शद्बसुखाचा ॥२१८॥

| | | |
|---|---|---|
| | तापासि बीक चढलें<br>अध्यात्म चांग पदासि आलें<br>भांडवल जोडलें<br>उपनिषेदांसि ॥ ४६ ॥ | अध्यात्म जालें रसाळ<br>श्रधेसी लागलें सांतिचें फळ<br>ध्यान चींतनेसीं होय गोठिवेल्हाळ<br>उठों न सके ॥२२६॥ |
| १३ | पुण तुजचि हे ईच्छा जाली<br>जें येदुवंश वेलिचां मुळीं<br>घालावी ईंगळी<br>ब्रह्मशापाची ॥ ६१ ॥ | क्षेमे नीवृत्तीचा मुळीं<br>पडे क्रोधाग्नीची इंगळी ॥ २४१६ ॥ |
| १४ | तो जैसा करुणारसीं वीराला<br>किं विरहवीषें घारैला ॥ ७२ ॥ | कीं तो करुणारसू मुराला<br>भाओ भगतीसी योग जाला ॥२९८२॥ |
| १५ | आजि धर्मा आयुष्य पुरलें<br>विवेकाचें भांडार फुटलें ॥८४॥ | आतां आवडीचें आउक्ष पुरलें<br>साहित्य संगितासि मुंचलें ॥ २८०२ ॥ |
| १६ | सेजार आहाळलें<br>दिव्य भोगांचें ॥ ८९ ॥ | विलास वन आहाळलें<br>कळाकौसल्य भीतरि पोळले ॥२८२२॥ |
| १७ | मोक्षाचा बाह्या गेला<br>त्यागा जगत्रोळु जाला ॥ ९१ ॥ | जगवोळ जाहला नवरसा<br>कव्हणीं आपुलें न म्हणे ॥ २८११ ॥ |
| १८ | स्वयंप्रकाशाची दिप्ति<br>आजि माल्हवली ॥ ९२ ॥<br>सत्त्वाची गगनगंगा<br>आजि आटली ॥ ९५ ॥ | स्वयंप्रकासाची दीवटी वीझाली<br>सत्त्वाची गगणगंगा आटली ॥२८४५॥ |
| १९ | अवचीते जगजुग पडिलें<br>सनकादिकांवरि ॥ १०१ ॥ | अवचीते आकास आडोळलें<br>सनकादिकावरी ॥ २८५४ ॥ |
| २० | हरी ! हरी !! देवा !<br>काइ कीजे या वज्रकठिणा<br>जिवा ? ॥ १३५ ॥ | आहा वज्रकठीणा जीवा<br>कां वीसंबलासी सदासीवा ॥ २९७४ ॥ |
| २१ | माझेनि हातेंविण<br>देवो न करीति आरोगण | तुं सपांती मजवीण<br>कहीं न करीसि आरोगण |

| | |
|---|---|
| ते कां विसरलेति आपुलेंपण<br>प्रभु एकें वेळें ? ॥ १३७ ॥ | आतां कां केलें कठीण<br>मातें न बोलाविसी ॥ २९०१ ॥ |
| २२ प्रेम देतां वेळीं<br>मासीं सन्निधानाची भाष केली<br>ते कां हो जी सांडिली<br>वेळु न लगतां ? ॥ १४२ ॥ | क्षेमाळींगण देतां वेळीं<br>मासीं सन्निधानाची भास केली<br>जें आतां एथौनि तुज कव्हणी काळीं<br>कहीं पाठवीजेना ॥ २८७६ ॥ |
| तरि तो पुढारू आठवावा<br>आतां साचु करावा ॥ १४५ ॥ | तो पुढारू सांडिला<br>कां माझा अव्हेरू केला ? ॥ २८७७ ॥ |
| २३ कां अझुई हृदय न फुटे<br>प्राण-तंतु न तुटे<br>चोळाखा न फुटे<br>या कळेवराचा ॥ १४७ ॥ | नवां नाडींची एरझार न कुटे<br>कां खड्डचक्रांची माळ न तुटे<br>कां चोळाखा न फुटे<br>प्रपंचाचा ॥ २९५१ ॥ |
| षट्चक्रांची उत्तरडी<br>आझुई कां न गडबडी<br>मेरूशिखरें केवीं न फोडी<br>इडा पिंगळा ते ? ॥ १४८ ॥ | |
| २४ ब्रह्मरंध्राचां संपुटीं<br>अझुई कां वज्राग्नि नुठी<br>कां न जळे कोठी<br>या इंद्रियांची ? ॥ १४९ ॥ | इंद्रियांचीए सेजे आझुनी<br>कां नुजंभे वज्राग्नी<br>कां बाहात्री कोठे जळौनि<br>आभावो नव्हति ? ॥ ५२ ॥ |
| २५ किं काळाची देशवही<br>वाचितां माझें नाव नाहीं<br>किं पंचत्व पावला तोही<br>तुझेनि विरहें ? ॥१५१॥ | कीं माझी वाचितां जन्मपत्रिका<br>काळासि ठाइ न पडेचि देखा<br>कीं तुझीया आज्ञा परमपुरूखा<br>मातें आठवीचि ना ? ॥ २९५८ ॥<br>कीं तुझेनि वीरहें दुचीता<br>तोही जाला ? ॥ २९५४ ॥ |
| २६ अनुलेपनाचिया भूअरी<br>मीं अहंकारातें धोनारीं ॥१५९॥ | तुझें अनुलेपण लावीं ललाटीं<br>तरी वीघ्नजाति न ए दृष्टीं ॥२९७२॥ |

२७ तुझीं अंगसीकें वेढिं
तरि कामक्रोधाची खालि काढिं
दाढा उपडीं : मदमच्छ-
राचिया ॥ १६० ॥

तुझीं आंगसीकें करी प्रावर्ण
तरि मायामोहो जीवीं संके आपण
कामक्रोध दोन्ही पावती मरण
आपेंआप ॥ २९६७ ॥

२८ जैसी अवस्थाभरें विरहीणी
करितां न मनीं धावनी ॥१७३॥

जैसें वीरहीणीं पतीचां वीयोगीं
अष्टभोग डाजति आंगी
नवरसाचां भावो-भुजंगीं
डंकिजे ते ॥ २४५९ ॥

२९ जेथ मदनाचां बाणीं
घायवटे तरुणी
तिये नगरपुरपाटणीं
वासु न करावा ॥ १८१ ॥
वीषयांचिया उलींगवाडी
वीकार वीचारातें आझोडी
म्हणौनि नसावें अर्धघडीं
भोगुवनांतु ॥ १८२ ॥

मदनवसंताचीए मीळणी
कातुरा होति कामिनी
नवरस न साहाति वीरहीणी
ते नगर वर्जावें ॥२३६९॥
श्रींगारू रजेसी क्रीडा करी
मनां इंद्रीया अभिलाखु संचरी
तया भोगभवनाचां अभ्यंतरीं
न रीगावें ॥ २३७० ॥
वीकाराचीए पाटनीं
विखो वीलासातें न्हाणी
तेथ नसावें ध्यानपराएणीं
क्षेणमात्र ॥ २३७१ ॥

३० असावें गिरिकपाटीं
शिळातळीं वाळुवंटीं
झाडाचां तळवटीं
बहुत करूनि ॥ १८३ ॥

असावें सीळातळीं सीखरीं
कपाटीं कौहकीं गीरीवरी
झाडाचां पाल्वीं नीरंतरीं
ध्यान करावें ॥ २४७५ ॥

३१ तवं श्रीकृष्णराओ म्हणे 'उद्धवदेवा!
हा ज्ञानरत्नाचा ठेवा
भलेतेया हातीं नेदावा
अधिकारेंविण' ॥ ८१८ ॥

ऐसा जो गोप्य पदार्थु
तो मीया तुज केला श्रुतु
परी अधीकारेंवीण वीदीतु
कव्हणासि न करावा ॥ २७२५ ॥

३२ परब्रह्मेसीं होये सायोज्यता
म्हणे कवी भास्करू ॥ ८२७ ॥

तया सायोज्यता होय परब्रह्मेसीं
म्हणे मुनी केसिराजु ॥ १९४८॥

## ३

## तत्त्वज्ञान

तत्त्वज्ञान हा महानुभावीय वाङ्मयाचा एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. काव्यग्रंथापेक्षां तत्त्वज्ञानप्रधान ग्रंथसंपत्ति महानुभावांनीं अधिक निर्माण केलेली आहे असें म्हटलें तर तें विशेष चुकीचें होणार नाहीं. महाराष्ट्रांत आज विद्यमान असलेल्या निरनिराळ्या धर्मपंथांपैकीं एकानेंही आपलें तत्त्वज्ञान स्वतंत्र रीतीनें शोधून काढलेले नाहीं–किंवा बनवलेले नाहीं. कोणत्या तरी संस्कृत ग्रंथावर विश्वास टेवून एखाद्या आचार्याच्याच पावलावर पाउल ठेवण्याचा बहुतेकांनीं प्रयत्न केलेला आहे. महानुभावांचें सुद्धां तसेंच आहे. तत्त्वज्ञानाची परिभाषा त्यांनीं परंपरागत ग्रंथांवरून उचललेली असून ब्रह्मांड-ईश्वरदेवतादिकांविषयींचीं मतें सुद्धां संस्कृतग्रंथाधारें प्रतिपादलेलीं आहेत.कित्येक परिभाषा मात्र त्यांनीं नवीन तयार केल्या आहेत. सुखदुःखाचें जाळें तर त्यांनीं इतक्या कौशल्यानें विणलेलें आहे कीं त्याकडे पाहून मनाला भीति वाटली तरी बुद्धि स्तंभित होते. हें सर्व पद्धतशीर रीतीनें व विचारपूर्वक लिहून जो ग्रंथकर्तृत्वाचा पायाशुद्धपणा त्यांनीं दाखविला त्याला तत्त्वज्ञानात्मक प्राचीन मराठी वाङ्मयांत तोडच नाहीं.तत्त्वज्ञानाचे ग्रंथ इतक्या पद्धतशीर रीतीनें दुसऱ्या कोणत्याच पंथानें लिहिलेले नाहींत. दुर्दैवानें उद्धवगीतेंतील तत्त्वज्ञानावरून मात्र याची फारशी कल्पना येत नाहीं. विशेष महत्त्वाच्या अशा कांहीं गोष्टीं-चाच विचार अगदीं त्रोटकपणें भास्करानें यांत केलेला आहे. शिवाय सामान्य लोकांनाही समजेल अशी ग्रंथरचना करावयाची असल्यामुळें तत्त्वज्ञा-नाच्या विशेष खोल पाण्यांत त्याला शिरतां येणें शक्य नव्हतें. म्हणून आपल्या पंथाचीं ठळक तत्त्वें व आचार सांगण्याचाच प्रयत्न त्यानें या ग्रंथांत केलेला आहे. त्यांपैकीं तत्त्वज्ञानात्मक भागाकडे आपण प्रथम वळूं.

उद्धवगीतेंत समाविष्ट झालेलें तत्त्वज्ञान 'महानुभाव' पंथाचें तत्त्वज्ञान असल्यामुळें त्यास एकप्रकारचें वैशिष्ट्य प्राप्त झाल्याचा उल्लेख मागें केलाच आहे. या वैशिष्ट्याचाच आतां विचार करूं. त्यापूर्वी एका गोष्टीची जाणीव अभ्यासकांस करून द्यावीशी वाटते. ती अशी कीं तत्त्वज्ञानांत आचारधर्माचा बहुधा समावेश करीत नाहींत व म्हणून त्याचा विचार या विभागांत आम्हीही करीत नाहीं. सामान्यतः परमेश्वर व जीव यांचा अन्योन्य संबंध, त्यांच्या नित्यानित्यत्वाविषयीं विचार, प्रपंचाची उभारणी व त्याचा संहार, जीवाचें कर्मकर्तृत्व व कर्मबंधन, देवता, मोक्षाचा उपाय वगैरे वगैरे विषयांचा विचार म्हणजेच तत्त्वज्ञान. 'तत्त्व' या शब्दाच्या मूलार्थाकडे लक्ष दिल्यास ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल. या तत्त्वांना अनुकूल व अनुरूप असे जे आचार असतात ते निराळे. त्यांचा 'तत्त्वां' त समावेश करतां येत नाहीं. किंबहुना खरा तत्त्वज्ञानात्मक भाग हा बहुधा बुद्धिग्राह्य व अंतर्मुख वृत्तीची अपेक्षा करणारा असतो. उलट आचारधर्म हा जगांतील बाह्य व्यवहारासाठीं व जवळ-जवळ पूर्णपणें बुद्धिनिरपेक्ष असा असतो. सामान्यजनतेची बुद्धि पल्लेदार नसल्यामुळें ती आत्मानात्म विचारांपर्यंत पोचूं शकत नाहीं. त्यामुळें त्यांना आचारधर्म हाच विशेष ग्राह्य व म्हणून महत्त्वाचा वाटतो. कित्येकदा ते या आचारांनाच तत्त्वांचें सिंहासन देतात. पण तें योग्य नाहीं. खरें तत्त्वज्ञान निराळें व आचारधर्म निराळा हें अवश्य लक्षांत ठेवलें पाहिजे.

## परमेश्वर

परमेश्वर आणि जीव या दुकलीचा परस्पर संबंध हा प्रत्येक तत्त्वज्ञानाचा विशेष वादाचा विषय असल्यामुळें आपणही प्रथम त्यांचीं एकेकाचीं वैशिष्ट्यें पाहून नंतर त्यांच्या संबंधाचा विचार करूं. परमेश्वराच्या स्वरूपाचें यथार्थत्वानें वर्णन करणें अशक्य आहे. एका दृष्टीनें पाहिलें तर परमेश्वर हा भावाभावातीत ( ६५२ ) व निर्गुणगुणवंताच्या पलीकडे ( ६५३ ) असून तो कर्ताही नाहीं व अकर्ताही नाहीं, भोक्ताही नाहीं व अभोक्ताही नाहीं ( ६५४ )

तथापि तो निर्गुण व निराकार आहे; पण जीवाचा उद्धार करावयास मात्र तो साकार होत असतो ( २९१, ६१७ ) तो पूर्णपणें मुक्त असून अविद्येचें बंधन त्यास कधींही पडत नाहीं. ( ६५६ ) त्याच्या रोमरंध्रांत देखील अनंत ब्रह्मांडें सामावलेलीं असून ( ६५७ ) त्याचें स्वरूप हें चंद्रसूर्याच्या मापांनीं मोजलें जात नाहीं व तें दशदिशांत ( ६५८ ) किंवा शक्तिचक्रांत सुद्धां मावूं शकत नाहीं. ( ६६० ) परमेश्वर हा स्वयंप्रकाश ( ५३५ ) सर्वगत व सर्वव्यापी[2] आहे (२९१, ३०१ ) पण तो एकच आहे हें विसरतां कामा नये ( ५६८ ) ( ६९५-७०० ) थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे परमेश्वराचें स्वरूप सर्वातीत असून तें इतरांच्या निषेधानेंच जाणलें पाहिजे. ( ६६३ )

## जीव

बहुतेक महाराष्ट्रीयांच्या रोमरोमांत अद्वैतवाद मुरलेला असल्यामुळें जीवाच्या स्वरूपाविषयीं त्यांची एक विशिष्ट समजूत बनलेली आहे. ती अशी कीं वस्तुतः जगांत जीव म्हणून एखादी स्वतंत्र वस्तु आहे असें मुळींच नाहीं. अणुहून लहान व हत्तीहून मोठे असे जे अनंत जीव जगांत आपणांस दिसतात तीं एकाच ईश्वराचीं रूपें आहेत. परमेश्वरानें मायेच्या साह्यानें जे अनेक आकार धारण केलेले आहेत तेच हे दृश्यमान जीव होत. अद्वैत्यांच्या या कल्पनेहून महानुभावांची जीवाविषयींची कल्पना निराळी आहे. त्यांच्या मतें विश्वांत परमेश्वराला जसें स्वतंत्र अस्तित्व आहे तसेंच जीवांनाही आहे ( ५७० ). परमेश्वराप्रमाणेंच जीव हे अनादि असून नित्य आहेत जीव अनंत असून नेहमीं अविद्यायुक्त असतात[3] ( ५५३ ). निरंतर मायेच्या किंवा प्रपं-

१. ' तोचि परमेश्वरु निर्वेवो निराकारू असे : परि कृपावशें सावेवो साकारू होए ' ( च. सि. सू. पूर्वी. )

२. ' नित्यत्व : व्यापकत्व : सर्वात्मकत्व : सर्वकर्तृत्व : सर्वसाक्षित्व : एवमादिक अनंत धर्म बोलिजेति ' ( च. सि. सू. महावाक्य ९. )

३. ' नित्य : केवळ : अनादि : अविद्यायुक्त वस्तु एकु आति ते जीव शद्बें बोलिजे ' ( च. सि. सू. महावाक्य. २ )

चाच्या आधीन असल्यामुळें कर्तृत्वाच्या बाबतींत ते पूर्णपणें परतंत्र आहेत. त्यांना कार्यप्रवण करणारा ' संलग्न ' मानलेला आहे. हे जीव मूलतः शुद्ध मानलेले आहेत. पण त्यांचा सृष्टींत जन्म झाल्यानंतर मात्र त्यांना अनेक मळ लागतात. जन्मतांक्षणींच लागणाऱ्या मळास आदिमळ म्हणतात. या आदिमळां-सहित असलेला जीव शुद्धच होय. पण त्यानंतर ते जसजसे निरनिराळया देव-तांच्या कक्षेंत जातात तसतसें त्यांना त्या त्या देवतांचे मळ लागतात. व अगदीं शेवटीं मृत्तिका मळ लागतो. याप्रमाणें जीव हे सदासर्वदा मळांनीं बद्ध झालेले असतात ( ५८८, ६२१ ) सारांश परमेश्वराप्रमाणेंच जीव हे अनादि असून नित्य असले तरी कर्तृत्वशून्य व परतंत्र आहेत. माया, अविद्या व नाना देवतांचे मळ यांनीं ते जखडलेले असल्यामुळें बिचाऱ्यांना नेहमीं दुःखच भोगावें लागतें. आपापल्या कर्माप्रमाणें चतुर्विध कर्मफळें भोगल्यावांचून त्यांना गति नाहीं. या दारुण स्थितींतून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं त्यांनीं ईश्वरालाच शरण गेलें पाहिजे. जीव जीवांना तारूं शकत नाहींत—ते मोचक नाहींत ( ५५६ ) त्यांना तारणारा एक परमेश्वरच समर्थ आहे. ( ५५७ ) तो कधीं मनुष्यवेष धारण करून साकार होतो व जीवांना आपलें सान्निध्य देऊन त्यांचा उद्धार करतो ( ६१७ ) तर त्याच्या असन्निधानांत त्याचीं निष्काम उपासना केल्यामुळें जीव ईश्वरप्रेमास पात्र होतात व मुक्तीचा मार्ग खुला करून घेऊं शकतात ( ७९०, ७९१ ). जीवांनीं ईश्वरप्राप्तीसाठीं

४. ' जीवु मायेसि अधीनु होए कां प्रपंचासि अधीनु होए ' (संसरण. ११)

५. ' जन्मला सांता जीवु क्षणपर्यंत शुद्ध असे : मग मैळे.' (संसरण. १२ )

६ 'चैतन्य मृत्तिकापर्यंत मैळे : चैतन्यासवें जीवु मृत्तिकापर्यंत मैळे '(संस.१३)

७ ' मग जीव चतुर्विधा कर्मफळा जाति ॥ स्वर्ग : तरक : कर्मभूमि : मोक्ष : यातें चतुर्विध कर्मफळ बोलिजे ' ) संसरण. २४; २५ )

८ ' सृष्टीमध्यें कन्हणें करणें मूत्चिजेना एकें परमेश्वरेंवीण ' ( पूर्वी ).' बाइ जीव जीवा काइ होति : परमेश्वरु एकु सोडवीता ' ( विचार मालिका. ३८ ).

९ ' अवतरे : आपुलें सन्निधान दे : तें दास्य मोचकु ' ( पूर्वी. )

जी भक्ति करावयाची ती ज्ञानपूर्वकेंच असली पाहिजे. ( २४८ ). असो.

## द्वैत.

परमेश्वर–स्वरूपाची व जीव–स्वरूपाची कल्पना करून घेतल्यानंतर आतां त्यांचा अन्योन्य संबंध पाहणें इष्ट होईल. परमेश्वराप्रमाणें जीव अनादि व नित्य असल्यामुळें हे दोन्ही एक असूंच शकत नाहींत हें सकृद्दर्शनींच दिसून येतें. महानुभाव पूर्ण द्वैती आहेत. आणि म्हणूनच त्यांनीं ईश्वर व जीव हे अनादि व नित्य मानलेले आहेत. अद्वैतवादी वेदांत्यांनीं जीव स्वतंत्र मानलेला नाहीं. परमेश्वरच जीवाच्या रूपानें आविर्भूत होतो. अर्थात आपल्या दृष्टीस पडणारे जीव इतर कोणी नसून एका परमेश्वराचींच रूपें आहेत–ते परमेश्वरच आहेत असें ते प्रतिपादितात. म्हणजेच परमेश्वर व जीव यांत ते अद्वैत मानतात. महानुभावांना हें मत मान्य नाहीं. त्यांच्या मतें ज्ञानपूर्वक भक्तीनें एखाद्या जीवानें ईश्वर प्राप्त करून घेतला तरी त्यामुळें त्याचें जीवत्व नष्ट होत नाहीं. म्हणूनच भास्करभट्ट म्हणतो

म्हणे ' आइकै उद्धवदेवा ! ब्रह्मासि आणिक जिवा
स्वरूपें भेदु जाणावा : दिष्काळाचिया परी ' (५८६).

' जीवेश्वरा स्वामीभृत्यसंबंधु हा अनादीचा ' ( विचार १२४ ) असें पंथसंस्थापक चक्रधराचें स्पष्टच मत होतें. हा आपला द्वैतपक्ष भास्करानें उद्धवगीतेंत मोठ्या अट्टाहासानें प्रतिपादिलेला आहे. त्यासाठीं प्रथम अद्वैतमतखंडनाची भूमिका घेऊन नंतर द्वैताचें समर्थन करण्याचा तो प्रयत्न करतो. उद्धवदेवाला त्यानें अद्वैताचा पक्ष दिला तर श्रीकृष्णाला द्वैताचा पक्ष दिला आणि मग वादविवादाला सुरवात केली. एकच आकाश ज्याप्रमाणें निरनिराळ्या भांड्यांत अनेकविध प्रतिबिंबलेलें दिसतें किंवा एकाच तोंडाचें प्रतिबिंब जसें आरशांत पडावें त्याचप्रमाणें ब्रह्म हेंच अविद्यावश होऊन जीवाच्या रूपानें आकारलें आहे. अर्थात् जीव-ब्रह्मांत भेद नसून अभेद आहे, असा पूर्वपक्ष उद्धवदेवानें मांड-

---

१०. ' ज्ञान मोचक ' ( विचार मालिका १ )

तांच श्रीकृष्ण त्यास उत्तर देतात " तुझें मत चुकीचें आहे. कारण ईश्वर हा नित्यमुक्त तर जीव नित्यबद्ध असल्यामुळें त्यांच्यांत अभेद असूं शकत नाहीं. शिवाय ब्रह्म हें शुद्ध असल्यामुळें त्याला अविद्येचें बंधन कसें बरें पडूं शकेल ? अर्थात अविद्यावश होऊन ब्रह्म जीवांच्या रूपानें आकारलेलें आहे हें म्हणणें योग्य नाहीं. परमेश्वर आणि जीव या दोन वस्तु विश्वांत आहेत यांत शंका नाहीं. यांचा अन्योन्यसंबंध काय हाच काय तो वादाचा प्रश्न आहे. त्यांत अभेद आहे असें म्हणावयाचें असलें तर, एक तर ( १ ) ह्या दोन्ही वस्तु मूलतः एकच असल्या पाहिजेत. किंवा ( २ ) वस्तुतः त्या भिन्न असून नंतर केव्हांतरी त्यांचें ऐक्य होत असावें; अथवा ( ३ ) त्यांत भेद नाहीं म्हणून त्या एक आहेत असें मानीत असावेत. पण या तिन्ही कल्पना बरोबर नाहींत. ( १ ) ईश्वर एक तर जीव अनेक असल्यामुळें ते दोन्ही एकच आहेत असें म्हणतां येत नाहीं. (२) भिन्न वस्तूंचें ऐक्य होतें असें म्हणावें तर पुन्हा दोन उपप्रश्न उद्भवतात. त्या दोहोंचा नाश न होतांच त्यांचें ऐक्य होतें ? कीं नाश झाल्यावर होतें ? नाश होण्यापूर्वी त्यांचें ऐक्य होणें अशक्य आहे. कांच आणि माणिक या स्वतंत्र वस्तूंचें ऐक्य होऊं शकेल काय ? अर्थात् नाहीं. आतां दोहोंचाही नाश झाल्यावर त्यांचें ऐक्य होतें असें मानावें तर तेंही शक्य नाहीं. कारण त्यांचा नाश झाल्यावर ऐक्य होणार कोणामध्यें ? शिवाय ते दोन्ही नित्य असल्यामुळें त्यांचा विनाश होऊंच शकत नाहीं. ( ३ ) तिसऱ्या पक्षाचें समाधान असें कीं दोन वस्तु अगदीं तंतोतंत सारख्या असल्या म्हणून त्या एकच आहेत असें मानतां येत नाहीं. या दोन्ही वस्तु मूळापासूनच निरनिराळ्या नाहींत असें जर तूं म्हणतोस तर त्यांत ' अभेद ' आहे अशी ओरड कां करतोस ? अभेद हा केव्हांही दोन निरनिराळ्या वस्तूंमध्येंच संभवूं शकतो. वेड्या ! अरे अभेद सिद्ध करण्यासाठीं सुद्धां भेद मानलाच पाहिजे हें कसें तुझ्या लक्षांत येत नाहीं ? एकच ब्रह्म अविद्येच्या योगानें अनेकत्वानें आकारलेलें आहे हें म्हणणें कितीतरी चुकीचें आहे. एक तर शुद्ध ब्रह्मापुढें अविद्येचें कांहींच चालत नाहीं. शिवाय अविद्येला निराकार ब्रह्माचे तुकडे कसे पाडतां येतील ? सारांश कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी ईश्वर व जीव स्वतंत्र व नित्य असून त्यांत अभेद असूंच शकत नाहीं असेंच दिसून येईल."

वरील द्वैताद्वैताच्या विवेचनावर याठिकाणीं भाष्य करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. एक तर या विषयाच्या अंतरंगांत शिरून त्यावर कोणत्याही एका बाजूनें निश्चित मत देण्यास आवश्यक असलेलें त्या विषयाचें सांगोपांग ज्ञान मला नाहीं. शिवाय ही दोन्ही मतें त्या त्या पक्षाच्या अनुयायांकडून आज इतकीं दुराग्रहानें प्रतिपादिलीं जातात कीं त्या बाबतींत कोणाशींही वाद घालीत बसण्यांत कांहीं तथ्यांश नाहीं. त्याच त्या वैदिक सूत्रांच्या आधारांवरच ही परस्परविरोधी मतें पुढें आलेलीं असल्यामुळें त्यांतील बराचसा भाग तरी निवळ शब्दच्छलानें व्यापलेला आहे. मनःपूर्वक सांगावयाचें म्हणजे एका दृष्टीनें शंकराचार्यांच्या अद्वैतवादापेक्षां मध्वाचार्यांचा द्वैतवाद हा अधिक व्यावहारिक, कार्यप्रेरक व भक्तिभावास अनुकूल असलेला वाटतो. असो. पण यापेक्षां यावर माझ्यासारख्यानें अधिक न लिहिणेंच बरें !

## देवता.

परमेश्वर आणि जीव यांप्रमाणेंच देवता ह्याही नित्य मानलेल्या आहेत[११] ( ५४५ ). त्यांना जन्ममृत्यूची बाधा नाहीं. त्या आनंदमयें[१२] असून ( ५४५ ) आपापल्या इच्छेनुसार सृष्टीमध्यें अनेक गोष्टी त्या निर्माण करूं शकतात व त्यांचा संहारसुद्धां करूं शकतात ( ५४६ ). पण या कांहीं बाबतींत यांचें परमेश्वराशीं साम्य असलें तरी त्या पूर्ण परब्रह्मपदाला मात्र पोचलेल्या नाहींत–पोचूं शकत नाहींत. परमेश्वरापेक्षां देवतांची पायरी बरीच कमी दर्जाची आहे.[१३] खऱ्या ब्रह्मविद्येचें ज्ञान त्यांच्या जवळ नाहीं ( ५७४ ). यशःश्रीवैराग्यादि कांहीं गुणांनीं युक्त अशा देवता ब्रह्मांडांत आहेत यांत शंका नाहीं; पण त्या सर्व गुणांचा समुच्चय एकट्या परमेश्वराच्याच ठिकाणीं झालेला आहे. ( ५५१ ) शिवाय

---

११. ‘ नित्यवर्गी जीव : देवता : परमेश्वरु उरेति ’ ( संहार १० )

१२. ‘ देवतास्वरूपें ज्ञानानंदरूपें ’ ( विचारमालिका. १५८ )

१३. ‘ कर्मभूमीचिया देवता होति परि परमेश्वरु नव्हेति ’-- वगैरे ( अन्यव्यावृत्ति ).

परमेश्वर हा पूर्णपणें निरंजन आहे. अविद्येचा मळ त्याला कधींही लागत नाहीं. देवता मात्र अविद्येच्या ( अज्ञानाच्या ) काळिम्यानें ग्रासल्या जातात. याप्रमाणें देवताचक्र अविद्यायुक्त[14] व नित्यबद्ध[15] असल्यामुळें तें जीवांना पूर्णपणें तारूं शकत नाहीं. त्यांच्या अनुष्ठानानें स्वर्गादि फळें प्राप्त होतील परंतु मोक्ष मिळणें मात्र शक्य नाहीं ( २९८; ६४१ ) देवतांच्या भजनानें स्वर्गसुख प्राप्त झालें तरी तें अशाश्वत असल्यामुळें मुक्तिहून फार कमी दर्ज्याचें आहे हें सांगणें नकोच. म्हणून ब्रह्मादिक देवता या आपल्या शक्तीच्या साह्यानें जीवांना फार तर अनित्य सुख देऊं शकतात पण खरी मुक्ति–कैवल्य–देणारा एक परमेश्वरच होय ( ६४४; ६४९ ) यांत शंका नाहीं. याच कारणांमुळें महानुभावांनीं देवताभजन कमी प्रतीचें मानलें आहे. एका परब्रह्म परमेश्वराच्या पदपंकजाच्या ठिकाणीं सर्वस्व अर्पण करणें हाच काय तो खरा मुक्तिमार्ग त्यांनीं मानलेला आहे. भास्कर स्पष्टच सांगतो

परमेश्वर-ज्ञानाचां डोळां : वाळुनि देवताचक्राचा मोळा
घेईजे टांकु तुका आगळा : परब्रह्माचा ( ५४३ ) ।

महानुभावांच्या या विचारसरणीमुळें ते सामान्य देवतांची आराधना कधींच करीत नाहींत. यावरून ते देवतांचा द्वेष करतात असा गैरसमज इतर पंथांच्या अनुयायांत निर्माण झालेला आढळतो. पण वस्तुतः असा गैरसमज करून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. महानुभावांनीं देवताभक्ति कमी प्रतीची ठरविली असली तरी देवतांचा तिरस्कार करावा असें त्यांनीं कोठेंच म्हटलेलें नाहीं. उलट देवतांचा निरोध–अपमान केल्यास बरेंच पाप होत असल्याचाच उल्लेख लीळाचरित्रांत[16] आढळतो. शिवाय इंद्रचंद्रादि देवतांची भक्ति ही मोक्षदात्री नसून अनित्य स्वर्गसुख देणारी आहे हें मत कांहीं लोकविलक्षण नाहीं. आपल्या संतांनीं देखील तसेंच मत व्यक्त केलेलें आढळतें. त्यांचा अभ्यासपूर्वक परि-

---

१४ ‘ देवतेचें मळाधार ज्ञान ’ ( वि. मालिका ९८ ).
१५ ‘ नित्यबद्ध देवता : बद्धमुक्त जीवु : नित्यमुक्त परमेश्वरु ’ ( विचार.४५ )
१६. ‘ ऐसें न भणिजे कीं गा डखलेया : देवतेसि निरोधु होय.’

चय श्री. बाळकृष्णशास्त्री महानुभाव यांनीं ' महानुभाव पंथावरील आक्षेप व त्यांचें निरसन ' या आपल्या महत्त्वपूर्ण लेखमालेंतील दुसऱ्या व तिसऱ्या लेखांकांत करून दिलेला आहे. त्यांकडे जिज्ञासूंनीं आपलें लक्ष वळवावें. तींच तीं उदाहरणें या ठिकाणीं पुनरुल्लिखित करून जागा अडवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. असो.

## प्रपंच.

प्रपंचाविषयीं सिद्धांतसूत्रपाठांतील माहिती व मतें भास्कराच्या उद्धवगीतेंत पाहिजेत तितकीं विस्तारानें आलेलीं नाहींत. तथापि त्यांचें सार मात्र थोड्याफार अंशाने उतरलेलें आहे. स्वतंत्रपणें कर्तृत्वशून्य असलेला जीव आरंभीं मायेच्या आधीन असतो. त्या मायेच्या साह्यानेंच तो प्रपंचाची रचना करतो ( ४९६ ). ' जीवु माया मीळणी : ये प्रपंचाची करणी ' ( ४९८ ) असें भास्करानें स्पष्टच म्हटलें आहे. सूत्रपाठांतील ' मायासृष्टि जीव : जीवसृष्टि प्रपंचु ' ( संसरण. ७ ) या व त्यापुढील एकदोन सूत्रांचाच अनुवाद वरील चरणांत केलेला आहे. हा जीवनिर्मित प्रपंच अर्थातच अनित्य होय सूत्रपाठांतील नित्यवर्गीयांत त्याचा समावेश केलेला नाहीं. भास्कर सुद्धां प्रपंच हा चंचल विद्युल्लतेप्रमाणें ( ७१३ ) किंवा मनोरथांच्या मालिकेप्रमाणें अनित्य असल्याचेंच लिहितो. या दोन मुद्यांशिवाय प्रपंचाचें अधिक कांहींच तात्त्विक विवेचन उद्धवगीतेंत नाहीं. संसारावर केलेलें भुजंगाचें रूपक मात्र सुंदर आहे. तें मूळांत पहावें. ( प्र. १०४ )

महानुभावांनीं कार्यप्रपंच जरी अनित्य मानलेला असला तरी, कारण–प्रपंच मात्र नित्य मानलेला आहे. ' एथ प्रपंच म्हणीजे स्वतंत्र पदार्थ एक आति ' ( विचार ६० ) या सूत्रपाठांतील वचनावरून कारणरुप प्रपंच अनादिसिद्ध, अतएव नित्य असल्याचेंच कळतें. उद्धवगीतेंत आलेला प्रपंच मात्र कारणरुप नसून कार्यरुप आहे. व्यवहारांत सुद्धां आपण कार्यरुप प्रपंचच ध्यानांत घेत असतो. अर्थात् हा कार्यरुप प्रपंच, इतर पंथीयांप्रमाणें महानुभावांनीं सुद्धां नाशवंत मानलेला असल्यामुळें त्यांतच त्यांच्या निवृत्तिमार्गाच्या

वटवृक्षाचें बीज सामावून बसलेलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. या अशाश्वत प्रपंचाच्या प्रलोभनाला बळीं पडूनच जीव स्वतःचा नाश करून घेतो. परंतु आध्यात्मिक दृष्टीनें पाहिलें असतां संसाराच्या पाशांत सांपडलेल्या जीवानें ते पाश झुगारून देऊन ईश्वरप्राप्ती करून घेण्यांतच खरें सुख व खरा आनंद आहे. अनित्य संसाराच्या मृगजलाच्या पाठीमागें धांवणाऱ्या जीवाची स्थिति कशी होते, हें

जैसी मनोर्थीचां उद्यानी : कंदर्प-सुख अनुभवी कामिनी
मग वायांचि होए वियोगिनि : कांतेवीण ( ५९८ )
नां तरि स्वप्निचा सुभटु : लोहेंविण घायेवटु
तैसा आत्मा भुंजे वायवटु : संसारु हा ( ५९९ )

या ओव्यांत भास्करानें फार काव्यमय रीतीनें वर्णन केलेलें आहे. अशा या प्रपंचांतून मुक्त होण्यासाठीं निवृत्तिमार्गाचें आचरण करणें अत्यवश्य होय असा महानुभावांचा सिद्धांत आहे. या आचारधर्माचें स्वरूप पुढें पाहूं.

४

## आचार-धर्म.

महानुभाव पंथीयांत पूर्णपणें संन्यस्त झालेल्या व्यक्तिप्रमाणे गृहस्थाश्रमीयांचाही समावेश होत असल्यामुळें या दोघांनाही निरनिराळे आचारधर्म सांगितलेले आहेत. अर्थात् गृहस्थाश्रमीयांपेक्षां संन्यस्तांचा अधिकार विशेष उंच असून त्यांनाच खरी मुक्ती मिळूं शकते. उपदेशी म्हणजे गृहस्थाश्रमांत राहूनच चक्रधराचें अनुयायित्व मान्य करणाऱ्या महानुभावांनीं आश्रमधर्माचेंच योग्य रीतीनें परिपालन केल्यास ते स्वर्ग प्राप्त करून घेऊं शकतात.(७०३-७०४); पण स्वर्गसुख म्हणजे खरी मुक्ती नव्हे, त्यासाठीं जीवानें प्रपंचाचें अनित्यत्व ( ७१३ ) ओळखून स्त्रीपुत्रादिक ईषणांचा ( ७१२ ) पूर्णपणें परित्याग करून ईश्वराच्या ठिकाणीं, शरीराची आस्था न बाळगतां अंतःकरण अर्पण करणें, म्हणजेच पूर्णपणें निवृत्त होणें अत्यंत आवश्यक आहे ( ७१६ ). परमेश्व-

राच्या सान्निध्यांत असलेल्या व्यक्तींना त्याच्या सगुणोपासनेनें मुक्ति सहज मिळूं शकते; पण असन्निधानस्थित भक्तांना मात्र वर थोडक्यांत सांगितलेल्या उपायांवांचून मोक्षमार्ग नाहीं. श्रीकृष्णांच्या भावी विरहाच्या कल्पनेनें व्यथितचित्त झालेल्या उद्धवाला भगवंतांनीं आपल्या अनुपस्थितींत भक्तानें आचरावयाची हीच 'वियोगिची स्थीति'(१६९) सांगितलेली आहे. संन्यस्त झालेल्या व्यक्तीने आप्तेष्टांचा संबंधच (१८९) नव्हे तर त्यांच्या ग्रामादिकांचाही त्याग करून नेहमीं रानावनांत झाडाच्या सावलींत राहणें भाग आहे. (१८३). रसनादि सर्व इंद्रियांवर विजय मिळवून (१९९; २१२) मळिन वस्त्रें नेसून; (१९२) कोठें तरी भूमितलावर (१९३) एकटेंच पडलें रहावें (१८५–१८७). निराहारतेनें (परिमित अन्न सेवनानें) व वैराग्यानें त्यानें अगदीं प्रेतवत् (२०१) होऊन असावें. अगदीं

तया मरणेंसीं धरणें : दुखेंसीं साजणं
तो देयावेया उठी मेल्हवने : या कळेवरासि (२०७)

अशी त्याची अवस्था झाली पाहिजे. सुखासीन स्थितीत परमेश्वर आठवणें जवळ जवळ अशक्यच. म्हणून इंद्रियदमनानें शरीराची कोरडी करून व विवेकानें विकारशून्य विरक्तीचें वातावरण सभोंवताल निर्माण करून 'जैसी सैंया पाळितां: आणिकेंसीं न रमे कांता' (१७८) तितक्या अनन्यतेनें परमेश्वररूपाशीं समरस व्हावें. परमाणूंच्या भूमिकेवर 'जेतुलें दृश्यजात फांके : तेतुलें...लटिकें... मायामय' (२१०) जाणून अंतःकरणांत अखंड ईश्वरस्मरण करावें म्हणजे जीवाला 'ब्रह्मसाक्षात्कारीं रीगावां' (२१२) व 'कैवल्याचां सेजारीं पहुडु' (२१३) सहज होईल. विरक्त पुरुषानें आपल्या अंगीं बाणवून घेण्याचे हे गुण सोदाहरण स्पष्ट करून सांगण्यासाठीं, अवधूतानें यदूला केलेला चोवीस गुरूंचा उपदेश, श्रीकृष्णांनीं उद्धवाला सांगितला. त्यांत पृथ्वीचें सहनशीलत्व; वायूंचें अखंडभ्रमण व निरालंबित्व; आकाशाचें निर्लेपत्व; पाण्याचें पावित्र्य व पावनत्व इत्यादि अनेक सद्गुणांचा समावेश होतो. या चोवीस गुरूंपासून अवधूतानें उचललेले गुण संन्यस्त महानुभावानें आपल्या आचरणांत आणल्यास अनंतशक्ति ईश्वराचें अक्षय्य सुख–कैवल्यपद–प्राप्त होण्यास कांहींच

वेळ लागणार नाहीं. त्यामुळें जीवाचे संसारपाश तटातट तुटून त्याला मुक्ति मिळेल. जन्ममरणाच्या अखंड भ्रमणापासून तो पूर्णपणें मोकळा होईल. असो.

संन्याशांच्या दृष्टीनें वरील आचारधर्म बहुमोल आहे यांत शंका नाहीं. पण व्यावहारिक जगाच्या दृष्टीनें तो निरुपयोगी होय असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. गृहस्थाश्रमी महानुभावांना स्वतंत्र आचारधर्म सांगितलेला असला तरी त्यामुळें जीवास कैवल्यपद प्राप्त न होतां अशाश्वत स्वर्गसुखच काय तें मिळूं शकतें. म्हणून गृहस्थाश्रमापेक्षां संन्यासाश्रम अर्थात् प्रवृत्तिमार्गा-पेक्षां निवृत्तिमार्ग श्रेष्ठ व श्रेयस्कर होय हेंच या पंथाचें मत आहे. अशा-स्थितींत त्याच्या अनुयायांनीं संसारावर पूर्णपणें लाथ मारून त्याकडे पाठ फिरविल्यास आश्चर्य नाहीं. पण मग अशा व्यक्तींचा जगास काय उपयोग? आणि सर्वांनींच जर या निवृत्तिमार्गाचें आचरण केलें तर जग चालणार तरी कसें? महानुभावपंथ निवृत्तीच्या एका टोकाला गेलेला आहे हें यावरून दिसून येईल. त्यापेक्षां संसारांत राहून परमार्थसाधन करण्याचा, सामान्य जनतेला देखील आचरणांत आणतां येईल असा उपदेश करणारा भागवतधर्म अथवा वारकरी पंथ एका दृष्टीनें श्रेष्ठ म्हणतां येत नाहीं का? कष्टासायासानें मनुष्यदेह मिळाल्यानंतर, स्त्रीपुरुषांनीं प्रेतवत् होऊन राहणें ( व ईश्वरस्मरण करणें) म्हणजे जगांत असून नसण्यासारखें आहे. मग ईश्वरानें हा एवढा पसारा निर्माण करविला तरी कशाकरतां? हा प्रश्न सहज उपस्थित होतो. यापेक्षां अनासक्त रीतीनें संसार करण्यांतच प्रपंचाचें व परमार्थाचें खरें सार सांठविलेलें आहे असा सदुपयोगी उपदेश करणारा संप्रदायच श्रेष्ठ ठरेल यांत शंका नाहीं. श्रीकृष्ण भगवंतांनीं गीतेच्या द्वारें उपदेशिलेला मार्ग वरील प्रकारचाच होय. महानुभावांचा एका टोकाला गेलेला निवृत्तिमार्ग हा निरुपयोगीच नव्हे तर सर्व जीवांना आचरण्यास अत्यंत कठिण असा मार्ग आहे. असो. याप्रश्नाचें विवेचन याठिकाणीं यापेक्षां अधिक विस्तारानें करतां येत नाहीं. वरील वर्णना-

१७. 'मसनींचें लांकुड तेंही वरि एका उपयोगा जाए परि आपण कवणाचे-याही उपयोगा न वचावें ' ( आचार. ५९. ).

वरून उद्धवगीतेंत प्रतिपादिलेलीं महानुभावपंथाचीं तत्त्वें व त्यांचा निवृत्तिपर आचारधर्म अभ्यासकांना सहज समजूं शकेल असें वाटतें.

१८

## काव्यपरिचय.

उद्धवगीतेंतील तत्त्वज्ञानाची व आचारधर्माची ओळख करून दिल्यानंतर निराळा काव्यपरिचय लिहिण्याची विशेष गरज राहत नाहीं. कारण तत्त्वज्ञान व आचारधर्म यांखेरीज स्वतंत्र असा भाग उद्धवगीतेंत फारच थोडा आहे. काव्याचा प्रास्ताविक भाग, उद्धवाचा शोक व ऋष्यशृंगाचें कथानक या तीन प्रकरणांची माहिती वाचकांना मिळाली म्हणजे उद्धवगीतेंतील सर्व विषय त्यांना परिचित करून दिल्यासारखें होईल. यासाठीं त्यांच्याकडे क्रमाक्रमानें वळूं.

## काव्याची प्रस्तावना.

कवींच्या परंपरागत रूढीला अनुसरून काव्याच्या प्रारंभीं भास्करभट्टानें आपल्या पंथाच्या पंचकृष्णांपैकीं श्रीदत्तात्रेय, श्रीकृष्ण व श्रीचक्रधर या तीन परमेश्वरस्वरूप व्यक्तींना अभिवंदन केल्यावर आपला दीक्षागुरू जो नागदेवाचार्य त्यालाही नमन केलें आहे. आरंभीच्या दत्तात्रेयवंदनाचा, प्रस्तुत काव्यलेखनाविषयीं प्रसिद्ध असलेल्या दंतकथेशीं कांहीं संबंध नाहीं हें येथे लक्षांत ठेवावें. दत्त हा महानुभावपंथाचा आदिनाथ[१९] मानलेला असल्यामुळेंच त्याच्या वंदनपर ओवी आरंभीं घातलेली आहे. शिशुपालवधांतही तसेंच आढळतें. यावरून भास्करानें माहूर येथें विजय मिळवला म्हणून तेथील अधिष्ठात्री देवतेला त्यानें आधीं वंदन केलें असें म्हणतां येत नाहीं. असो. वंदनानंतर ‘ चैतन्यचिये खोल वाटे : पातां वेदांचि धाव कुंठे : तें श्रीकृष्णरूप नेटेबोटें : कवण

१८. प्रकरण ४. पृ. ८५ ते ८८ वरील विवेचन पहा.

१९. ‘ वानरेया ! या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण ’(ली. च.पूर्वार्ध.)

वर्णू जाणे ?' अर्थात् आपल्याला तर त्या श्रीकृष्णाचें यथार्थ वर्णन करतां येणार नाहीं अशी नम्रता प्रगट करून कवि म्हणतो 'पण परमेश्वराचे गुणानुवाद गातांना जेथें पशुपक्ष्यांना देखील स्फूर्ति येते व ते शद्बसागर निर्माण करूं शकतात तेथें कवीला अशक्य असें कांहीं नाहीं.' परमेश्वरकृपेनें आपला ग्रंथ अत्यंत रसाळ होणारच आणि म्हणून तो वाचण्याकरतां रसिक आपणहून धांवत येतील; त्यांना त्याबद्दल विनंति करावयास नको; असा आत्मविश्वास भास्कराला वाटत होता. आमचा उपभोग घ्यावयास या असें भृंग्यांना कमळें कधीं स्वतः आमत्रण देतात काय ? कीं आम्रवृक्ष कधीं कोकिळांना प्रलोभनार्थ नेसवणी देऊन बोलावतात? मेघमंडळ चातकांना लांच देऊन पाचरीत नाहीं कीं चंद्र कधीं आपणाहून चकोरांना मूळ धाडीत नाहीं. तद्वतच 'प्रबंधु होइल रसिकु : तरि आइकैल श्रोतेयांचा देशकु :' असे उद्गार तो काढतो. आपल्याला श्रोते जर रसिक मिळाले तर काव्यकर्तृत्वालाही बहर येईल कारण

भेटति द्रावक गोटे : तरि लोहासि झरा फुटे
सोमकांता गळती थेंबटें : चंद्रकरातव ( १७ )
नां तरि देखौनि रविमंडळ : विकाशे कमळांचें बांवळ
कोमेजे केतकी जौळ : मेघींकरूनि ( १८ )

त्याप्रमाणें मार्मिक श्रोता भेटला तर कविता रसभावांनीं फुलून येते व मग नउ रसांचे पाट वहावयास लागतात. श्रोता व वक्ता ( कवि ) यांच्या अशा सुंदर संगमांत निर्माण झालेली आपली कविता भास्कराला स्वतःलाच किती विलोभनीय वाटत होती तिचें तो वर्णन करतो.

आपुला कळरवीं : कविता कल्हंसातें पढवी
ते रंगमाधुर्य सीखवी : मधुकरातें ( २३ )
आंगिचिया सौरभ्यकळा : उणं आणी परिमळा
गांभीर्यें करी अवकळा : गगनगंगेसि ( २४ )
पदप्रमेयाचें गुंफणें : स्यामा भुजबंधातें जिणे
कोवळीक घाली सीरणें : शिरीष पुष्पांसी ( २६ )

पदांचा मेळावा : रत्नाकरा करी चडावा
प्रमेय करी हेवा : अमृतलहरीसीं ( २८ )
आंतु चंद्रकरा : झळाळु दीसे सुधाकरा
तैसे पदांचेया पदरां : भीतरि भाव डोळां दीसति (२९)
पिळिलेया चंद्रबिंब : सुटति अमृतधारांचे कदंब
तैसे फुटति तुंब : नवरसांचे ( ३० )

अशा प्रकारच्या सुंदर काव्यकल्पलतेवर तत्त्वज्ञानाचीं फुलें फुलवलीं तर तीं रसिकांना खात्रीनें आवडतील ( ३१ ). म्हणून 'साहित्याचां राहणी : शांत-रसाचें अवतरण' ( ३५ ) आणण्याची प्रतिज्ञा करून कवीनें पुढील कथा-भागाला आरंभ केला आहे. तत्पूर्वी 'मज नाहीं प्रमेयाचा सौरसु : वरी अज्ञा-नाचा डोळेलांसु : तया केवि आतुडे मोसु : तया निरूपणाचा' असा आपला विनम्र भाव प्रगट करून

पुन तेणें आखरें एकें : येवढि संसारवागुर चुके
म्हणौनि श्रीकृष्णनिरूपणी कवतुकें : प्रबंधु करीतु असें (४०)

असा काव्यलेखनाचा हेतु त्यानें निर्दिष्ट केला आहे हें लक्षांत ठेवावें. त्यावरून भास्कराच्या अंतःकरणाची परमार्थपरायण भूमिका चांगली लक्षांत येते.

## विरह-विलाप.

दुर्जनांचें निर्दलन करून सज्जनांना सुखी करण्यासाठीं भूमीतलावर अवतरलेला भगवान श्रीकृष्ण द्वारकेंत राज्य करीत असतां जिकडे तिकडे आनंदी आनंद होता. अष्टभोगांना नित्यनूतन शोभा प्राप्त होऊन शांतीचें साम्राज्य व आनंदाचा पाट सर्वत्र पसरलेला होता. विवेक, प्रबोध, वैराग्य, तप, अध्यात्म, ब्रह्मविद्या, ज्ञान-विज्ञान, भक्ति, मुक्ति, वेदोपनिषदादि सर्वांच्या सौभाग्याचा तो काळ होता. भास्कराच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे, 'सर्व सुखाची दीवाळी : जाली चराचरासीं' ( ४८ ). याप्रमाणें, भक्तांचा उद्धार करून कृतकृत्य झालेल्या यदुनंदनानें आपलें अलौकिक अवतारकार्य संपविण्याचा विचार केला. वैभव-मदानें प्रमत्त झालेल्या आपल्या यादवांचा संहार करण्यासाठीं ब्राह्मणशापाचें

निमित्त त्यानें घडवून आणलें; आणि त्या शापांतून मुक्त होण्याचा उपाय म्हणून यादवांना प्रभास-तीर्थाला जाण्याची आज्ञा केली. देवाची ही आवराआवर पाहून त्याच्या परमप्रिय उद्धवाला मात्र वाटलें कीं, 'गोसांवी निजधामा आतां : बिजें करीति :' ( ६४ ). उद्धवानें भगवंताला विचारतांच 'निजधामा फुडे : जाईजैल आतां' ( ६७ ) असें त्यानें स्पष्टच सांगितलें. पण हे शब्द मुकुंदाच्या मुखांतून निघतांच, एवढा मोठा विवेकी उद्धव पण त्याला अकस्मात् वज्राघात झाल्यासारखें वाटलें आणि तो एकदम मूर्च्छित होऊन खालीं पडला. त्याच्या या अवस्थेचें वर्णन भास्कर करतो,

तो जैसा करुणारसीं वीराला : किं विरहदीपें घोंटला
ना तरि सागरीं बुडाला : शोकाचिये ( ७२ )
किं दुःखेसीं एकवटला : तो शांत-रसु मुराला
तैसा निचेष्टु जाला : भक्तराजु तो ( ७३ )

मूर्च्छेतून मुक्त झालेल्या उद्धवदेवाच्या अंतःकरणांतील करुणोद्गार-त्याचा विरह-विलाप भास्करानें फार सहृदयतेनें वर्णिलेला आहे. तो वाचकांनीं मुळांतच वाचावा. पण त्याची किंचित् कल्पना येण्यासाठीं पुढील ओंव्या पहा.

कां आझुई हृदय न फुटे : प्राणतंतु न तुटे ?
चोळाखा न फुटे : कळेवराचा ( १४७ )
तो मृत्यु काई जाला ? : कीं मातें वीसरला ?
कि हाथिएरु मोडला : अंतकाचा ? ( १५० )
किं काळाची देशवही : वाचितां माझें नांव नाहीं ?
किं पंचत्व पावला तोही : तुझेनि विरहें ? ( १५१ )

स्थल-संकोचास्तव अधिक ओंव्या उध्दृत करणें अशक्य आहे. विलापाच्या या सर्व ( ५८--१५३ ) ओंव्यांतून भास्कराचें हळुवार हृदय, कमनीय काव्य-कल्पना, नागर भाषाशैली, रसिक विद्वत्त्व इत्यादिकांचा फार सुंदर मेळ पडलेला दिसतो. असो. आपल्या विरहकल्पनेनें दुःखित झालेल्या भक्ताला भगवंतांनीं जो उपदेश केला त्याचा निर्देश आम्ही आचारधर्मांत केलेलाच आहे, तो तेथें पहावा.

## ऋष्यशृंग–कथानक.

उपदेशाच्या ओघांत अवधूतानें यदूला सांगितलेल्या चोवीस गुरुंच्या गुणांचा इतिहास उद्धवाला निवेदन करीत असतां, मुळांत एका अनुष्टुपांत आटोपलेलें आख्यान भास्करानें विशेष विस्तारानें वर्णिल्याचा उल्लेख मागें केलाच आहे. अगोदरच श्रृंगाररसानुकूल कथानक, त्यांत भास्करासारख्या रससिद्ध कवीची त्याला मिळालेली जोड; मग प्रासादिक काव्यरसाचा ओघ वहायला लागला असल्यास नवल नाहीं. एकदा, अवर्षणानें त्रस्त झालेल्या दशरथाच्या देशांत यज्ञसिद्धीसाठीं ऋष्यशृंगासारख्या ऋषीची आवश्यकता होती. पण आपलें निवासस्थान सोडून तो येणें शक्य नव्हतें. म्हणून पात्र-कळिका नायिकेबरोबर सुंदर तरुणींची सेना देऊन ऋष्यशृंगाला क्रीडाकुरंग करून धरुन आणण्यासाठीं तिची रवानगी झाली. मलयानिल आणि वसंतऋतु हे तिचें साह्य करण्यासाठीं सिद्धच होते. या दोघांनींही ऋष्यशृंगाच्या वैराग्य-वनांत विषयोपभोगाच्या उन्मत्तपणानें नुसता तोबा उडवून दिला. त्यामुळें ‘ कामक्रिडा रसाळें : खेळती पक्षीकुळें ’ इतकेंच नव्हे तर ‘ झाडा उपजती डोहळे : कामिणीयांचे ’ ( ४२९ ). जिथें पक्ष्यांची आणि वृक्षांची ही स्थिति तिथें पंचबाणाच्या बाणांनीं झांजरलेल्या व घायाळ झालेल्या हरिणी, मऊ शाद्व-लाच्या गालिच्यावरील हरिणांच्या अंगावर सुखोपभोगाच्या इच्छेनें आपणहून जाऊन पडत असल्यास आश्चर्य वाटायला नको. आणि तपस्वी–जनांची स्थिति? ते तर मदनाच्या या माजवणानें गलितवीर्य होऊन आपल्या सुटलेल्या जटा कशा तरी सांवरीत इतस्ततः पळूं लागले. कोकिळांच्या मधुर आवाजांचे भाले अंतःकरणांत भोंसकले गेल्यामुळें बिचारे ते तरी कसा धीर धरणार ! अशा परिस्थितींत ‘ तो धरुनि हीरवा : ऋषीशृंगु रायापुढें सुआवा : म्हणौनि पात्र-कळिका कवणी टेवा : जुझती जाली ’ : ( ४३९ ) तें आतां पाहा. या ‘ मातावळी मदनयक्षिणीनें ’ ( ४२३ ) निराळीच युक्ति काढली तिनें ऋष्य-शृंगाला युद्धाचें सरळ आव्हान दिलें. आपल्या शरीरदुर्गाच्या जंघनाचे कडे झाडून आणि नितंबाचे बुरुज सज्ज करून ( ४४२ ) त्यांवर जिकडे तिकडे पंचबाणाचीं अपार शस्त्रास्त्रें तिनें ठेवून दिलीं. युद्धाचें आव्हान म्हणून कंकणांचीं

निशाणें व नुपूरांचीं तुरें एकदम वाजवावयाला आरंभ केला. आणि गायनाचा पहिला बाण ऋष्यशृंगावर फेकला. ' पुणु ऋषिशृंगु ध्यान–सींहासना : वरुनि ढळेचि ना ' ( ४४६ ). पण बाणांची अनिवार वृष्टी व्हावयाला लागली तेव्हां मात्र 'मग चांचरी जातु उठि : ऋषिशृंगु तो ' ( ४४७ ). पाणी मुरूं लागलेलें पाहून त्या महामायेनें मग नवीनच उपायांची योजना केली. ती आतां नृत्याच्या शस्त्रांनीं ऋष्यशृंगाला टोंचूं लागली. पुष्पांजुळी, पताका, त्रिपताका, खटुकामुखु, सूचिमुखु, वगैरे वगैरे नानाविध नर्तनपरिपाठींचा तिनें उपयोग केला. तिनें छत्रभवरी आणि अलगभवरी घेतांबरोबर ऋष्यशृंगाच्या हृदयाचे तुकडे तुकडे झाले ( ४५९ ). आणि लौकरच ' मनोरथु पुरला; ऋषीशृंगु हातीं लागला : मग माघौति ते अबळा : नगरा येति जाली : '(४६४) यावरून

म्हणौनि प्रमदाचें गाणें वाणें : नाइकावें ध्यानपरायणें
तया मूर्त्त मृत्युसीं साजणें : चित्तरागांसि ( ४६६ )

याप्रमाणें ऋष्यशृंगाच्या आख्यानाचें मंथन करून वरील तत्त्वाचें लोणी भास्करानें काढलें आहे.

या आख्यानांतील भास्कराच्या तरल कल्पनाशक्तीची, विद्वत्तेची, अलंकारवैभवाची, सरस शब्दयोजनेची व मनश्चक्षूंसमोर प्रसंग उभा करणाऱ्या व अंतःकरण ढुसळणाऱ्या वर्णनशैलीची निराळी प्रशंसा करण्याचें कारण नाहीं. अर्धोन्मीलित नेत्रांनीं या आख्यानाचें कल्पनाचित्र, भावविवश होऊन पाहण्यांत व त्याचा आनंद अंतःकरणानें उपभोगण्यांतच खरी खुमारी आहे. ती शब्दांनीं वर्णन करणें शक्य नाहीं. ' नृत्यंतर्गत टाकणें कठिणता, तद्रूपता पावणें । काव्यनंदरसप्रसंग मग हा निस्संग संभोगणें ' ( फुलांची ओंजळ. पृ. १७० ) एवढीच वाचकांस विनंती करून हें आख्यान आटोपतों.

६

## वेदप्रामाण्य, वर्णाश्रमधर्म व मूर्तिपूजा.

वरील विवेचनावरून उद्धवगीतेच्या अंतरंगाची अभ्यासकास स्पष्ट कल्पना सहज येऊं शकेल असें वाटतें. आतां राहिलेल्या विभागांत महानुभा-

वांच्या वेदप्रामाण्यासारखे कांहीं प्रश्न, प्रस्तुत काव्याचा छंद, भाषा-व्याकरण, गुणदोषविवेचन इत्यादि मुद्यांचा विचार करून हें प्रकरण आटोपतें घेऊं. महानुभावपंथ वेदविरोधी असल्याबद्दल बऱ्याच लोकांचा गैरसमज झालेला आहे. पण तो खरोखर वेदविरोधी नसून वेदप्रामाण्य मान्य करणारा आहे असें मी स्वतः व श्री. बाळकृष्णशास्त्री यांनीं यापूर्वी सप्रमाण सिद्ध करण्याचे प्रयत्न केलेलेच आहेत. [20][21] ते पहावे. केवळ उद्धवगीतेपुरता विचार केला तर तीवरून मुद्धां आमच्या मतालाच पुष्टि मिळते. 'भांडवल जोडलें : उपनिषदांसि' (४६); 'वेदा बाहाळि जाली : विशानें भलीं थोरावलीं' इत्यादि त्रुटित उल्लेखांवरून भास्कराच्या मनांत वेदांविषयीं आदर होता हें स्पष्ट दिसतें. इतकेंच नाहीं तर श्रीकृष्णाच्या अनुपस्थितींत 'उपनिषदां उन्हाळा जाला : वेदा अकाळमृत्यु घडला' ( ८७ ) म्हणून उदास विलाप करणाऱ्या उद्धवाचे हे शब्द भास्कराच्या अंतरंगाची साक्ष पटवितात असें कोण म्हणणार नाहीं? पण याहीपेक्षां

तैसें वेदविद्याशास्त्रमथित
जाणे सकळ सिद्धांत
जया सर्वज्ञता : ब्रह्मविदा ( ३५४ )

या ओवींत तर ब्रह्मविद पुरुषाला 'वेदविद्याशास्त्राचें मंथन करून काढलेले सिद्धांत माहीत पाहिजेत' असे महानुभावपंथानुयायी भास्कर स्पष्टच म्हणतो. प्रस्तुत पंथ वेदविरोधी नसून वेदप्रामाण्य मान्य करणारा आहे हें दाखविण्यास इतकीं उदाहरणें पुरेशीं आहेत.

वेदांप्रमाणेच वर्णाश्रमव्यवस्थेच्याही विरुद्ध हा पंथ असल्याचें कित्येक मानतात. पण तेंही खरें नाहीं. मोक्षप्राप्तीसाठीं संन्यासाश्रमच श्रेष्ठ होय हें महानुभावांचें मत आहे यांत शंका नाहीं. पण आपल्या पंथांतील उपदेशी वर्गासाठीं आश्रमधर्माचेंच आचरण चक्रधरानें [22] सांगितलें आहे हें विसरून चाल-

---

२०. वागीश्वरी. जुलै १९३३. 'महानुभाव आणि वेदप्रामाण्य' लेख.

२१. विहंगम. फेब्रु. १९३४. 'महानुभावपंथावरील आक्षेप व त्यांचें निरसन'

२२. लीळाचरित्र. ( पूर्वार्ध. लीळा ६०१ ).

णार नाहीं. पूर्ण मुक्ति मिळत नसली तरी आश्रमधर्माच्या आचरणानें स्वर्गसुख व विभूतिमंडळांत स्थान खात्रीनें मिळतें. असें भास्करानेंही म्हटलें आहे. ( ७०२–७०४ ). यावरून चक्रधर किंवा भास्कर वर्णाश्रमव्यवस्थेच्या विरुद्ध होता असें मुळींच म्हणतां येत नाहीं. वर्णाश्रमव्यवस्था अमान्य असल्यामुळें ती मोडून टाकण्यांतच खरें समाजकल्याण आहे असा उपदेश महानुभावांतील कोणत्याच जबाबदार व्यक्तीनें अजूनपर्यंत केलेला नाहीं. उद्धवगीतेवरून सुद्धां तसें म्हणावयास आपणांस कांहीं आधार मिळत नसल्यामुळें महानुभावपंथ हा आश्रमरचनेविरुद्ध नाहीं असें मत देण्यास कांहीं हरकत नाहीं असें मला वाटतें.

वरील दोन प्रश्नांप्रमाणेंच मूर्तिपूजेच्या प्रश्नाचीही व्यवस्था लावतां येते. उद्धवगीतेंत मूर्तिपूजेवर कोठेंच हत्यार चालवलेलें आढळत नाहीं. उलट ईश्वरभक्तीच्या दोन मार्गांपैकीं ' तरि सगुण ते प्रस्तुतीं : आइक तुं ' ( ७८६ ) सगुणोपासनेचें वर्णन भास्करानें बरेंच विस्तारानें केलेलें आहे. त्यांतही

आराधनीं अनंतीं : भजिजे माझिये मूर्ति
अनेगीं स्तोत्रीं स्तुती : स्तवन कीजे ( ७८७ )

या ओवींत तर मूर्तिपूजेचा प्रत्यक्ष पुरस्कार आढळतो. कोणत्याच फळाची चाड न करतां यज्ञदानादि व्रतें केलीं तरी चालतात; इतकेंच नव्हे तर त्यांनीं ईश्वराचें प्रेम देखील भक्ताला मिळूं शकतें असें म्हणण्यापर्यंत भास्कराची मजल गेलेली आहे. केवळ यज्ञयागादिकांनीं अनित्य स्वर्गसुख प्राप्त होतें पण निष्काम बुद्धीनें हीं कर्में केल्यास ईश्वरप्रेमाचा लाभ होऊं शकतो असें भास्कराचें मत स्पष्ट दिसतें. यावरून भास्कर व पर्यायानें महानुभावपंथ हा मूर्तिपूजेच्या विरुद्ध असल्याचें मानतां येत नाहीं. उलट मूर्तिपूजेला त्यांची कांहींच हरकत नाहीं असें वरील विवेचनावरून स्वच्छ दिसून येतें. इतर पुराव्यांनीं देखील वरील मताचा पाठपुरावा करतां येणें शक्य आहे. पण तसें करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें लेखणी आवरती घेतों. असो.

७

## शिशुपालवध व उद्धवगीता

उद्धवगीतेचा सांगोपांग विचार करीत असतां, भास्कराच्याच शिशुपालवधाशीं प्रस्तुत काव्याचें असलेलें साम्य व विरोध पाहणें इष्ट होईल. माझ्या मतें भास्कराचें अंतःकरण यथार्थत्वानें ओळखण्यासाठीं या दोन्ही काव्यांचा एकसमयावच्छेदेंकरुन विचार करणें अवश्य आहे. महानुभावपंथाचें एक प्रमुख दैवत–भगवान श्रीकृष्ण–याची पूजा बांधण्यासाठीं भास्कराच्या हृदयसरोवरांत निर्माण झालेलीं दोन सुगंधी कमळें म्हणजेच शिशुपालवध व उद्धवगीता हीं काव्यें होत. पैकीं, पहिल्या काव्याला शृंगार व प्रेमभावसूचक रक्तकमलाची उपमा देतां येईल, तर दुसऱ्याला पावित्र्यदिग्दर्शक धवल वर्णांकित पुंडरीकाची उपमा साजेल. कारण शिशुपालवधांत शृंगाररसाला प्राधान्य मिळालेलें आहे, तर उद्धवगीतेंत शांतरसाचें वातावरण पसरलेलें आहे. पहिल्याची रचना केवळ एक सुंदर ललित कृति निर्माण करण्याच्या हेतूनें झालेली आढळते, तर दुसरें, तत्त्वज्ञानाचे घुटके वाचकांच्या गळीं बळेंच उतरविण्याच्या हेतूनें लिहिलेलें दिसतें. म्हणून पहिल्यापेक्षां दुसरें काव्य साहजिकच किंचित् रुक्ष झालेलें असल्यास नवल नाहीं. शृंगाराबरोबर हास्य व वीररसाचा परिपोष करण्याला शिशुपालवधांत जसा कवीला अवसर होता, तसा तो उद्धवगीतेंत नव्हता. म्हणून रसांची विविधता देखील पहिल्या इतकी दुसऱ्यांत आढळत नाहीं. अननुकूल वातावरणामुळें उद्धवगीतेंतील काव्यकल्पनांचीं फुलझाडें देखील खुरटलेलीं दिसतात. शिशुपालवधामध्यें त्यांचा बहार जसा फुलून आला आहे, तसा तो उद्धवगीतेंत खात्रीनें नाहीं. किंबहुना पहिल्या काव्यांतील साहित्याचा साज कथानकाला व कथानक साहित्यनिर्मितीला जसें साह्यभूत झालेलें आहे, तसें तें दुसऱ्यांत नाहीं. ज्ञानेश्वरांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ' आंगाचेनि सुकुमारपणें । लेणिया अंगचि होए लेणें । तेथें अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ( ज्ञाने. अ.१०. ४४ ) असा कथानक आणि साहित्य यांचा ' साधारणोभूषणभूष्यभावः ' ( कुमार. स. १. ४२ )

शिशुपालवधांत आहे; पण त्यांचा तितका सुंदर संगम उद्धवगीतेंत मात्र दुर्दैवानें झालेला नाहीं. किंबहुना उद्धवगीतेला रसानुकूल कथानकाची पार्श्वभूमीच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. निर्मळ तत्त्वज्ञान सुंदर उपमादृष्टांतादिकांच्या साह्यानें सांगण्याचा यशस्वी प्रयत्न या दुसऱ्या ग्रंथांत झालेला असला, तरी त्याला 'काव्य' ही पदवी यथार्थतेनें लावणें जरा कठीणच दिसतें. उद्धवगीतेचें वाचन सहृदयवाचकांपेक्षां विचारवंत वाचकांच्याच अवधानाची अपेक्षा करते. सारांश रसलोलुप अंतःकरणाची तृषा शिशुपालवध शांत करूं शकते; तर तत्त्वगंभीर बुद्धीची जिज्ञासा उद्धवगीतेमुळें तृप्त होते. म्हणून पहिल्यांत जशी काव्याची बहार आहे, तशी दुसऱ्यांत नाहीं. पण दुसऱ्यांतील तत्त्वज्ञानाचें बोधदायक व पवित्र वातावरण पहिल्यांत नाहीं, हेंही तितकेंच खरें. असो!

## ८

## नाथभागवत व उद्धवगीता.

महामुनी व्यासकृत भागवताच्या एकादशस्कंधावरील या दोन्ही टीकांची तुलना करून पाहणें मोठें मनोरंजक आहे. एकनाथ महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें 'पुराणीं श्रेष्ठ भागवत। त्याही माजीं उद्धवगीत' (अ० १०६९०) अशा या प्रसंगावर केलेल्या प्राकृत टीकेमुळें आपण जगाला ज्ञानाची मेजवानी दिल्याचें भास्कर सांगतो 'एकादशेंसीं सरिसीं : भाजुनि साहित्य देशी : मियां आवरूं केलें जगासि : ज्ञान-अमृताचें (८२६) तर, 'हे टीका तरी मराठी। परी ज्ञानदानें होईल लाठी।' (अ. १३०.५३९) असें नाथांचेंहीं म्हणणें आहे 'पाहुनी तें तें प्रकरण.' (८२५) आपण केलेली टीका विचक्षण ग्रंथवेत्त्यांनीं पारखून पाहावी अशी जशी भास्कर विनंती करतो, तशी 'एकादशाचा पदपदार्थ' (अ. ३१. ५००) आपण वाखाणल्याचें सांगून अभ्यासकांनीं 'अर्थ पहावा यथार्थी' (३१० ५१७) अशी नाथही विनंती करतात. या विनंतींत दोघांच्याही टीकांच्या सामान्य स्वरूपाची कल्पना यथार्थतेनें उतरलेली आहे. भास्करानें केवळ प्रकरणशः टीका करण्याची म्हणजे भागवतांतील प्रकरणांचा केवळ भावार्थ प्राकृतांना रूपांतरीत करण्याची इच्छा बाळगिली होती, तर नाथांनीं मुळांतील

प्रत्येक शब्दाचा सम्यक् अर्थ मराठींत आणण्याचें ध्येय डोळयांसमोर ठेवलें होतें. म्हणूनच पहिल्या कवीला आपला टीकाप्रपंच थोडक्यांत मांडता आला, तर दुसऱ्याला त्याचा अवाढव्य विस्तार करावा लागला. महानुभाव पंथीयांच्या संख्येप्रमाणें उद्धवगीतेची आकृती लहानशीच आहे, तर वारकरीपंथीयांच्या संख्येप्रमाणें नाथभागवताची आकृती फुगलेली आहे. मराठी काव्यवाङ्मयाच्या आकाशांतील उदयकालीन बालभास्कराच्या आकृतीप्रमाणें आपल्या भास्कराची उद्धवगीता शोभते, तर माध्यान्हकालीन चंडांशूच्या आकृतीप्रमाणें नाथांची टीका त्यांच्या ज्ञानाच्या व विद्वत्तेच्या तेजानें तळपते. भास्कराच्या काळीं, मराठी कविताकामिनीनें आपला संसार नुकताच सुरू केला होता. तिचा छंद एकच, चरणांची चाल मोजकीच, अंगांत गांभिर्यापेक्षां रसवत्ता विशेष, तिच्या ठिकाणीं तरल कल्पनांच्या चंचल नेत्रकटाक्षांचीच सहजनिर्मिति, पण त्यांतून एकप्रकारचें पावित्र्याचें व निरागसतेचें विलोभनीय वातावरण पसरलेलें; उद्धवगीतेची स्थिति अगदीं अशी आहे. उलट नाथांच्या वेळीं मराठी कविताकामिनी बरीच प्रौढ झालेली होती. तिच्या अंगांतील अल्लडपणा जाऊन त्या ठिकाणीं गंभीरपणा आला होता. तिचा संसार वाढला होता; चालण्याबोलण्यांत विशेष नीटनेटकेपणा, शरीरयष्टी वाढलेली असली, तरी तिच्यांत प्रमाणबद्धतेचा अभाव दिसून येत नाहीं. नाथांच्या भागवताकडे पाहिल्यास या गुणांची सहज कल्पना येते. अल्लड तरुणीप्रमाणे प्रसंगीं मुळाला सोडून भास्कराची काव्य-रमणी शृंगाराकडे वाहवलेली दिसते. नाथांच्या टीकेचें मात्र तसे झालेलें नाहीं. त्यांनीं भास्कराप्रमाणें मुळांतील प्रसंग गाळलेलेंहि नाहीं व स्वतःच्या पदरचे प्रसंग त्यांत घातलेही नाहींत. म्हणून, खऱ्या टीकेच्या दृष्टीनें नाथभागवताची श्रेष्ठता कुणालाही नाकबूल करतां येणार नाहीं. आतां, भाषेच्या दृष्टीने उद्धव-गीतेंतील शब्द थोडेसे क्लिष्ट वाटतात खरे; पण हा दोष भास्कराचा नसून त्याच्या पुरातनत्वाचा आहे. त्यामुळें भास्कराची कविता वाचतांना, मधें मधें अडखळल्यासारखें होतें. पण त्याला इलाज नाहीं. नाथभागवताची भाषा मात्र आबालवृद्धसुबोध आहे व म्हणून या ग्रंथाचें अध्ययन आज महा-राष्ट्रांत घरोघरीं चाललेलें आढळून येतें. सारांश, मराठी वाङ्मयाच्या उद्या-

नांत फुललेलीं हीं दोन्ही टीकापुष्पें आपापल्यापरीनें सहजसुंदरच आहेत; पण हिरव्या चाफ्याप्रमाणें पहिलें पुष्प विशेष विलोभनीय नसलें, तरी त्यांत साहित्याचा व शृंगाराचा उन्मादक सुगंध आहे; तर दुसरें पुष्प अध्यायांच्या अनेक पाकळ्यांनीं विशेष शोभणाऱ्या व साहित्याच्या परिमित परिमलानें सुगंधित झालेल्या गुलाबाप्रमाणें आहे.

## ९

## छंद.

प्रस्तुत काव्यांत अथपासून इतिपर्यंत एका ओंवी छंदाचाच उपयोग केलेला दिसून येतो. हा छंद दहाव्या शतकापासून महाराष्ट्रांत प्रचलित असावा असें 'अभिलषितार्थ चिंतामणी' ग्रंथांतील 'महाराष्ट्रयोषिद्भिरोवी गेया तु कंडने' या उल्लेखावरून दिसतें. आरंभीचे बहुतेक मराठी काव्यग्रंथ या छंदांतूनच लिहिलेले आहेत. ओंवी शब्द ओंवणें या धातुपासून तयार झाला असून संस्कृतांतील रचनासुलभ अनुष्टुपाचेंच तें प्राकृत स्वरूप असावें असें वाटतें. सामान्यतः साडेतीनचरणी व साडेचारचरणी असे ओव्यांचे दोन प्रकार आढळतात. साडेतीन चरणी ओंवीच्या पहिल्या तीन चरणांच्या शेवटीं अन्त्ययमक असतें; तर दुसऱ्या प्रकारच्या ओंवींत चवथ्या चरणांत सुद्धां कुठें तरी आरंभीच्या तीन चरणांतील अन्त्ययमकाचें अक्षर आलेलें असतें. उद्धवगीतेंतील ओंवी, साडेतीन चरणी आहे हें सांगावयाला नकोच. या ओंवीला अक्षरसंख्येचें किंवा मात्रांचें कोणतेंच बंधन नसल्यामुळें 'मन मोडे : स्नेह विघडे' सारख्या ठिकाणीं तिनें आपले पाय अगदीं आंखडते घेतलेले आहेत, तर कोठें कोठें 'शिव शिव कदनाची विवसी संसारीं' ( २२९ ; 'हा आत्मा घे नाना शरीराची आंगवणी' ( ५१८ ) याप्रमाणें तिनें ते खूप लांब पसरलेले आहेत, साडेचार चरणी ओंव्या नाथांच्या भागवतांत आहेत; उदाहरणार्थ पुढील ओंवी पहा—

मातिचेया द्रोण केला । तो कौळिका भावो फळला
म्हणोनि विश्वासेंवीण नाडला । जगु ठाकला, विकल्पें ॥ ( अ० १०४३ )

१०

## व्याकरणविशेष.

पुढील विभागांत उद्धवगीतेंतील भाषेच्या व्याकरणाचें सामान्य स्वरूपच दिग्दर्शित करावयाचा विचार आहे. ज्ञानेश्वरीनंतर उद्धवगीता लिहिली गेली असली तरी या दोन्ही काव्यांतील भाषेच्या व्याकरणांत कांहीं विशेष फरक आढळत नाहीं. ज्ञानेश्वरीच्या व्याकरणावर आतांपर्यंत बरेच लेख लिहिलेले असल्यामुळें त्यांच्या साह्यानें उद्धवगीतेच्या भाषेचा अभ्यास सहज करतां येईल. म्हणून विशेष विस्तार न करतां नामें, सर्वनामें व क्रियापदें यांचीं कांहीं महत्त्वाचीं रूपें तेवढींच पुढें नमूद करीत आहे.

### नामें.

| विभक्ति. | प्रत्यय. | उदा. |
|---|---|---|
| प्रथमा. | उ, ऊ, ओ, वो. | द**त्तु** १; इश्वर**ू** ४; उपा**ओ** ५५ (अ. व. उपा**ये**. ६२९); दे**वो** ४१. |
| द्वितीया. | अप्रत्यय. | **मूळ** १५; पड**प** २५; |
| | सप्रत्यय. ते. आ. सि. | सागरा**तें** ९;देवव्र**ता** ७११; पदा**सि** ४६ |
| तृतीया. | आं, एं, ई, एन, सीं. | जाण**तां** २४८; कसम**सां** ६४६; फळ**कें** १; कम**ळीं** १४; पसर**तेन** ३१; शंकरे**सीं** ८०५; |
| | प्रत्ययलोप. | **मनु** ६३४; संप**ती** ७१९; |
| | | विशेषणविशेष्य तृतीयेंत असतांना त्यांचीं रूपें:–पसर**तेन** हा**तें** ३१; |
| चतुर्थी. | सि, आं, यां, | गजा**सि** ३५७; वे**धां** ४७;डो**ळां** २९; |
| | ए, तें, | श्रोते**यां** १३; ब्रह्मवि**द्ये** ४३; वेखरीये**तें** ६०४ |
| | प्रत्ययलोप. | **कि**र्ती ९७; |

| | | |
|---|---|---|
| पंचमो. | ऊनि | ठाऊ**नि** ७७९. |
| षष्ठी. | चा, चो, चें. | वैराग्या**चां** ५; विद्ये**चीं**; प्रवृत्ति**चें** ५३० |
| | आं. | आचा**र्यां** ( शिरोमणी ) ४; |
| | प्रत्ययलोप. | प्राणक**ळे** आंतु ७४९. |
| | षष्ठयंत सामान्यरूप. | साहित्या**चां** राहाणीं ३५. |
| | | यदुराया**चिये** राणिवे ४२; |
| | | परिमळा**चेया** कवतिका ३२; |
| | | जानाचि**या** सभा २१. |
| सप्तमी. | ए, ई, आं. | चुळ**के** १, राणि**वे** ४२; प**र्थीं**; |
| | | काळव**खां** १०२ |
| | सतिसप्तमी | पडिले**या** ४; पिळिले**या** ३०. |
| संबोधन. | | जगदीश्वरा!; शिरोमणी!; धात्रेया! ११४ |
| | | जी! २५७; एदु! ३८७; कांते! ७४५; |
| **सामान्यरूपें**. तृतीयान्त. | | पसरते**नि** ( –लेल्या ) हातें ३१ |
| | षष्ठयन्त व तृतीयान्त. | ब्रह्मविद्ये**चेनि** (च्या) कसें. ३४<br>ब्राह्मणा**चेनि** (च्या) शापानळें ५४. |
| | सामान्यरूप केलें नाहीं:— | कोकिळ वांचौनि ६४७; |

## सर्वनामें.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | मि ७९४, मी ५; तुं. ५९. | आम्ही. १६५;तुम्ही २५७. |
| | तो, ती, जी वगैरे. | तिये ३३०; तिया ६८७. |
| | | जिया ६९९. |
| द्वितीया. | मातें १३९, | |
| तृतीया. | मिया ६७, मासीं १५५. | |
| | तुं १३३; तुवां ११३; तुआं २४३. | |
| | तेणें १८४; तेणेसीं | तिहीं ६३४, तेहीं ६७८. |
| | | जेहीं २७२ |

| | | |
|---|---|---|
| चतुर्थी. | मज १४१, मातें. | |
| | तुज ६१. | तुम्हां २५८,तुम्हांसि ६८०. |
| | इयेसि – येसि ७५४. | |
| | तया ८१०, तेया ८१०. | तयांतें ६०८. |
| | त्या ६७२. जेयातें ८१२. | |
| षष्टी. | माझा ८१, माझी ७९, माझें ७७. | आमचा तुमचा ३२३. |
| | तुझा १४३. तुझी १५८, तुझें २६२. | तुमचा ६८०. |
| | इयेचा ७५४. | तयांचें ६८, |

षष्ठ्यन्त व तृतीयांत सामान्यरूपें

माझिये ८२१, माझेनि १३७.

तुझेया ८०, तुझेनि १५१.

तियेचेया ११९.

सामान्यरूपें तिये ६३, ये ३४७.

तयापुढें ६७.

## क्रियापदें.

क्रियापदाचीं सर्व रूपें याठिकाणीं दिल्यास बराच विस्तार होईल. सबब तसें न करतां आवश्यक व महत्त्वाचीं वाटणारीं तेवढींच रूपें खालीं नमूद करतों.

| | |
|---|---|
| १ वर्तमानकाळ. | सांघैन १६९; भंव्रत असों १६५. जात ( जातोस ) १२८, ३२६; भीत ( भितोस ) १५६. विसरलेति १३७. |
| २ भूतकाळ. | धाकिन्नलां ६२; हिंडिनलां ६४३. |
| ३ भविष्य. | साहासि ७०; ‘ टाकुनि ’ १६५ हें ‘ टाकणें ’ या क्रियापदाचें भविष्यकाळीं अनेकवचनी प्रथमपुरुषी रूप होय. |
| ४ जुना कर्मणी. | वेचिजति ८, दाविजैल. ५६. |
| ५ भावे. | घालिजे १३०, वोळगविजे १३० वगैरे. |
| ६ अकरणरूप. | नेदी १३८; नांगवे २१८ वगैरे. |
| ७ ल्यबन्त. | झोंबौनि १९०; धाड्डनि १९१. |

## ११

## गुणदोषविवेचन.

मूळ भागवताचें रूपांतर व स्वतंत्र काव्यग्रंथ या दोन्ही दृष्टींनीं उद्धवगीतेचें गुणदोषविवेचन व्हावयास पाहिजे; पैकीं प्रस्तुत प्रकरणाच्या प्रारंभींच उद्धवगीतेची संस्कृत एकादशस्कंधाशीं तुलना करून रुपांतर म्हणून तिची योग्यता ठरवण्याचा प्रयत्न आम्ही केलेलाच आहे. त्याचें इथें पुनः विवेचन करण्याचें कारण नाहीं. आतां स्वतंत्र काव्यग्रंथ या दृष्टीनें प्रस्तुत काव्याचा विचार करून हें प्रकरण आटोपतें घेतों.

उद्धवगीतेचें गुणदोषविवेचन करतांना सामान्यतः सर्व प्राचीन काव्यांना लावावी लागणारी कसोटी अगोदर लक्षांत ठेवली पाहिजे. इंग्रजी काव्यवाङ्मयाच्या परिशीलनानें कवितेची आधुनिक व्याख्या थोडीशी बदललेली आहे. कित्येक बाबतींत पूर्वकालीन व्याख्यांशीं तिचा तीव्र विरोध आढळतो. प्राचीन कवींच्या भोंवतीं असलेली सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थिति पाहतां तिला जें एक विशिष्ट वळण मिळालेलें आहे, तें लक्षांत घेऊनच तिचें परीक्षण करणें इष्ट होईल. आधुनिकांच्या मतें प्राचीन कवितेनें जें करावयास पाहिजे, तें न केल्याबद्दल तिला दोष देऊन चालणार नाहीं; उलट तिनें जें केलें तें कितपत चांगलें आहे, याचाच विचार करणें योग्य होईल. एखाद्या व्यक्तीनें आपल्या डोळ्यांसमोर न ठेवलेलें ध्येय तिला साध्य न झाल्याबद्दल त्या व्यक्तीला दोष देण्यापेक्षां स्वतःचें ध्येय तिनें कोणत्या साधनांनीं व कितपत यशस्वी रीतीनें साध्य केलें, हें पाहणें अधिक समंजसपणाचें आहे. त्या दृष्टीनें प्राचीन कवितेनें भौतिक परिस्थितीकडे दुर्लक्ष केलें असल्यास त्याबद्दल तिला नांवें ठेवणें योग्य नाहीं; कारण ऐहिकापेक्षां पारलौकिक गोष्टींचेंच तत्कालीन विद्वानांवर विशेष वजन पडलेलें होतें. म्हणून भौतिक परिस्थितीकडे पाठ फिरवून अध्यात्माच्या अज्ञात प्रदेशांत तत्कालीन कवितेनें झेप घालण्याचा प्रयत्न केलेला आहे. ‘ जेणें देहबुद्धी तुटे । जेणें भवसिंधु आटे । जेणें भगवंत प्रगटे । या नांव कवित्व ॥ जेणे सद्वस्तु भासे । जेणें भास हा निरसे । जेणें भिन्नत्व

नासे । या नांव कवित्व ॥' प्राचीन कवींची कवितेची व्याख्या, ही अशाप्रकारची होती. म्हणून त्यांनीं स्वतःच्या वैयक्तिक आयुष्यांतील प्रसंग रेखाटलेले आढळत नाहींत; किंबहुना, एका दृष्टीनें असेंही म्हणतां येईल कीं त्यांचें जीवित पूर्णपणें अध्यात्मपर बनल्यामुळेंच त्यांच्या कवितेला एक विशिष्ट वळण लागलेलें आहे. तें वळण म्हणजे त्यांच्या वैयक्तिक आकांक्षांचा आविष्कारच होय. हा आविष्कार करण्याची पद्धती कित्येकांची सरस असेल, तर इतरांची नीरस असेल; आणि त्या त्या गुणावगुणांच्या आधिक्यन्यूनत्वावरच एखाद्या प्राचीन काव्य-ग्रंथाचा बरेवाईटपणा अवलंबून राहील.

या दृष्टीनें उद्धवगीतेकडे पाहिलें तर, तिला तत्कालीन व्याख्येवरून काव्य ही संज्ञा लावावयास हरकत नाहीं. भागवताच्या समईवरून भास्करानें उद्धवगीतेची ज्योत पाजळलेली असल्यामुळें, तिचें तेज परप्रकाशित असल्यामुळें—तिला उत्कृष्ट म्हणतां येत नाहीं हें खरें; पण वरील गोष्ट दृष्टी-आड करून तिच्याकडे स्वतंत्र दृष्टीनें पाहिल्यास ती श्रेष्ठ आहे असेंच म्हणावें लागेल. मातेचें सौंदर्य आपल्याबरोबर घेऊन येणाऱ्या युवतीला ज्या अर्थानें आपण रूपवती म्हणतों, त्याच अर्थानें काव्य म्हणून उद्धवगीताही श्रेष्ठ आहे. संसाराविषयीं अनावड निर्माण करून परमेश्वराचा प्रसाद प्राप्त करून घेण्याकडे जनतेची मनोवृत्ती वळविण्याचा उद्धवगीतेनें, आपल्यापरीनें कां होईना पण चांगला प्रयत्न केलेला आहे. मतभिन्नतेच्या दृष्टीनें कित्येकांस कदाचित् तो आवडणार नाहीं. पण कोणत्याही वाङ्मयीन कृतीकडे आपल्या मताच्या चष्म्यांतून न पाहतां कलावंताच्या दृष्टीनेंच पाहणें अधिक इष्ट असते. अद्वैतवाद्यांना उद्धवगीतेंतील द्वैताची भूमिका पटणार नाहीं; पण काव्य म्हणून उद्धवगीता वाचतांना त्यांनीं द्वैताच्या भूमिकेवरूनच तिचें निरीक्षण करावें अशी सूचना देणें अवश्य वाटतें.

शिवाय, कल्पनांच्या व अलंकारांच्या साहित्यानें भास्करानें आपलें विवेचन अधिक आकर्षक करून सोडल्यामुळें उद्धवगीतेला खरें काव्यत्व आलेलें आहे. विशिष्ट प्रमेय प्रतिपादन करतांना तें सहजसुबोध होण्यासाठीं कवीनें काव्यमय कल्पनांच्या अलंकारांचें बरेंच साह्य घेतलें आहे; त्यामुळें ग्रंथांत

सरसता निर्माण झाल्याचें सहज दिसून येईल. आणि हें करीत असतांना त्याची भाषा अत्यंत प्रसन्नतेनें वाहत असलेली आढळते. कालाच्या जुनाटणामुळें कवितेंतील कांहीं शद्ब व रूपें आज अपरिचित व खडबडीत वाटतात हें खरें आहे. पण, त्याला इलाज नाहीं. विशेष अपरिचित असे शद्ब उद्धवगीतेंत फारसे नाहींत म्हणून काव्याच्या प्रासादिकपणाला अडथळा आलेला नाहीं; आणि आलेला असल्यास भाषेच्या आजच्या सुश्लिष्टतेवरुन तत्कालीन भाषेचें निरीक्षण करणें योग्य होणार नाहीं. मधून मधून वर्ण्यप्रसंगाशीं भास्कर पूर्णपणें तद्रूप झालेला दिसतो. याचीं उदाहरणें म्हणून उद्धवाचा शोक, ऋष्यशृंग, पुरुरवा प्रभृतींचीं कथानकें, शेवटीं आलेलें सगुण भक्तीचें वर्णन, इत्यादि प्रसंगांचा उल्लेख करतां येईल. सारांश आध्यात्मिक विषय, उपमादृष्टांतादि अर्थालंकार, प्रासादिक रचना, वर्ण्यप्रसंगाशी तद्रूपता इत्यादि गुणांमुळें उध्दवगीता सुंदर उतरली आहे असा अभिप्राय देण्यास हरकत वाटत नाहीं. ग्रंथाचा मूळ विषय लक्षांत घेतला असतां, ऋष्यशृंगाच्या कथानकांत कवीनें केलेला शृंगाराचा अतिरेक, व उद्धवाच्या शोकांतील पाल्हाळ, हे उद्धवगीतेचे दोन दोष दाखवून देतां येतील. पण ते उपेक्षणीय आहेत. त्यामुळें ग्रंथाच्या सर्वांगसुंदरतेला बाध न येतां गालावरील तिळाप्रमाणें ते तिला परिपोषकच झालेले दिसतात.



# परिशिष्ट १.

## पाटणबोरीच्या शिलालेखांतील श्लोक.

शांडिल्यवंशे कविचक्रवर्ती त्रिविक्रमोऽभूत्तनयोस्य जातः ।
यो भोजराजेन कृताभिधानो विद्यापतिर्भास्करभट्टनामा ॥
तस्माद्गोविन्दसर्वज्ञो जातो गोविन्दसंनिभः
प्रभाकरः सुतस्तस्मात् प्रभाकर इवापरः ॥
तस्मान्मनोरथो जातः सतां पूर्णमनोरथः
श्रीमन्महेश्वराचार्यस्ततोऽजनि कवीश्वरः ॥
तत्सूनुः कविवृन्दवन्दितपदः सद्वेदविद्यालता-
कन्दः कंसरिपुप्रसादितपदः सर्वज्ञविद्यासदः ।
यच्छिष्यैः सह कोऽपि नो विवदितुं दक्षो विवादी क्वचि-
छ्रीमान्भास्करकोविदः समभवत्सत्कीर्तिपुण्यान्वितः ॥
लक्ष्मीधराख्योऽखिलसूरिमुख्यो वेदार्थवित्तार्किकचक्रवर्ती ।
क्रतुक्रियाकांडविचारसारविशारदो भास्करनन्दनोऽभूत् ॥
सर्वशास्त्रार्थदक्षोऽयमिति मत्वा पुरादतः ।
जैत्रपालेन यो नीतः कृतश्च विबुधाग्रणीः ।
तस्मात्सुतः सिंघणचक्रवर्ती-दैवज्ञवर्योऽजनि चङ्गदेवः ।
श्रीभास्कराचार्यनिबद्धशास्त्रविस्तारहेतोःकुरुते मठं यः ॥
भास्कररचितग्रन्थाः सिद्धांतशिरोमणिप्रमुखाः ।
तद्वंश्यकृताश्चान्ये व्याख्येया मन्मठे नियमात् ॥

---

# परिशिष्ट २.

## स्मृतिस्थळांतील प्रक्षिप्त उतारा.

**मातापुरीं कविश्वरोद्‌गृहाणिके राघवभट्ट मध्यस्छ स्थलग्रहणें नारायण दीक्षितादि सकलविद्वांसा पराभओनि कवीश्वरा तीर्थाधिकारु जैतपत्रे देणें ॥ ॥**

बोरीकर भानूभट्ट हे वैय्याकरण शिरोमणि अनंताच्यार्य्याचे पुत्र. अनंताच्यार्य्य हे अध्यापकवृत्तिये पैठणि सुखेंनसी असेति. भानूभट्टांध्ययनु पितासन्निधी वैय्याकरणकाव्यकोशसाहित्यालंकारादिकांचें यथासांग पूर्ण जालें. भानूभट्टाचे मातूल गंगाधरपंतु हे षट्‌दर्शनांध्ययनां चालले तंवं भानूभट्टी पितेयां जाणविलें जें माते षट्‌शास्त्राध्ययनांलागी आज्ञापावें. तें अनंताच्यार्य्यें मानिलें. तंवं वंदन करौनि उभयें तैलंग देशीय विद्यानगरां पेणोवेणां पातले. येरीवाही काई नेणो कव्हणे रुजे अनंताच्यार्य्यांचें देहावसानु जालें. आइकौनि भानुभट्टां अत्यंत शोकु जाला. षट्‌शास्त्रेऽध्ययनोपरांतिके भानूभट्ट बोरी आपलां गृहीं आले. तंवं मातापितारहितु गृहो शुन्य स्मशानसें भाषलें. मग तेयां वेदवेदांग जाणिवेलागी उत्कंठा संचरैली. भणऔनि तेहीं प्रख्यातु अग्निहोत्री त्र्यंबकाच्यार्य्य वेदज्ञतेउतें गमन केलें. अग्निहोत्री त्र्यबंकाच्यार्य्य हे मातापुरां पूर्ववर्त्ती देवापुर क्षेत्राधिकारी राजवृत्तियें विद्वांसां मान्यू याज्ञीकक्रियें ख्यातिमंते असेति. भणऔनि भानूभट्टी वैदिकक्रियें सांगोपांगु जाणिवेयां तेयां प्रार्थिलें. तेहीं भानुभट्टां विशदबुद्धिशाली स्वरूपसंपन्न थोरां कुळांचें जाणौनि आस्वासिलें. मग क्रमेंची यथासांगु अध्ययन करितां भानूभट्टीं आपुलेंनि शिहाणिवें आच्यार्य्यांतःकरणु आपणेयां येउतें आकर्षिलें. परिणामी त्र्यंबकाच्यार्यें क्षेत्रस्छ ब्रह्मवृंदाचेनि सुविच्यारें आपुली एकुलतिए कन्यें सरस्वत्यांबा दानदातृत्वाचे भानुभट्टां जाणविलें. तेही रुपसंपन्न चतुर विदुशी जाणौनि गुरुआज्ञें अभिवंदिलें. मग सुमुहुर्तें यथाविधी महोच्छायेनसी तिचे पाणिग्रहण केलें. कन्यादानसमयीं आपुला क्षेत्राधिकारु तथा वृत्त्याधिकारु अग्निहोत्रें भानूभट्टां संकल्पिला. ऐसापरी काल क्रमितां भानुभट्टां विद्यानिधान

पुणितक्षेत्रवाराणशी दर्शनलालसा उद्देली. तंवं तेहीं अग्निहोत्री आच्यार्य्यो विनत-भावें जाणविलें. यथाआज्ञें सर्वसामग्रीसी दंपत्यु यात्रे निघालें. क्रमितुक्रमितां पेणोवेणां विश्वेश्वर सन्निधी पातले. दर्शने कृतार्थभूतसे जालें. मग एकदी वारानशीं क्षेत्रस्छ विद्वांसांची सांवच्छरीक मुख्यसभा घनदाट मीन्नली. तंवं तिये सभें भानूभट्टीं नूतनें पद्यें रचौनि विद्वांसां पृच्छिलें. येतुलेनी उधानी आरंभिली. तंवं अखिल विद्वांसवर्गो शीघ्रकवित्वें अत्याद्रें वंदौनि आपुलें नामु सारिले. अघ-वेयां अत्यंतु हरखु जाला. मग तेहीं कवीश्वर उपनामां यथार्थ कवीश्वरोपाधीये गौरविलें. ऐसें विद्याऽमोदें संसारी अनुरक्त असतां पुत्रप्रसववेदनेयां सुशील धर्मपत्नी सरस्वती काळधर्मा गेली. आन दूसरा दी नव अपत्युही विश्वेश्वर संन्निधी लीनु जाला. मग औदास्ये पडिभरें भानूभट्टीं पुनरागमनु आरंभिलें. तंवं क्षेत्रस्छ विद्वद्वृंदीं अनेकांपरी बोधिले तथा संबोखिले. परि भानूभट्टांचियां अंतष्करणां शांति लभेचि ना. मग ऐसापरी पेणोवेणां उज्जनी आलें. तंवं महाराष्टराजदूतावभाखें यवनाज्ञे अकस्मातु काराग्रहोवासु जाला. परि पूर्वसुकृ-तत्वें श्रीचक्रधरसर्वज्ञाचेनि सामर्थ्यप्रभावें महाराष्ट्र दिग्गज पाण्डितां बंधमुक्त केलें. उपकारभूतां मनोभावे चर्णी लीन होतांचि भानुभट्टां निवृत्तधर्म आच्यारु विच्यारु सक्षेपें निरोपौनि संसारत्रस्त दुःखापासौनि मुंचविले आन स्वधर्माभि-वृद्धिकार्यी भानूभट्टां नागदेवाचार्य्या संन्निधी पाठविलें. तंव तेहीं स्वामिचरणा अभिवंदौनि महाराष्ट्र भाखें 'शिशुपालवध' या ग्रंथा श्रृंगाररसयुक्तत्वें शके ११९५ श्रीमुख नाम संवच्छरी पूर्ण केलें. तंवं येरीकडें मातापुरासमीपु देवापुरां अग्निहोत्री त्र्यंबकाचार्य्या देहांतिकैसी रुजा उपनली.आन भानूभट्ट तंवं दूरांतर प्रदेशी. ऐसें जाणौनि तेहीं मातापुरस्छ नारायण दीक्षितादि अवघेयां ब्रह्मवृंदा पाचारौनि आपुलियें संपत्तिचे तथा क्षेत्राधिकाराचे लिखीतु भानुभट्टां दायभागाधिकारी भणऔनि सकलां जाणविलें. आन प्रस्तूत अंत्येष्टीक्रियाकर्म्माचे नारायण दीक्षितां निरोपिलें. 'परि कोणी यद्विषयीं अभिलाखु धरों नये. यां सर्व वित्ताधिकारां माझिया भानो देयावा पां' 'हो पां दे ॐ' भणऔनि सकळो एकसरें भाक-वाक्योच्चारिलें जे 'तुमचे जेतुलें असें तेतुलें भानूभट्टां देॐ.' मग दीसा दो कां अग्निहोत्री त्र्यंबकाच्यार्य्यांचा देहांतु जाला. तंवं नारायण दीक्षितांचेनि पुत्रे

विनायक दीक्षिते त्र्यंबकाच्यार्य्यांचें अंत्यकर्म्मा आपणेया येउते साभिलाखीतु मनोधर्में स्वीकरीन्निलें. अशौचदशा निवर्तैलिया सकलसंपत्ती वृत्ती तथा क्षेत्राधिकारित्व स्वयं बळाविले. क्षेत्रस्छें द्विजवरें तेयां निराकारिलें. परि तेयां रुचेचिना ऐसापरि तो संपत्तीयुक्त जाला. येरीवाहीं भास्करपण्डितु आटणक्रमें मातापुरां पातैलें तंवं विनायक दीक्षिते बरवेयांपरि निर्वडीकेली कां परिकेआंचा आगोवा निगोवा न लाहो या तंवं. भास्करमुनि पाण्डवलेणा पाठी घातिली. भिक्षावसरां- ग्रामान्तु भवति भिक्षां देही वदतां गणेश दैवज्ञें तें यां ॐळखौनि आफाविलें. सकलवार्ता जाणिली तथा संपत्याधिकारु हरासाची मातु दुःखाश्रुपूर्णे जाणविली. तंवं आणिकेहीं ब्राम्हणें आलीं. तेहीं भणतिलें 'हा कोणीं अतिथी पातला मां?' दैवज्ञे तेया भणतिले ' हेचि भानूभट्ट कवीश्वर त्र्यंबकाचार्य्यांचें जामातु. नोळखा मां ? ' तेही नेत्राश्रुपातेसी भणतिलें ' भानूभट्टो देहा नागविलेंते तुमची संपत्ती वृत्ती तथा क्षेत्राधिकारु विनायक दीक्षिते बळाविला मां. त्र्यंबकाचार्य्ये तुम्हां अर्पिला परि तो अभिलशितु अधुना कपर्दीही नेदी. तुम्ही क्षेत्रस्छ ब्रम्हवृंदाची सभा पाचारां मां. सत्यार्यु तो सभे प्रकटैलु.' ऐसापरी तेहीं वृद्धि बोधिलें. तें कवीश्वरी मानिलें.................................................

.........तंव समस्त ब्रम्हवृंदीं तथा सभामहाजनीं तथा पुरजनीं प्रसन्नतेयां देवापुरस्छित मुख्य क्षेत्रराज श्रीदत्तात्रेयचरणांकित देवदेवेश्वरांदि अष्टादशतीर्थस्छानाधिकारु यावच्चंद्रदिवाकरौ कवीश्वर भानुभट्ट भणजे भास्करपण्डित शिष्यवंशस्छा लिखितेनसी प्रमाणपत्र प्रतिज्ञेनसी शके ११९७ युवानाम संवच्छरे कार्तीक श्रुद्ध पौर्णिमें सन्मानौनी दीन्हला असें.( तेआं हरुषें जैतपत्रु स्मृतिविशेखे भणॐनि तैंचिदी ' उद्धवगीता ' श्रीमद्भागवतएकादशस्कंधी कथा प्रधानत्वें ग्रंथ कवित्वारंभिलें.) भणऔनि अत्यादरे प्रथमतः श्रीदत्तात्रेया मंगलाचरणीं भास्करपण्डिते अभिवंदिले. :" सिह्याचळाचिये चुळकें : जेआंचे प्रभामंडळ फांके : तो श्रीदत्त ललाटफळकें : नमस्कारितुसें ॥ १ ॥ " तथा ग्रंथामध्यें ही यदुअवधूत संवादरूपानें अखिलसंसारत्रस्त मुमुक्षुजनांलागी ज्ञानामृताचा वर्षाव केला आहे.

# परिशिष्ट ३.

## भानुविजयांतील वंशावळ.

सह्याद्रीचिये पाठारीं । त्रिविक्रमाची जन्मपुरी
पुनित गांवो कासारबोरी । तीर्थ गंगे उत्तरे ॥
त्रिविक्रमाचा विद्यापति । भास्कराचार्ये वेदमूर्ति
तयाचा गोविंदु अद्वैती । तिये शाखे प्रभाकरू ॥
प्रभाकराचा मनोरथु । तयाचा महेश्वरू पुनितु
तयाचा कवीश्वरू पंडितू । वेदांतिय ॥
कवीश्वराचार्यापासुनी । कमलाउसे पोटी पुत्र दोणि
ज्येष्ट चांगो फल्येस्थाणिं । गुरु झाला यादवां ॥
धारा कवीश्वराचा कुमरू । कमले पोटीं लक्ष्मीधरू
तयाचा कुशीं अनंतेश्वरू । तया धारा चांगदेवो ॥
चांगदेवो देशाउरी । अध्यापकु झाला चाळिसापुरीं
अनंतें घातली कासारबोरी । वैयाकर्णशाळा ॥
क्रमेंचि अनंतापासुनी । उमांबेजठरीं पुत्र दोनि
पुत्रलाभें दंपत्य मनीं । सुखावलें ॥
ज्येष्ट नावें दिवाकरू । धारा **भाणु कवीश्वरू**
अचाटप्रज्ञा साचोकारू । वाचस्पती ॥

—भानुविजय अ. १.

## सूची.

तेराव्या शतकांतील एक महानुभावीय काव्य

भास्करभट्ट बोरीकरकृत

# उद्धवगीता.

( प्रस्तावना, टीपा, पाठभेद, शद्बसूची इत्यादि सहित. )

---

संपादकः—प्रो. **विष्णु भिकाजी कोलते.**

" नाथांच्या फार पूर्वी झालेला हा संक्षेप ग्रंथ मला मोठा मनोरंजक वाटला. प्राचीन भाषा वाचण्यांत भाषाभ्यासकाला एकप्रकारचें सुख वाटतें. मूळ ग्रंथ तर सुरेख आहेच पण त्याची मथळे वगैरे देऊन आपण फार चांगली मंडणी केली आहे. टीपा व शद्बकोश यावर तर मी फार खुष झालों आहे. टीपा मुद्देसूद, हव्या तितक्या व हव्या तेथें दिल्या असून त्या बिनचूक आहेत. पाठभेद, स्थळांची व व्यक्तींची सूचीही दिली आहे. ग्रंथ सर्वांगसुंदर झाला आहे. नवीन कालांतील वस्त्रालंकार अंगावर घालून प्राचीन ग्रंथ लोकांपुढें मनोवेधक पद्धतीनें कसा छापावा याचा एक सुंदर नमुनाच आपण प्रकाशकांपुढें ठेवला आहे."

—ह. भ. प. ल. रा. **पांगारकर.**

**किंमत २ रुपये**

मिळण्याचीं ठिकाणें—

**ज. भि. कोलते**, अमरावती ( कँप )

**परचुरे पुराणीक** आणि **मंडळी**

मुंबई नं ४.

मग कवीस्वरबासीं वांकलेया हरीभटातें म्हणितलें : " हरी ! आतां तूं श्रीगीता वाखाणि : " मग वांकले हरीभट गीता वाखाणीति : तयाचा शद्व नावेकु ठसु रसवृत्ती नाहीं : म्हणौनि आइकावेया बहुतेक गुरुकुळ तैसें न बैसे : ऐसी गीता वाखाणीली : तेथ भटोबासीं परीसीली : ॥ २१६ ॥१२७॥

**कवीस्वरबा सौकीर्येत्वें वोलि अथवा त्रीपति दसीयांचीए वाहाणी पांगुरवणें :** ॥ कवीस्वरबास रूपें सुंदर होते : ते संग्रहे वोलि त्रीपति सीवणी आंतु करूनि पांगुरति : आन सावेयाचि सौकीर्यें दीसेति : तें देखुनि एक दीं भटोबासीं म्हणितलें : " भटो ! सौकीर्यें दीसतासि : तुवां वोली अथवा त्रीपति दुसीया वाहीं पांगुरावी : " ॥ मग कवीस्वरबास दसीयाचीया वाहीं वोलि अथवा त्रीपति पांगुरति : ॥ २१८ ॥ १२२॥

**कवीस्वरबा वीजनत्रए न पळणीं मठागमनीं भटोबासीं उचीत स्फुरलें म्हणणें :** ॥ एक दीं कवीस्वरबा वीजना गेले : ऐकि ठाइं बैसले : तंव तेथ मुंगीयांची हारी आली : तेथौनि उठीले : आणीक ठाइं बैसले : तंव तेथ सत्वा न एचि : तंव आपुलां मनीं म्हणितलें : " कां पां आजि वीजन पाळे ना : " म्हणौनि बीढारा आले : तंव अभ्यागतें आलीं असति : मग कवीस्वरबासीं म्हणितलें : " वीजन न पळेचि ते याचि कारणें :" मग भटोबासांपुढां मागील सांधीतलें : भटोबासीं म्हणितलें : " हें तुज उचीत स्फुरलें : " ॥ २१९ ॥ ७४॥

**कवीस्वरबा केसवाचार्ये भेटि वादनीएमें अवसरोचीत स्फुरणीं संसरण-प्रकरण-आक्षेपें केसवाचार्यें उद्गृहणी बाइदेवोबानुवादें : भटोबास-श्रवणें धर्मवार्त्ता :** ॥ हे आदि स्मृर्ति न सोधेचि : ॥ २२० ॥

**श्रवणानंतर कवीस्वरबा पंचश्लोकीं भेटि भटो श्रृंगारीया कवी कथन :** ॥ हें भटोबासीं आइकीलेया उपरि मग कवीस्वरबास पांच श्लोक करुनि भटोबासांचीए भेटीसि आले : भेटि जाली : मग भटोबासापुढां " चक्रेश्रीमतिगोकुळेनवनवक्रीडासमाडंबर " हें पांच श्लोक म्हणितले : मग भटोबासीं म्हणितलें : " भटो श्रृंगारीया कवी कीं गा ! : " ॥ २२१ ॥२८